

‘ हिमालयाशीं झुंज ’ हें पुस्तक मला फार आवडलें. मी तें एकाच दमांत वाचून काढलें. — श्री. बा. गं. खेर

पंतप्रधान, मुंबई



# हिमालयाशीं झुंज

( हिमालयांतील गीर्यारोहणाचा रोमांचकारी इतिहास )

: लेखक :

कॅप्टन प्रभाकर पाटणकर

: प्रस्तावना :

श्री. वि. वा. शिरवाडकर

प्रथमावृत्ति
ऑगस्ट १९४८

किंमत साडेचार रुपये

: प्रकाशिका :

सौ. सुलभा पाटणकर, बी. ए.
विनायकाश्रम,
डेक्कन जिमखाना, पुणें ४

मुखपृष्ठावरील चित्र : चित्रकार श्री. मूळगांवकर
एव्हरेस्टची छायाचित्रें : कॉपीराइट मौंट एव्हरेस्ट कमिटी
रेखाचित्रें : चित्रकार श्री. भार्गव

: मुद्रक :

रमाकान्त वेलदे
सुदर्शन प्रेस, नासिक

# प्रस्तावना

कॅप्टन प्रभाकर पाटणकर यांच्या प्रस्तुत पुस्तकास मी प्रस्तावना लिहीत आहे याचा अर्थ असा नव्हे कीं, मी एखाद्या पर्वताशीं झुंज घेऊन बसलों आहे अथवा गिर्यारोहणाच्या शास्त्रांत कांहीं पारंगतता संपादन केली आहे. माझा अधिकार इतकाच कीं, छापखान्यांत जाण्यापूर्वी मला हें पुस्तक वाचावयास मिळालें आणि मला तें फार आवडलेंहि. लेखनसंपादनाचा व्यवसाय करणाऱ्यांच्या जीवनांत 'हस्तलिखित' हें एक मोठें चिंताजनक प्रकरण असतें. अक्षरापासून अर्थापर्यंत अशा वाचनाच्या मार्गांत इतक्या अडचणी येतात कीं, आपण साक्षर आहोंत या गोष्टीचा देखील अनेकदां पश्चाताप वाटूं लागतो. परंतु पाटणकरांच्या पुस्तकाचा विषयच नावीन्यपूर्ण, नेहमीच्या चाकोरीबाहेरचा होता. मोठ्या उत्सुकतेनें मीं पुस्तक वाचायला घेतलें, आणि अखेरचें पान उलटल्यावर सुरवातीच्या अपेक्षा पूर्ण झाल्याचें समाधान मला मिळालें. हिमालय चढून जाण्यासाठीं झालेल्या सर्व प्रयत्नांचा इतिहास, सुबोध भाषेंत आणि रसपूर्ण शैलींत वाचकांना सादर करण्यांत लेखकानें यश मिळविलें आहे यांत शंका नाहीं.

स्वतः पाटणकरहि कधीं हिमालयावर गेलेले नाहींत. परंतु हिमालयापर्यंत मात्र ते जाऊन आलेले आहेत. प्रवासाची आवड ही त्यांच्या स्वभावांतच आहे. लष्करी अधिकारी म्हणून महायुद्धाच्या काळांत त्यांना देशांत आणि देशाच्या सरहद्दीबाहेर सक्तीचा प्रवास करावा लागला

परंतु तत्पूर्वीहि, केवळ प्रवासाच्या हौसेनें देशाचे दक्षिण उत्तर मुलूख त्यांनीं पायाखालीं घातलेले आहेत. प्रवासासंबंधींच्या या प्रेमामुळेंच प्रस्तुत विषयाकडे त्यांचें लक्ष वेधलें असावें. एखाद्या गिर्यारोहकास साजेलशा पद्धतशीरपणानें आणि पडतील ते श्रम घेऊन, त्यांनीं दीर्घकाल या विषयाची तयारी केली. मुंबईच्या शिक्षणखात्यापासून लंडनच्या रॉयल जॉग्राफिकल सोसायटीपर्यंत अनेक संस्थांशीं पत्रव्यवहार करून त्यांनीं, दुर्मिळ पुस्तकें, छायाचित्रें वगैरे साहित्य उपलब्ध करून घेतलें. पुस्तकास साङ्गता आणण्याच्या दृष्टीनें त्यांचे प्रयत्न किती यशस्वी झाले आहेत हें पुस्तक सहज चाळलें तरी समजून येण्यासारखें आहे.

गिर्यारोहण ही गोष्ट हिंदी लोकांना जवळजवळ अज्ञातच आहे. गफलतीनें गल्ल्यांत येऊन पडलेला फ्रेंच डॉलर लंडनमध्यें कोठें चालेना म्हणून एका स्कॉट सावकारानें समुद्रांत उडी टाकली आणि वीस मैल पोहोत जाऊन तो फ्रान्समधील कॅले या बंदरांत जाऊन थडकला, अशा आशयाचा एक चुटका आहे. आपण कांहीं विक्रम करीत आहोत याची त्या सावकारास यत्किंचितहि जाणीव नव्हती. नाणें चालविण्याच्या दुर्दम इच्छेमुळें केवळ अभावितपणें त्याच्या हातून हा पराक्रम घडला. भारतीयांनीं केलेलें गिर्यारोहण बहुतांशीं यांच स्वरूपाचें आहे. शरीराचा डौल वाढविण्यासाठीं पर्वतीसारख्या टेकड्यांवर होणारी चढाई सोडली, तरी इतर मोठ्या पर्वतशिखरांना भारतीयांचे पाय लागतात ते अंतःकरणांतल्या भाविकतेमुळेंच. कोठल्या तरी देवतेचें किंवा फार तर ऐतिहासिक स्थळाचें दर्शन घ्यायचें, याच विचारानें ते प्रेरित झालेले असतात. परंतु नगरपालिकेवर रचण्यांत आलेलें मेळ्याचें पद्य आणि प्रतिभेच्या गगनगामी विलासांतून निर्माण झालेलें मेघदूतासारखें काव्य यांत जेवढें अंतर आहे, तितकेंच सदर गिर्यारोहणांत आणि पाटणकरांनीं वर्णन केलेल्या गिर्यारोहणांत आहे. हिमालयाच्या बर्फामध्यें प्रसंगीं जीवनाचेंहि समर्पण करणाऱ्या साहसी वीरांना कोणत्याहि देवतेचें दर्शन घ्यावयाचें नव्हतें. आपल्याला' कोणीहि जिंकूं शकणार नाहीं, अशा दिमाखामुळें स्वर्ग ज्याला खरोखरींच दोन बोटें उरलेला आहे अशा

त्या पर्वतश्रेष्ठास पादाक्रांत करायचें, मानवाच्या कर्तृत्वाची पताका पृथ्वीवरील त्या सर्वोच्च स्थळावर लावायची, या एकाच महत्वाकांक्षेनें या वीरांना प्रेरणा दिलेली आहे.

हे प्रयत्न सिद्धीस गेले नाहींत; परंतु म्हणून त्यांची महात्मता कमी होत नाहीं. पराभव असले तरी हिमालयानें केलेले पराभव आहेत ते! मोठ-मोठ्या विजयांनीहि मांडलिकांप्रमाणें पुढें येऊन मुजरे करावे इतकी या पराजयांची महती आहे. नंगा पर्वतावरील चढाईचा दुःखान्त इतिहास वाचतांना अंतःकरण शहारून जातें. वीर, करुण आणि उदात्त या तीन रसांनीं ओथंबलेली केवढी दिव्य कहाणी आहे ही! चहूंकडून प्रचंड हिमप्रपात होत आहेत, वातावरणांत उधळलेल्या बर्फानें आणि धुक्यानें सूर्यप्रकाशासहि अंधाराची कळा आलेली आहे, विरल हवेमुळें श्वसन मंदावलेलें आहे, हातापायांचीं काष्ठें झालेलीं आहेत, वृत्ती बधीरलेल्या आहेत! अशा अवस्थेंत स्वतःपेक्षां दुसऱ्याच्या जीविताची काळजी वहात, उरलेली जीवनशक्ति दुसऱ्यासाठीं खर्च करीत धुक्यांतून वाट काढूं पाहणारे ते पराक्रमी वीर- कोठल्याहि लेखणीला ही दिव्यता यथार्थतेनें कागदावर रंगवितां येणार नाहीं, कोणत्याहि कलावंताला ती चितारतां येणार नाहीं! कल्पनेच्या पडद्यावरच बघतां येईल असें चित्र आहे हें. या हकीगती वाचतांना हिमालयाचें एकच स्वरूप माझ्या मनासमोर वारंवार उभें राहतें. आणि तें म्हणजे, आकाशाची उशी करून आणि पृथ्वीवर पाय टेकून बसलेल्या एका विराट् हिमदेवतेचें. तिच्या गळ्यांत मेघांच्या माला आहेत, सर्वांगावर यमलोकाची शीतलता आहे आणि अंतःकरणांत निसर्गाची निर्विकारता आहे. आपल्याला जिंकूं पहाणाऱ्या मानवांकडे पाहून तिच्या ओठाभोंवतीं स्मिताची रेषा उमटत नाहीं किंवा कपाळावर रोषाची आठी दिसत नाहीं. केवळ तटस्थतेनेंच ती त्यांचा संहार करते!

हिंदी लोक हिमालयाच्या मोठेपणाचा अभिमान मिरवतात, पण हा मोठेपणा प्रस्थापित वा सिद्ध करण्यासाठीं त्यांनी कांहींहि केलेलें नाहीं हा विचारहि प्रस्तुत पुस्तक वाचतांना मनांत आल्याशिवाय राहात नाहीं.

हिमालयाचीं शिखरें चढून जाण्याचा तर राहोच, पण तीं शोधून काढ- ण्याचा यत्न सुद्धा आमच्या हजारों वर्षांच्या इतिहासांत कधीं झाल्याचें नमूद नाहीं. लंडनमधील एक चित्रकार स्त्री, लग्न होतांच पहिला मधुमास साजरा करण्यासाठीं आपल्या पतीसमवेत हिमालयाच्या दऱ्याखोऱ्यांत येऊन राहते ( Himalayan Honeymoon—Bip Pares ), तर उलटपक्षीं आमच्याकडे अशीं अनेक माणसें आढळतील कीं ज्यांनीं हिमालयाचीं चित्रें सुद्धा पाहिलेलीं नाहींत. जीवनविषयक दोन दृष्टिकोनांतील तफावत याच्या मुळाशीं असावी असें मला वाटतें. तेथें जीवनाच्या सर्वांगांचा रसिकतेनें उपभोग घेण्याची वृत्ति आहे, जें सभोंवार आहे तें पादाक्रांत करण्याची पराक्रमी महत्वाकांक्षा आहे. उलटपक्षीं आम्ही मात्र, तिसऱ्या वर्गाच्या उतारूप्रमाणें, कोंदटलेल्या गर्दींत उभे राहून आणि दाराची मूठ हातांत धरून, स्टेशन येतें केव्हां आणि आपण बाहेर उडी मारतों केव्हां, या चिंतेंतच जीवन घालवीत असतों. आमच्या परंपरेनें आम्हाला ज्या जीवनाचा वारसा दिला आहे त्याला जीवन म्हणण्यापेक्षा अस्तित्व म्हणणेंच अधिक सार्थ होईल. पहिल्या प्रवृत्तींतून आकाशाला गवसणी घालणारे असले पराक्रम उदय पावतात आणि दुसऱ्या वृत्तींतून जीवनासंबंधीं उदासीन असलेलें अध्यात्म व नीरस कर्मकांड निर्माण होतें. समाधान इतकेंच कीं परिस्थिति पालटत आहे; आणि पारतंत्र्यांतलि संकोच व पूर्वपरंपरेबद्दल साहजिकपणें वाटणारा अतिरिक्त अभिमान, या गोष्टी सध्याच्या युगांत अनावश्यक असल्यानें तीं अधिक वेगानें पालटत राहील.

हिमालयांतील गिर्यारोहणांचा रोमहर्षक वृत्तान्त बातमीच्या किंवा फार तर लेखांच्या रूपानें मराठींत प्रसिद्ध झाला असेल; परंतु साद्यन्त स्वरूपांत तो या पुस्तकाच्या द्वारेंच मराठी वाचकांपुढें प्रथमतः येत आहे अशी माझी कल्पना आहे. माझ्याप्रमाणें या पुस्तकाचें वाचकहि याबद्दल श्री. पाटणकर यांचें अभिनंदन केल्याशिवाय राहणार नाहींत.

वि. वा. शिरवाडकर.

## लेखकाचें निवेदन

प्रस्तुत पुस्तक तयार होतांना मला अनेक व्यक्तींची मदत झाली. त्या सर्वांची नांवें येथें देतां येणें शक्य नाहीं. परंतु ज्यांची मला विशेष मदत झाली, त्यांचा ऊल्लेख करणें अवश्य आहे. माझ्या निकटच्या व्यक्तींपैकीं माझी पत्नी, माझे बंधू मेजर गो. वि. पाटणकर, तसेच श्री. उपेंद्र पटवर्धन, डॉ. कु. श्री. म्हसकर, डॉ. मोरेश्वर दीक्षित Ph D., श्री. चिं. दा. दांडेकर इत्यादि मंडळींनीं पुस्तक लिहिण्यास प्रोत्साहन देऊन, संदर्भ ग्रंथ मिळविण्यास मदत केली. लेखन व प्रकाशन या प्रांतांत मी नवखा असल्यानें, श्री. शिरवाडकर (कुसुमाग्रज), श्री. रमाकांत वेलदे आणि श्री. ना. का. जोशी यांनीं केलेलें सहाय्य मला बहुमोल वाटतें. पुस्तकाची हस्तलिखित प्रत तयार झाल्यावर, मी ती श्री. शिरवाडकर यांना वाचण्यास दिली. त्यांनीं ती वाचून पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याचें कबूल केल्यामुळें, मला माझ्या या पहिल्यावहिल्या ग्रंथाबद्दल बराच विश्वास उत्पन्न झाला. श्री. शिरवाडकर व श्री. वेलदे या साहित्यिकांची माझी योग्य वेळीं गांठ पडली, हें मी नशीबच समजतो.

पुस्तक लिहिण्यास सुरवात केल्यावर, छायाचित्रें मिळविण्याच्या उद्देशानें मी इंग्लंडमधील प्रकाशकांशी व संस्थांशी पत्रव्यवहार सुरू केला. त्यापैकीं कांहींजणांची मदतीचीं आश्वासनें आलीं. कांहीं जणांचीं उत्तरेंच आलीं नाहींत. रॉयल जिआग्रॉफिकल सोसायटीच्या मौन्ट एव्हरेस्ट कामि-

टीनें माझ्या विनंतीला मान देऊन आपल्या संग्रहांतील उत्कृष्ट छायाचित्रें मला पुरविली, याबद्दल कमिटीचा मी आभारी आहे. त्या छायाचित्रामुळें पुस्तकाला शोभा आली आहे, एवढेंच नव्हे, तर एव्हरेस्टशी चाललेल्या मानवी झगडयांतील अनेक स्थळें व प्रसंग कल्पनेनें डोळयापुढें आणणें, वाचकांना सोपें जाईल असा भरंवसा वाटतो. इन्स्पेक्टर ऑफ व्हिजुअल इन्स्ट्रक्शन श्री. आठल्ये यांना मी विनंति करतांच, त्यांनीं विद्याखात्याच्या संग्रहांतील सन १९२४ च्या एव्हरेस्ट मोहिमेचा मूक चित्रपट मला दाखविला, याबद्दल त्यांचाही मी आभारी आहे.

हा लहानसा ग्रंथ या विषयावरील इंग्लिश पुस्तकांच्या आधारें माझ्या फुरसतीच्या वेळांत लिहिलेला आहे. त्यापैकीं कांहीं आधारभूत पुस्तकांची यादी परिशिष्टांत दिलेली आहे. त्यांतलि AT GRIPS WITH EVEREST या पुस्तकाचा मला विशेष उपयोग झाला. तें पुस्तक मी दहा वर्षांपूर्वी वाचलें, तेव्हांपासून या विषयावरील पुस्तकें अभ्यासण्याची मला गोडी लागली.

आपल्याला जें जें आवडलें, त्याची गोडी इतरांनांही चाखण्यास द्यावी, अथवा जें जें आपणासी ठावें तें तें दुसऱ्यांसी सांगावें, या बोधवचनानुसार, माझ्या अल्पबुद्धीप्रमाणें हें पुस्तक मी मराठी वाचकांसाठीं–विशेषतः तरुण वाचकांसाठीं लिहिले आहे. वाचकांना या पुस्तकांत कांहींतरी नवीन वाचल्यासारखें आढळलें, आणि त्यांच्या माहितीत भर पडली तर माझ्या श्रमाचें चीज होईल. एवढीच अपेक्षा आहे.

मी कसलेला साहित्यिक नसल्यामुळें, या पुस्तकांत कांहीं दोष राहून गेले असणें शक्य आहे. पुस्तकाच्या विषयाचें महत्व दीर्घकाल टिकणारें असल्यामुळें, पुढेंमागें दुसरी आवृत्ति काढण्याची संधि मिळाल्यास, वाचकांनीं केलेल्या सूचनानुसार पुस्तकांत सुधारणा करण्याचा मी प्रयत्न करीन.

स्वातंत्र्य दिन,
१५ ऑगस्ट १९४८.

**प्रभाकर पाटणकर**

हिंदवी स्वातंत्र्याचा ध्यास घेऊन, ज्यांनीं
मोठ्या धैर्यानें हालअपेष्टा सहन केल्या,
अशा ज्ञात आणि अज्ञात देश-
भक्तांस, धाडसी वीरांच्या
या कथा, कृतज्ञतापूर्वक
अर्पण.



Everest is no longer merely a mountain : It has become a symbol of the highest strivings of the Human Spirit.

*—Stanley Snaith*

## अनुक्रमणिका

# चित्रानुक्रम



## नकाशे



पायथ्याच्या तळावरून एव्हरेस्ट पर्वताचें छायाचित्र

# गिर्यारोहण–परिचय : : १

हिमालयांतील एव्हरेस्ट* हें जगांतील सर्वांत उंच शिखर आहे, हें लहान मोठ्या सर्वांनाच माहीत आहे. या शिखरावर चढण्याचे प्रयत्न गेल्या बारा वर्षांत कांहीं कारणानें झालेले नाहींत. परंतु तत्पूर्वी झालेले प्रयत्न व त्यांतील कांहीं संस्मरणीय प्रसंग, यासंबंधीं त्यावेळेच्या वर्तमानपत्रांतून वाचलेलें वाचकांना आठवत असेल. गिर्यारोहणा (Mountaineering) च्या धाडसी खेळाचा प्रसार आपल्याकडे अद्याप मुळींच झालेला नसल्यानें उंच शिखरावर चढण्याचे हे प्रयत्न कसे करितात व त्यांना अशा कोणत्या अडचणी येतात कीं ते अजून यशस्वी झालेले नाहींत, इत्यादि गोष्टींची कल्पना फारच थोड्यांना असते.

युरोप, अमेरिका वगैरे सर्व पुढारलेल्या देशांत गिर्यारोहण हा तरुणांचा एक आवडीचा छंद आहे. आपल्याकडे सुट्टीच्या दिवसांत विद्यार्थी सिंहगड, रायगड वगैरे डोंगरी किल्ल्यावर सहलीला जातात. या डोंगरावर पाऊल-

* गौरीशंकर हें हिमालयांतील सर्वांत उंच शिखर आहे अशी समजूत कांहीं ठिकाणीं प्रचलित आहे. पण ती चुकीची आहे. गौरीशंकर हें एव्हरेस्टजवळचें दुसरें शिखर आहे, व त्याची उंची एव्हरेस्टपेक्षां कमी म्हणजे २३४४० फूट आहे.

वाटेनें वा पायऱ्यावरून चढतांना दमून गेल्यावर डोंगरमाथ्यावर बसून शुद्ध व आल्हादकारक वाऱ्याच्या झुळकेंत विश्रांति घेण्यांत व अनेक मैल दूरवर दिसणारा देखावा पाहण्यांत त्यांना आनंद मिळतो. गप्पा मारण्यांत किंवा पत्ते खेळण्यांत जी गंमत वाटते त्यापेक्षां अशी कष्टमय सहल करण्यांत एक प्रकारचा वेगळाच पण सात्विक आनंद मिळतो. त्यामुळें अनेक विद्यार्थी सुट्टींत अशा सहली काढतात. गिर्यारोहणप्रेमी पाश्चिमात्य तरुण हेंच करितात. परंतु ते सोप्या, मळलेल्या व सरळ वाटेनें न जातां, ज्या बाजूनें गेलें असतां, हातांपायांतील बळाची पराकाष्ठा करून वर चढावें लागेल अशी कठिण बाजू पाहून, तिकडून चढण्याचा प्रयत्न करितात. डोंगरावरील देवीचें किंवा ऐतिहासिक स्थळाचें दर्शन घ्यावें असा, सहलीवर जाणाऱ्या आपल्याकडील विद्यार्थ्यांचा उद्देश असतो. तर पाश्चिमात्य गिर्यारोहक निव्वळ चढण्याकरितां चढतात. कठिण पर्वतावर चढतांना पायांतील व बाहूंतील शक्तीची कसोटी होते. निरनिराळ्या प्रकारच्या खडकांवरून जातांना निरनिराळ्या क्लुप्त्या वापराव्या लागतात. कठिण जागेवरून चढतांना शरिराला व मेंदूला व्यायाम मिळतो. अशा धाडसी व्यायामांत त्यांना मजा वाटते.

हिंस्र पशूंची शिकार करणाऱ्या शिकाऱ्याला घोर जंगल तुडवून पायपिटी करून, रात्रीं बेरात्रीं जागून, व धोका पत्करून, शिकार करण्यांत जो आनंद मिळतो, किंवा पावसाळ्यांत पुरानें फुगलेल्या नदीच्या तुफान वेगानें वाहणाऱ्या पाण्यांत उडी ठोकणाऱ्या हौशी तरुणाला भोंवरे व खडक टाळण्यासाठीं प्रचंड धडपड करून पोहतांना जो आनंद वाटतो, तशाच प्रकारचा आनंद कठिण चढणीवरून उंच कड्यावर चढणाऱ्या गिर्यारोहकाला मिळतो. शिकार करणाऱ्या हौशी शिकाऱ्याला ज्याप्रमाणें अर्थप्राप्तीची आशा नसते, त्याप्रमाणें गिर्यारोहकाला कांहीं अर्थलाभ होणार नसतो. उलट साधन सामुग्री खरेदी करणें, पायथ्यापर्यंतचा प्रवास करणें, व भारवाहक

किंवा मार्गदर्शक यांना मोबदला देणें यासाठीं त्याच्या पदरचे पैसेच खर्च होतात. कीर्तिविषयीं म्हणाल तर एखाद्या दुर्गम्य शिखरावर पाय ठेवणाऱ्या पहिल्या माणसाचेंच फक्त नांव होतें. पण ज्या शिखरांवर अनेक लोक जाऊन आलेले आहेत अशा आल्पस्मधील शिखरांवरही प्रतिवर्षी शेंकडों लोक चढून जातात. साधारणपणें आल्प्समध्यें किंवा हिमालयांत, जेथें गिर्यारोहक चढून जातात त्या डोंगरांच्या माथ्यावर कांहींही नसतें. बहुतेक असेंच होतें कीं पहाटे निघालेले गिर्यारोहक जेमतेम दुपारीं आपल्या उद्दिष्ट स्थळीं जाऊन पोहोंचतात. तेथें पोहोंचल्यावर, फार वेळ न बसतां, त्यांना ताबडतोब उतरणें सुरू करावें लागतें. कारण एक तर पर्वत शिखरांवर थंडी व वारा तीव्र असतात, दुसरें, त्यांना सूर्यास्तापूर्वी परत मुक्कामावर पोंचणें जरूर असते. हिम प्रदेशांत, वाट चुकल्यानें वा अन्य कारणानें रात्र पडण्या-पूर्वी मुक्कामावर येणें अशक्य झालें तर कठिण प्रसंग ओढवतो. रात्रीच्या वेळीं, मोकळ्यावर थंडीनें गारठून जिवावर बेतायची पाळी येते. गिर्या-रोहणाच्या खेळांत जे धोके आहेत त्यांत हा एक धोका आहे.

तिकडे गिर्यारोहण हा खेळ मानला जातो. उत्तम कुस्तीगीराला ज्याप्रमाणें एखादा प्रबळ प्रतिस्पर्धी मिळाला कीं खेळायला जास्त जोर येतो व स्फुरण चढतें, त्याप्रमाणें एखाद्या अवघड व उंच असा पर्वत पाहिला कीं कसलेल्या गिर्यारोहकाला वर चढण्याची अनिवार्य स्फूर्ति येतें. आपल्या महाराष्ट्रांत हिंवाळा सौम्य असल्यानें हिम व नैसर्गिक बर्फ पाह-ण्याची संधि आपल्याला मिळत नाहीं. जे लोक काश्मीर, बलुचिस्तान किंवा हिमालयांतील दार्जिलिंग, मसूरी वगैरे थंड हवेचीं शहरें, अशा ठिकाणीं, विशेषतः हिंवाळ्यांत जाऊन आलेले असतील त्यांनीं हिम व बर्फ पाहिलें असेल तर उंच पर्वतावरील गिर्यारोहणाची कल्पना त्यांना जास्त सुलभ रीतीनें करतां येईल. इतरांनीं सुद्धां हिमवर्षावाचीं वर्णनें भूगोलाच्या किंवा अन्य पुस्तकांतून वाचलीं असतील. आल्स्पमधील बहुतेक शिखरें

हिमाच्छादित असतात. त्यामुळें गिर्यारोहकांना हिमावरून व बर्फावरून कसें चढावें याचें अनुभवी गिर्यारोहकाच्या मार्गदर्शकत्वाखालीं सशास्त्र शिक्षण घ्यावें लागतें. गिर्यारोहणासाठीं जाणाऱ्या टोळक्यांत निदान दोघेतरी माहितगार गिर्यारोहक असावे लागतात. विशेषतः वर चढतांना म्होरक्या व खालीं उतरतांना सर्वांत मागून येणारा, हे कुशल गिर्यारोहक असणें अवश्य असतें. आल्प्समध्यें प्रसिद्ध शिखरावर नेऊन आणण्यासाठीं ठराविक वेतनावर माहितगार वाटाडे मिळूं शकतात.

हिमावृत व बर्फावृत पृष्ठभागावर चढण्याकारितां वेगवेगळी पद्धत अंमलांत आणावी लागते. कारण हिम भुसभुशीत तर बर्फ कठिण असतें. या खेरीज नुसत्या खडकारोहणाचें शास्त्र वेगळें आहे. हिमावरून व बर्फावरून जातांना चढण फारच उभी असेल तर कुदळीच्या सहाय्यानें पायऱ्या खोदाव्या लागतात. थोड्या श्रमांत चांगल्या पायऱ्या खोदणें ही एक कला आहे. खडकावरून चढतांना खडकांतील भेगा, खळगे व पुढें आलेलीं टोकें यांचा आधार कसा घ्यावा हेंही शिकावें लागतें. चढण कठिण असली किंवा घसरण्याची भीति असली तर कमरेला दोरीनें बांधतात. दोरीचें दुसरें टोक सांथीदाराजवळ असतें, व तें टोक तो बर्फांत कुदळ रोवून त्याला अडकवून ठेवतो किंवा खडकावरची चढण असली तर खडकांच्या, पुढें आलेल्या एखाद्या टोकाभोंवतीं गुंडाळतो. म्होरक्या कदाचित् घसरलाच, तर या आधाराच्या सहाय्यानें त्याचा अधःपात थांबवितां येतो. विशिष्ट प्रकारच्या पृष्ठभागावरून चढतांना विशिष्ट प्रकारचे खिळे मारलेले बूट गिर्यारोहक उपयोगांत आणतात. या खेरीज नकाशा अभ्यासितां येणें, हवामानाचा अंदाज करणें, प्रथमोपचार, हिमावृत प्रदेशांत हिमाच्या पातळ थराखालीं लपलेले खड्डे कसे ओळखावे, मार्गशोधनांत होकायंत्राचा उपयोग कसा करून घ्यावा वगैरे गोष्टींचें ज्ञान गिर्यारोहकाला असणें अवश्य असतें.



उतरतांना एका पायरींतून दुसऱ्या पायरीवर पाय टाकणें कठीण असतें.





उभ्या उतरणीवर गिर्यारोहक पायऱ्या खोदीत उतरत आहे.



हिमांत रोवलेल्या कुदळीच्या आधारानें
गिर्यारोहक चढत आहे.



उभ्या चढणीवर चढतांना वरीलप्रमाणें
पायऱ्या खोदाव्या लागतात.

सौजन्य, प्रामाणिकपणा, खिलाडूवृत्ति वगैरे गुणांची जोपासना इतर खेळ खेळणाऱ्यांत होते तसेंच गिर्यारोहण करणाऱ्यांत सुद्धां या गुणांची जोपासना होते. दोघे गिर्यारोहक जेव्हां एखाद्या कडयावर, एकमेकाला दोरी बांधून एकमेकांचें जीवित एकमेकांच्या हालचालीवर अवलंबून ठेवून जात असतात तेव्हां त्या दोघांत परस्परांबद्दल केवढा विश्वास उत्पन्न होतो! अशा विश्वासामुळें एकमेकाविषयींची माहिती व ओळख वाढत जाऊन, दोघांमध्यें गाढ मैत्री निर्माण होऊं शकते. अशी मैत्री एकाद्या शहरांत त्या दोघांनीं अनेक दिवस बरोबर घालविले तरीही सहसा होत नाहीं. गिरिशिखरावर त्या दोघांचीं मनें व शरीरें एका लयीवर काम करीत असतात. ते दोघे एकाच तात्कालिक ध्येयाकडे, एकाच मार्गानें वाट चालत असतात. अशा ठिकाणीं स्वार्थी विचार लोपून जातात. आपल्या सोबत्याच्या सुरक्षिततेबद्दल आपल्या स्वतः इतकीच काळजी वाटते. व मिळणाऱ्या यशांत आपल्या सोबत्यालाही योग्य वाटा मिळावा असें वाटूं लागतें. याचीं उदाहरणें पुढील प्रकरणांतून निरनिराळ्या मोहिमांचीं वर्णनें वांचतांना आढळतीलच. फ्रँक स्माइद नांवाच्या एका प्रसिद्ध इंग्लिश गिर्यारोहकाचें एक उदाहरण येथें देण्यासारखें आहे. तो व त्याचा लेवा नांवाचा नेपाळी भारवाहक असे दोघेही बरोबरच हिमालयांतील कामेट नांवाच्या २५४४७ फूट उंचीच्या शिखरापाशीं जाऊन पोहोंचले. त्यावेळीं स्माइदनें आपल्या बरोबरच्या भारवाहकाला आपल्या पुढें करून शिखरावर उभे राहण्याचा पहिला मान त्याला दिला. हिमालयांतील शिखरें चढून जाण्यांत ज्या भारवाहकांचे श्रम गिर्यारोहकांच्या श्रमाइतकेच महत्वाचे असतात त्यांच्यापैकीं एकाला हा मान देऊन स्माइदनें भारवाहकांच्या विषयीची कृतज्ञता व्यक्त केली.

## गिर्यारोहण इतिहास : : २

युरोपांतील गिर्यारोहणाचा इतिहास पाहूं गेले असतां असें दिसून येतें कीं, सध्यांच्या प्रमाणें डोंगर व शिखरें केवळ हौशीखातर चढून जाण्यांत पूर्वीच्या काळीं लोकांना कांहीं गंमत वाटत नव्हती. पूर्वीच्या काळांत जे कांहीं लोक डोंगर चढून गेल्याचे उल्लेख आहेत ते तुरळक आहेत. त्यापैकीं बहुतेक चढाया कांहीं उद्दिष्ट साध्य करण्याकरितांच केल्या होत्या असें दिसून येतें. रोमन काळांत एटना पर्वतावर कांहीं लोक चढून गेल्याचा उल्लेख आहे. त्यानंतर मध्ययुगीन काळांत अकराव्या शतकांत रोशे मेलन या पर्वतावर एक अयशस्वी चढाई करण्यांत आली होती. तेराव्या शतकांत तिसरा पीटर हा एक राजपुत्र युरोपांतील पिरनीज पर्वतामधील कॅनिगो हा पर्वत चढून गेला. ११६०५ फूट उंचीच्या रोशे मेलन शिखरावर पहिली यशस्वी चढाई, बी. अस्टी नांवाच्या व्यक्तीनें सन १३५८ मध्यें केली व तेथें एक मठ स्थापिला. त्यानंतर सन १४९२ मध्यें फ्रान्सचा राजा सातवा चार्लस याच्या हुकुमावरून बारा माणसांच्या एका टोळीनें, मौंट अजाईल नांवाच्या सात हजार फूट उंचीच्या व चढण्यास कठीण अशा पर्वतावर चढून जाऊन तेथें सात दिवस वस्ती केली. या नंतर सुमारे तीनशें वर्षांच्या काळांत कोठे उल्लेखनीय चढाई झालेली नाहीं. मधुन मधुन लहान लहान

वैयक्तिक प्रयत्न झाले होते. त्याकाळांत, पर्वतांवरून भुतें व राक्षस रहात असल्याचा लोकभ्रम युरोपमध्यें प्रचलित होता. त्यामुळें आल्पस्‌च्या दऱ्या खोऱ्यांतून शॅमॉय नांवाच्या हरणाची शिकार करणाऱ्या रानटी लोकांखेरीज इतरांचा विशेष संचार झाला नव्हता. आपल्याकडे हिंदुस्थानांत मात्र गंगोत्री ( उंची १४००० फूट ) जम्नोत्री, मानस सरोवर अशीं ठिकाणें यात्रेकरूंना अनेक शतकांपासून माहित आहेत. दरवर्षी हजारो भाविक लोक परमार्थ साधनासाठीं हिमालयांतील हिमाच्छादित प्रदेशांत अनेक हाल-अपेष्टा सोसून जाऊन येतात. तसेंच अनेक साधू व योगी उंच पहाडावर कायमची वस्ती करून रहातात. परंतु केवळ हौस म्हणून उंच शिखरारोहण करण्यास गेलेल्या हिंदी लोकांचीं उदाहरणें आपल्याकडे नाहींत.

युरोपांतील सोळाव्या शतकांतील उल्लेखनीय गिर्यारोहक म्हणजे गेस्नर व सिम्लर या दोघांनीं गिर्यारोहण करून त्यासंबंधीं लेख लिहिले. सन १५७४ मध्यें सिम्लरनें आल्पस् पर्वतासंबंधी एक लेख लिहिला होता. त्यांत त्यानें बर्फप्रवाहावरून कसें चालत जावें या विषयीं सूचना दिल्या होत्या. या लेखांत दोर कसा वापरावा, चकाकणाऱ्या हिमामुळें डोळयास अंधारी येऊं नये या करितां काय करावें, वरून पातळ हिमाचा थर असलेले हिमांतील खड्डे कसे शोधावे या विषयीं त्यानें लिहिलें; त्यावरून त्यासुमारास हिमाच्छादित भूभागावरून चालून जाण्याच्या कलेंत बरीच प्रगति झाली असल्याचें दिसून येतें. परंतु या प्रगतीला तीस वर्षांच्या युद्धामुळें खंड पडला व पुढें युरोपांतील अस्थिर परिस्थितीमुळें सतराव्या शतकांत गिर्यारोहणाची विशेष प्रगति झाली नाहीं.

अठराव्या शतकांत मात्र गिर्यारोहणासंबंधी उल्लेखनीय गोष्टी घडल्या त्या शतकांत गिर्यारोहण या विषयांवर ग्रंथ–निर्मितीही विपुल झाली. सन १७६० मध्यें डी सॉसर नांवाच्या जिनेव्हा येथील सधन गृहस्थानें मॉंट ब्लॅंक पर्वतशिखराच्या पायथ्याच्या बर्फप्रवाहावरून जाण्याचा प्रयत्न

केला. परंतु पर्वताच्या उग्र स्वरुपामुळें त्याला तो सोडून द्यावा लागला. शास्त्रीयज्ञानाच्या प्रगतिकरितां मॉंट ब्लँक वर चढून जाण्याची डी सॉसरची फार इच्छा होती. मॉंट ब्लँक हें आल्पस्‌मधील सर्वांत जास्त उंचीचें शिखर आहे. त्याची उंची १५७८० फूट आहे. मॉंट ब्लँक वर चढून जाण्याचा मार्ग शोधून काढणाऱ्याला बक्षीस देण्याचें डी सॉसरनें जाहीर केलें. या बक्षिसाच्या आमिषामुळें मॉंट ब्लँकवर चढून जाण्याचे अनेक प्रयत्न झाले. परंतु सव्वीस वर्षें तें बक्षीस कोणीही मिळवूं शकलें नाहीं. शेवटीं सन १७८६ मध्यें मायकेल पॅकॅर्ड यानें बॅल्मट नांवाच्या इसमाला मदतीस घेऊन मॉंट ब्लँकचें शिखर गांठलें. या विक्रमांतील पुढारीपण व प्रेरकशक्ति पॅकॅर्ड याजकडेच होती. परंतु दुर्दैवानें त्याच्या हयातींत त्याला त्याचें श्रेय मिळालें नाहीं. बोरिट नांवाचा एक गृहस्थही मॉंट ब्लँक वर चढून बक्षीस मिळविण्याचा प्रयत्न करीत होता. आपल्या आधींच पॅकॅर्ड यशस्वी झ.ल्याचें कळल्यावरुन त्याला त्याचा मत्सर वाटूं लागला. बोरिटनें एक पुस्तक प्रसिद्ध केलें व त्यांत मॉंट ब्लँक वरील पहिल्या यशस्वी चढाईचें श्रेय पॅकॅर्डला न देतां बॅल्मटला दिलें. बॅल्मट हा केवळ मदतनीस व भारवाहक म्हणून पॅकॅर्ड बरोबर गेला होता. पण बोरिटनें असें प्रसिद्ध केल्यावर बॅल्मटला स्वतःलाही कीर्तीची हाव वाटू लागली. त्यानें मुलाखत देऊन सांगितलें कीं, आपण स्वतः मार्ग शोधून, पॅकॅर्डला शिखरावर वाहून नेलें. या वादांत खुद्द पॅकॅर्डनें भाग घेतला नाहीं. पण त्याची साहाजिकच निराशा झाली. तरीही त्यानें आपले गिर्यारोहण चालू ठेवलें. पॅकॅर्डच्या मृत्यूनंतर, व्हॉन गेरडॉर्फ नांवाच्या एका सरदारानें लिहिलेलीं कांहीं टिपणें व चित्रें उपलब्ध झालीं. पॅकॅर्डच्या चढाईच्या वेळीं तो हजर होता, व त्यानें त्या चढाईचें यथार्थ वर्णन लिहून ठेवलें होतें. त्या वरून व इतर अनुमानावरून बॅल्मटच्या बढाईचा परिस्फोट झाला, व मॉंट ब्लँक

वरील पाहिल्या चढाईचा प्रेरक व पुढारी पॅकॅर्ड हाच होता असें मानण्यांत येऊ लागलें.

पॅकॅर्डच्या चढाईच्या दुसऱ्याच वर्षी म्हणजे सन १७८७ मध्यें डी. सॉसर स्वतः मौंट ब्लँक वर चढून आला. त्यानें आपल्या चढाईचें वर्णन लिहून ठेवलें आहे. कांहीं स्थानिक वाटाडे घेऊन त्यानें चढण्यास सुरवात केली. त्याचा प्रवास चार दिवस चालू होता. दररोज रात्रीं ते तंबूत झोपत दिवसा तंबूच्या घड्या करून वाटाडे पाठीवर वाहून नेत. चंद्रप्रकाशांत न्हाऊन निघणाऱ्या शुभ्र पर्वतराजींचें उत्तम वर्णन डी सॉसरनें लिहून ठेवलें आहे. त्याच्या बरोबरील वाटाडे मात्र त्या देखाव्याकडे पाहून आनंदित होण्याच्या मनःस्थितींत नव्हते. अनामिक भीतीनें ते ग्रासून गेले होते. त्या सर्वांना उंचीवर गेल्यावर आजाराचा त्रास झाला. तसेंच हिमप्रपात * होण्याची व त्या खालीं सांपडण्याची त्यांना सारखी भीति वाटत होती. परंतु कांहीं अपघात न होतां ते सुखरुप परत आले. एका टप्प्यापासून दुसऱ्या टप्प्यापर्यंत जायचें व रात्रीं वाटेंत छोट्या तंबूखालीं मुक्काम करावयाचा. आधुनिक गिर्यारोहणाच्या तंत्राचा अवलंब या वेळेस

---

* हिमालयासारख्या उंच पर्वतावर हिम पडतें. वाऱ्यामुळें त्यांचे ढीगच्या ढीग बनतात. कड्यावर किंवा उतारावर असलेल्या अशा हिमाच्या ढिगांचें वजन जास्त झालें कीं, हिम व बर्फ यांचे हे मोठमोठे गोळे मूळ डोंगरापासून अलग होऊन खालीं कोसळतात त्यांना ( Avalanche ) हिमप्रपात असें म्हणतात. यांचें वजन, कांहीं वेळां हजारों टन असतें. असा हिम व बर्फाचा मोठा गोळा घसरत येऊं लागला कीं, त्याच्या बरोबर पर्वताच्या पृष्ठभागावरचे दगड व माती मिसळून खालीं गडगडूं लागतात. अशा हिमप्रपाताखालीं अनेक माणसें व सामान गाडून गेल्याचीं उदाहरणें गिर्यारोहणाच्या इतिहासांत आहेत.

प्रथमच केला होता. एकंदर मोहिमेची व्यवस्थाही आधुनिक पद्धतीवर आंखली होती.

या चढाईनंतर माँट ब्लँकवर प्रतिवर्षी चढाया होऊं लागल्या. नव्या अनभिज्ञ गिर्यारोहकांना मार्ग दाखविणाऱ्या वाटाड्यांचा एक नवा धंदा निर्माण झाला. हळुहळू गिर्यारोहकांचें लक्ष जुंगफ्राड, वेटर हॉर्न, इत्यादि आल्पस्‌मधील दुसऱ्यां शिखरांकडे वळलें व तींही शिखरें काबीज करण्यांत आलीं. सन १८५० पर्यंत आल्पस्‌मध्यें फारसे ब्रिटिश लोक गिर्यारोहणाकरितां जात नव्हते. परंतु त्या सुमारास फोर्बस् नांवाच्या ब्रिटिश माणसानें आल्पस्‌मध्यें बरेंच गिर्यारोहण केलें. त्याच्या उदाहरणानें ब्रिटिश लोकांत गिर्यारोहणाची आवड उत्पन्न झाली. फोर्बस् याला पहिला ब्रिटिश गिर्यारोहक मानतात. त्यानें आल्पस्‌मधील डोंगर व दऱ्यांतून खूप प्रवास केला, व 'आल्पस्‌मधील प्रवास' या आपल्या पुस्तकांत त्याचें वर्णन लिहून ठेवलें. गिर्यारोहण हा एक धाडसी खेळ आहे व पद्धतशीर प्रयत्न केल्यास दुर्गम अशा ठिकाणींसुद्धां मनुष्य जाऊं शकतो हें त्यानें दाखवून दिलें. त्याच्या नंतर एडवर्ड व्हिंपर नांवाच्या ब्रिटिश गिर्यारोहकाच्या नेतृत्वाखालीं एका पथकानें बऱ्याचशा प्रयत्नानंतर स्वित्सरलंड मधील मॅटरहॉर्न नांवाच्या सुप्रसिद्ध शिखरावर यशस्वी चढाई केली; परंतु त्याच्या पथकाला एक अपघात झाला. डोंगर उतरत असतां चार माणसें घसरलीं व त्यांना मृत्यु आला. स्वतःला वांचविण्याकरितां कमरेला बांधलेली दोरी तोडून टाकली व त्यामुळें अपघात झाला असा आरोप कांहीं जणांनीं एका वाटाड्यावर केला. परंतु त्या वाटाड्यावर असा अन्याय झालेला व्हिंपरला सहन झाला नाहीं. तो वाटाड्या निरपराधी आहे हें सिद्ध करण्यासाठीं त्यानें आपल्या आयुष्याचीं अनेक वर्षे खर्च केलीं. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस गिर्यारोहणाच्या कलेंत बरीच प्रगति झाली. या मर्दानी खेळांत भाग घेणारांची संख्याहि खूप वाढली. गिर्यारोहणासंबंधीं बरेंच वाङ्मय निर्माण झालें. विसाव्या शत-

काच्या प्रारंभापासून १९३९ चें जागतिक युद्ध सुरू होण्यापूर्वीच्या काळांत युरोपमध्यें दरवर्षी हजारों लोक शिखरांवर चढून जात होते. नव्या नव्या शिखरांवर कबजा केला जात होता व गिर्यारोहणाच्या इतिहासांत भर पडत होती. चढाई करितांना पुरेशी काळजी न घेतल्यामुळें मधुन मधुन गिर्या-रोहकांना अपघातही होत होते.

या खेळाचें शास्त्र आतां इतकें परिपूर्ण झालें आहे कीं याची माहिती देणाऱ्या ग्रंथांतून बूट कोणते वापरावे, बुटाला खिळे कोणते व कसे लावावे, दोरीचा उपयोग कसा करावा, कोणत्या प्रसंगीं कोणत्या प्रकारची दोरीची गांठ श्रेयस्कर असते, बर्फ कुदळीचा उपयोग कसा करावा, कपडे कोणते वापरावे, उंच पर्वतावर अन्न कोणतें खावें, कोणत्या अन्नांत किती शक्ति-दायक घटक आहेत, हिमावरून जातांना काय करावें, बर्फावरून कसें चढावें वगैरे तपशिलाबाबत पूर्ण सूचना दिलेल्या असतात. आधुनिक गिर्या-रोहक, वेधशाळेकडून प्रसिद्ध होणाऱ्या हवामानाच्या अंदाजाचा उपयोग करून घेतात. युरोपमधील आल्पस्‌मध्यें तर गिर्यारोहकांसाठीं बहुतेक दऱ्या-खोऱ्यांचे अद्यावत व मोठे नकाशे तयार करण्यांत आले आहेत. त्यांच्या-करितां गिरिप्रदेशांत टप्याटप्याला निवाऱ्याच्या जागा व झोपड्या बांधण्यांत आलेल्या आहेत. निरानिराळ्या शिखरांवर जाण्यास मार्गदर्शन करणारे निष्णात वाटाडे तेथें ठराविक मोबदल्यावर मिळूं शकतात. युरोपीय देशांतून गिर्यारोहकांची मंडळें स्थापन झालेलीं आहेत. हीं मंडळें आपापल्या सभासदांकरितां माहिती, सामान, आवश्यक गोष्टी व नकाशे इत्यादि पुर-वितात. अशा मंडळांतून अनुभविक गिर्यारोहकांचीं व्याख्यानें होतात. गिरिप्रदेशांत अशा मंडळांच्या मालकीचीं घरेंसुद्धां आहेत.

आल्पस्‌मध्यें प्रवाशांच्या व गिर्यारोहकांच्या सोयीकरितां सुखसोईंनीं सज्ज अशीं पथिकगृहें आहेत. गिर्यारोहकांच्या–आल्प्स यात्रेमुळें मॉंट ब्लँकच्या पायथ्याचें शामोनिक्स, व मॅटरहॉर्नच्या पायथ्याचे झरमॅट हीं

गांवें भरभराटीला आलेली आहेत. पूर्वी शिखरांच्या पायथ्याशी जायला लोकांना पायानें चालत कष्टमय प्रवास करावा लागत असे. आतां पर्वतांतील तारेवरून घसरणाऱ्या गाडीनें अल्पकाळांत, बिनत्रासानें सामानासह तेथें जातां येतें.

आल्पस्मध्यें जाणाऱ्या गिर्यारोहकांना नवीन शिखरें चढून गेल्याचा आनंद मिळणें दुरापास्त झालें आहे. कारण, कोणी चढून गेलेलें नाहीं, असें शिखर आल्पस्मध्यें जवळ जवळ नाहींच असें म्हटलें तरी चालेल. शिवाय, प्रसिद्ध शिखरांवर ज्या ज्या बजूंनीं चढणें शक्य होतें त्या त्या सर्व बाजूंनीं चढून कुशल गिर्यारोहकांनीं आपली हौस भागविली आहे. परंतु, त्यामुळें गिर्यारोहणाचें आकर्षण कमी झालेलें नाहीं. गिर्यारोहणाच्या शास्त्रशुद्ध तंत्राचा अवलंब करून एखाद्या कठीण जागेवरून चढून गेलें म्हणजे, जो आनंद मिळतो, तो चांगल्या क्रिकेट मॅचमध्यें सेंचरी काढण्याच्या आनंदासारखा असतो. आपल्या शक्तीची पराकाष्टा करून वर चढून गेलें म्हणजे मनाला एक प्रकारचें समाधान मिळतें. प्रसिद्ध शिखरावर चढून जातांना दुसऱ्या एक प्रकारचा आनंद होतो. या शिखरांवरील पूर्वीच्या चढायांचा इतिहास त्यावर लिहिलेल्या पुस्तकांमुळें गिर्यारोहकांना माहित असतो. त्यांतील प्रत्येक खड्डयांतून व कड्यावरून कुशल गिर्यारोहक कसे पार झाले त्याचें वर्णन त्यांनीं वाचलेलें असतें. तें सर्व प्रत्यक्ष अनुभवितांना नव्या गिर्यारोहकांना साहजिकच गंमत वाटतें. शिवाय क्रिकेट खेळणाऱ्यांना, किंवा टेनिस खेळणाऱ्यांना खेळानंतर त्या खेळाविषयीं एक-मेकांत गप्पा मारतांना व आपण कोणत्या प्रसंगीं काय केलें हें सांगतांना जसा आनंद मिळतो तसाच गिर्यारोहकांनाही मिळतो.

युरोपमधील अल्पाईन क्लबसूप्रमाणें हिंदुस्थानात हिमालयन क्लब नांवाची एक संस्था आहे. त्या संस्थेचे उद्देश, हिमालयांतील प्रवाशांना मदत करणें व हिमालयासंबंधीं पुस्तकें नकाशे इत्यादि तयार करवून घेणें

हे आहेत. या संस्थेचें एक ग्रंथालय आहे. त्यांत गिर्यारोहण, भूगोल, निसर्गशास्त्र, वनस्पतिशास्त्र वगैरे अनेक विषयांवर पुस्तकें आहेत. या संस्थेचा उपयोग, हिमालयांत गिर्यारोहण करण्यासाठीं येणाऱ्या लोकांना चांगला होतो. पंजाबमध्येंही एक गिर्यारोहकांचें मंडळ निघालें होतें. त्या मंडळाचा उद्देश हिंदी लोकांत गिर्यारोहणाची आवड उत्पन्न करणें हा होता. पाकिस्तान निर्माण झाल्यानंतर त्या संस्थेचें काय झालें हें समजलें नाहीं.

आल्प्स पर्वतामधील निरनिराळ्या शिखरांवर चढाई झाल्यावर युरोपीय गिर्यारोहकांचें लक्ष जगांतील दुसऱ्या पर्वतांकडे वळलें. डग्लस् फ्रेशफील्ड यानें रशियांतील कॉकेशस पर्वतावर मोहीम केली. व्हिम्परनें दोन स्विस वाटाडे बरोबर घेऊन दक्षिण अमेरिकेंतील अँडस् देशांतील शिंबोराझो व कोटोपॅक्सी या ज्वालामुखीद्वयांवर हल्ला केला. कोटोपॅक्सीवर एवढी उष्णता होती कीं, त्यांचे रबरी तंबू वितळून गेले. आफ्रिकेंतील सर्वांत उंच पर्वत 'किलीमांजारो' आहे. त्याची उंची वीस हजार फूट आहे. डॉक्टर हॅन्स मेयर नांवाच्या जर्मनानें किलिमांजारो वर चढाई करून शिखर गांठलें. ब्रिटिश गिर्यारोहक, ग्रेटब्रिटन मधील लोक नॉर्थ वेल्स व लेक डिस्ट्रिक्ट या विभागांत उंच दरडीवर चढण्याच्या तंत्राचा अभ्यास करूं लागले. कॅनेडिअन लोकांनीं रॉकी पर्वताकडे धांव घेतली. अमेरिकन लोक अलास्कामध्यें, गिर्यारोहणाची आपली हौस भागवूं लागले.

जगांतील लहान मोठ्या पर्वतावर पायधूळ झाडल्यावर पाश्चिमात्यांचें लक्ष हिमालयांतील उंच शिखरांकडे वळलें. त्यामध्यें, ज्याची उंची २९ हजार फूटांपेक्षां जास्त आहे, असें एव्हरेस्ट हें शिखर म्हणजे, धाडसी व निष्णात गिर्यारोहकांना एक प्रकारचें आव्हानच होतें.

## नगाधिराज हिमालय : : ३

संस्कृत कवींनीं वर्णन केलेला, पुराणांत उल्लेखिलेला हिमालय हा सर्व जगांत मोठा पर्वत आहे. याची पूर्व पश्चिम लांबी सुमारें १६०० मैल, व रुंदी सरासरी २०० मैल आहे. या पर्वतराजींत जगांतील उंच शिखरें आहेत. त्यांतील शिखरश्रेष्ठ एव्हरेस्ट समुद्रसपाटीपासून २९१४५ फूट उंच आहे. एव्हरेस्ट खेरीज या पर्वतांत, अठ्ठावीस हजार फुटांपेक्षां जास्त उंचीचीं तीन शिखरें, सत्तावीस हजार फुटांवर उंची असलेलीं सहा शिखरें, व चोवीस ते सत्तावीस हजार फूट उंचीचीं जवळजवळ दीडशें शिखरें आहेत. एव्हरेस्टच्या खालोखाल ज्याची उंची आहे असें शिखर म्हणजे K २ अर्थात मौंट गॉडविन् ऑस्टेन हें २८२५० फूट उंचीचें शिखर पश्चिम हिमालयांतील काराकोरम रांगेंत आहे. कांचनजंगा, नंदादेवी, कामेट व नंगा पर्वत हीं हिमालयांतील शिखरेंही प्रसिद्ध आहेत. हिमालयाच्या दक्षिण बाजूच्या पायथ्याजवळच्या टेकड्या सुमारे तीन हजार फूट उंच आहेत. त्या पलिकडे बहिर्हिमालयांतील डोंगरांची उंची सुमारें दहा हजार फुटापर्यंत आहे. या रांगेंतच सिमला, मसूरी, नैनीताल वगैरें थंड हवेचीं ठिकाणें आहेत. याच्या पलिकडची रांग म्हणजे खरा हिमालय. यांतील डोंगरांची उंची दहा हजार ते पंचवीस हजार फूट आहे. हिमालयाच्या दक्षिण बाजूवर नेपाळ, सिक्कीम,

व भूतान हीं छोटीं राज्यें आहेत. परकीयांना आपल्या राज्यांत पाय ठेवूं न देण्याबद्दल नेपाळ व तिबेट या दोन्ही देशाचा फार कटाक्ष आहे. एव्हरेस्ट पर्वताची दक्षिण बाजू नेपाळमध्यें व उत्तर बाजू हिमालयाच्या उत्तरेस असणाऱ्या तिबेट देशांत मोडते. हिंदुस्थान व तिबेट या दोन देशांमध्यें, ज्यावरून दळणवळण होतें अशा अनेक पायवाटा हिमालयांत आहेत. त्या ज्या खिंडींतून जातात त्या बहुतेकांची उंची पंधराहजार फुटापेक्षां अधिक आहे. त्यामुळें हिंदुस्थान ते तिबेट हा प्रवास अगदीं खडतर आहे. पंजाबांतील सुप्रसिद्ध पांच नद्या सतलज, रावी, चिनाब, झेलम व बिआस् व महानदी सिंधू आणि बंगालच्या उपसागरास मिळणाऱ्या गंगा, यमुना व ब्रह्मपुत्रा या मोठ्या नद्या हिमालयांत उगम पावतात. हिमालयांतून खालीं येतांना, वितळलेल्या हिमाचें निर्मळ जळ त्या आपल्याबरोबर आणतात. श्रीक्षेत्र हरिद्वार येथें गंगा हिमालयांतील उतरणीवरून उतरून मैदानावर वाट चालूं लागते. तेथें गंगेच्या प्रवाहांतील पाणी स्वच्छ व रुचकर आहे.

हिमालयांतील सृष्टिशोभेचें व वनश्रीचें वर्णन अनेक लेखकांनीं आपापल्या ग्रंथांतून केलेलें आहे. जी सृष्टिशोभा पाहण्यासाठीं युरोप व अमेरिका येथून प्रवासी येतात त्या सृष्टिशोभेची पुरेशी कल्पना वर्णन वाचून येणार नाहीं. ती प्रत्यक्षच पहायला हवी. हिमालयांतील उंच डोंगरावर पडलेल्या शुभ्र हिमाचें वर्णन वाचतांना गंमत वाटते. परंतु मसूरी, सिमला किंवा दार्जिलिंग अशा एखाद्या ठिकाणीं जाऊन क्षितिजावरील हिमावृत पर्वताची शुभ्र व चकाकणारी रेषा प्रत्यक्ष पाहिल्यावर मनाला अपूर्व आनंद होतो व असा देखावा पहाण्याचें भाग्य मिळाल्याबद्दल स्वतःला धन्य वाटतें. दार्जिलिंग येथील टायगर हिल या पॉइंटवरून सूर्योदयाच्या वेळेस दिसणारा देखावा तर जगप्रसिद्ध आहे. दार्जिलिंगला जाणारा प्रत्येक हौशी प्रवासी मोठ्या पहांटे उठून त्या पॉइंटवर जातो. तेथील निसर्गनिर्मित चित्रपट पहातांना त्याचे डोळे दिपून जातात. त्या देखाव्याची आठवण त्याला

जन्मभर रहाते. आकाशांत तांबडें फुटूं लागतें तेव्हां हळूंहळूं एकामागून एक याप्रमाणें उंच शिखरें, त्यांच्या खालचीं उपशिखरें व नंतर खालचीं उपशिखरें व नंतर खालच्या दऱ्या प्रकाशित होत जातात; दऱ्याखोऱ्यांतील अंधार नाहींसा होत जातो. क्षितिजावर सूर्य येण्याच्या सुमारास समोरील शिखरावर विविध रंगाच्या छटा येत असतात. शेवटीं सूर्य जेव्हां क्षितिजावर पूर्णपणें येतो, तेव्हां ती हिमावृत शिखरें मंदिरावरील सोन्याच्या कळसासारखी चमकूं लागतात. अशा वेळेस आकाशांत ढग असेल तर या चित्राला जास्तच शोभा येतें. दार्जिलिंगहून सुमारे चाळीस मैल दूर असलेल्या कांचनजंगा पर्वताचा शिखरसमूह तेथून फारच जवळ व डौलदार दिसतो. त्याच्या डाव्या बाजूस दूरवर असलेल्या एव्हरेस्टचेंहि तेथून दर्शन होतें. दार्जिलिंगहून, एव्हरेस्टपर्यंतचें नकाशावरील अंतर शंभर मैल आहे. इतकें दूर असल्यानें एव्हरेस्टच्या भव्यतेची कल्पना तेथून येत नाहीं. पण जें शिखर सर्व जगांत उंच आहे, ज्यावर पोंचण्याच्या प्रयत्नांत अनेक वीर प्राणास मुकले, व जें अजूनहि अजिंक्य राहिलें आहे असें तें शिखर दृष्टीस पडल्यावर मनांत विचारांची गर्दी होते.

हिमालयाची उत्पत्ति कशी झाली याचें भूगर्भ शास्त्रज्ञांनीं जें निदान केलेलें आहे, तें विस्मयकारक आहे. हिमालयाची शास्त्रीय दृष्टीनें पाहणी करून त्यांनीं असें ठरविलें आहे कीं पृथ्वीच्या दीर्घकालच्या मानानें हिमालयाची उत्पत्ति अगदीं अलिकडची म्हणजे सुमारें पन्नास कोटी वर्षांपूर्वीची आहे. आज हिमालय जेथें आहे तेथें त्यापूर्वीच्या काळांत पाणी होतें. किंवा दुसऱ्या शब्दांत सांगायचें म्हणजे हिमालय समुद्राच्या तळाशीं होता. पृथ्वीची उष्णता कमी होऊं लागल्यानें पृथ्वीच्या बाहेरचा पृष्ठभाग आकुंचन पावूं लागला. त्या आकुंचन पावण्याच्या क्रियेंत, जवळपासच्या पृथ्वीच्या पापुद्र्याच्या दाबामुळें हिमालयाचा भूभाग हळुं हळूं वर येऊं लागला. ही वर येण्याची क्रिया लाखों वर्षें चालू राहिली. भूगर्भ शास्त्र-

शांच्या मतें ती अजूनही चालू आहे. सुमारें तीस कोटी वर्षांपूर्वी हिमालयाची वाढ परिपूर्ण झाली. कांहीं कांहीं ठिकाणीं वर उचलण्याची क्रिया विशेष जोरानें झाल्यानें त्या ठिकाणचा भूभाग फारच उंच उचलला गेला. पुढें त्यावर हवेचा व पावसाचा परिणाम होऊन तेथें शिखरसमूह निर्माण झाले. एव्हरेस्ट व कांचनजंगा याही शिखरसमूहांची उत्पत्ति अशा तऱ्हेनें झाली.

या शिखरांपाशीं जाण्यास हिमालयाच्या पायथ्याच्या दऱ्याखोऱ्यांतील दाट जंगलांतून जावें लागतें. पूर्व हिमालयांतील खोऱ्यांची समुद्र सपाटीपासून उंची फारच थोडी म्हणजे चारशें पांचशें फूट आहे. येथें पाऊस खूप पडतो. त्यामुळें तेथील हवा दमट व उष्ण असून तेथील जंगलें दाट आहेत. त्या जंगलांत हजारों प्रकारचे रानटी प्राणी व पक्षी आढळून येतात. पश्चिम व उत्तर हिमालयांतील हवा यापेक्षां थंड आहे, व तेथें पाऊसही इतका पडत नाहीं. त्यामुळें तेथील जंगलें एवढीं दाट नाहींत. पण तेथें सुद्धां नाना प्रकारचीं फुलझाडें व पक्षी आहेत. एव्हरेस्ट व कांचनजंगा या विख्यात शिखरांना जाण्याचा मार्ग सिक्कीमच्या राज्यांतून आहे. सिक्कीमचें छोटें राज्य टिस्टा नदीच्या खोऱ्यांत वसलेलें आहे. टिस्टा नदी खूप उंचीच्या पहाडांतून आपला मार्ग काढीत खालीं येते. टिस्टेच्या आजुबाजूच्या डोंगरांची उंची आठ दहा हजार फूट आहे, तर टिस्टा नदीच्या चिंचोळया खोऱ्याची उंची समुद्र सपाटीपासून हजार फुटांपेक्षां जास्त नाहीं. या नदीच्या खोऱ्यांतील दाट जंगलांत दोनशें फूट उंचीचे, मोठे वृक्ष आहेत. वेलींच्या जाड दोरांनी त्यांना जखडून टाकलें आहे. ओक, साल, देवदार, व साग हे वृक्ष व बांबूचीं बेटें यांच्या गर्दीत नाजुक फुलझाडें नेचे व वेलीं यांची विपुलता आहे. या गर्दीमधून खडकावरून व दगडांवरून जोरानें वाहत जाणारा व खळखळ आवाज करणारा टिस्टेचा प्रवाह वाहतो. त्याला साथ देणारा पक्षांचा किलबिलाट चालू असतो. या दमट जंगलांत

फुलपांखरें, रातकिडे यांची जशी गर्दी आहे, तसाच डांस चिलटें, माशा व जळवा यांचाही त्रास आहे. टिस्टा नदीचें खोरें सोडून वर गेलें म्हणजे जंगल कमी होत जातें. तेरा हजार फुटावर बर्च, सिल्व्हर, फर वगैरे वृक्ष, व रोडोडेंड्रॉन, जिरेनियम्, प्रायमुला वगैरे फुलझाडें आढळून येतात. याहून वर हिमाच्या रेषेजवळ जाऊं लागलें म्हणजे झाडी कमी होऊं लागते. तेथें फक्त खुरटी झुडपेंच नजरेस पडतात. खालच्या दमट जंगलांत साप, विंचू वगैरे प्राणी आहेतच, पण सर्वांत त्रास देणारे प्राणी म्हणजे जळवा. जाड पायमोजे व बूट घातले तरी कोठून तरी आंत शिरून त्या पायाला चिकटून रक्तशोषण करितात. त्यांनीं चालविलेलें रक्तशोषण बराच वेळ ध्यानांत येत नाहीं. कांहीं वेळानें रक्ताचा ओघळ दिसूं लागला म्हणजे त्यांच्या अस्तित्वाची कल्पना येते. हिमालयाच्या पायथ्याच्या जंगलांतून या जळवांचा फार सुळसुळाट आहे.

सोळाशें मैल लांब पसरलेल्या या हिमालयाच्या खोऱ्यांतून निरनिराळ्या जातींचे लोक राहतात. सिक्कीममध्यें लेपचा जातीचे लोक आहेत, तर नेपाळमध्यें गुरखा व शेरपा जातीचे लोक राहतात. काश्मीरमधील हिमालयांत, व काराकोरमच्या पायथ्याशीं हुंझा व बाल्टी जातीच्या लोकांची वस्ती आहे. यापैकीं शेरपा लोक शौर्य, दमदारपणा, व काटकपणा या गुणांमुळें, एव्हरेस्ट व इतर शिखरांवरील मोहिमेंत भारवाहकांचें काम करणाऱ्यांत विशेष प्रसिद्ध झाले आहेत. त्यांची वस्ती नेपाळमधील एव्हरेस्टच्या दक्षिण बाजूस असलेल्या तेरा हजार फूट उंचीच्या खोऱ्यांतील सोलाखंबू या गांवच्या आसपास आहे. शेरपा हे जरी नेपाळचे प्रजाजन असले तरी ते मूळचे तिबेटी होत. ते आपसांत एक प्रकारची तिबेटी भाषा बोलतात. उंच पहाडांवर ओझीं वाहण्याची त्यांना लहानपणापासून संवय असते. तिबेटला जाण्याचा एक मार्ग १९०००

फूट उंच असलेल्या नंग्पाळा या खिंडींतून जातो. त्या मार्गानें ते पाठीवर ओझीं वाहून नेतात. सामान्य माणसाची, विशेषतः सखल प्रदेशांत राहणाऱ्या माणसाची पर्वतावर सुटे चढतानांच दमछाक होते; तर ओझें घेऊन चढणें दूरच राहिलें. पण ओझीं वाहण्याची संवय असलेला शेरपा मनुष्य, उंच पर्वतावर दमदारपणें ओझीं वाहून नेतो, एवढेंच नव्हे तर, असें कष्टकारक काम केल्यावरही आपली खेळकर व हंसरी वृत्ति कायम ठेवूं शकतो. या गुणामुळें एव्हरेस्ट मोहिमेकरितां भारवाहक म्हणून प्रामुख्यानें शेरपांचीच निवड करण्यांत येते. एरवीच्या काळांत हे लोक चहाच्या मळ्यांत मजुरी किंवा दार्जिलिंग येथें हमालीचें किंवा रिक्शा ओढण्याचें काम करितात.

उंच शिखरांवरील मोहिमांत भारवाहकांचें काम करणारी दुसरी एक दमदार जात ' भुतिया ' लोकांची आहे. हे लोक तिबेटी असून, तिबेटमधील चुंबी खोऱ्यांत राहतात. तिबेटच्या पठारावर थंडीवाऱ्यांत नेहमीं राहिल्यानें त्यांना उंच पर्वतावरील थंडीचा विशेष त्रास होत नाहीं. ओझीं वाहण्यांतही ते पटाईत आहेत. शेरपा व भुतिया हे लोक धर्मानें बौद्ध आहेत. एव्हरेस्टवरील अनेक मोहिमांत भाग घेतल्यानें त्यांनाही एव्हरेस्टवरील गिर्यारोहणाबद्दल आवड उत्पन्न झालेली आहे. एव्हरेस्टचें शिखर गांठण्याची ब्रिटिश गिर्यारोहकांना जितकी तीव्र इच्छा आहे तितकी शेरपा व भुतिया भारवाहकांनाही आहे. हिमालयांतील शिखरावर मोहीम करण्याकरितां दार्जिलिंग येथें एखादें पथक येणार आहे असें कळतांच हे लोक भारवाहकाचें काम मिळविण्याकरितां मोठ्या हौसेनें दार्जिलिंगला जमा होतात. मोहिमेंत ओझीं वाहण्यासाठीं युद्धापूर्वीच्या काळांत त्यांना सव्वा रुपया रोज मिळत असे. पायथ्यापाशीं पोंचल्यानंतर एवढा पगार मिळून वर शिधा मिळत असे. पगाराचें हें प्रमाण विशेष आकर्षक नव्हतें. पण मोहिमांतून उंच ठिकाणीं ओझीं वाहून नेणें, शेरपा लोकांत मानाचें व शौर्याचें

समजलें जातें. तो मान व शाबासकी आपणास मिळावी म्हणून काम करण्यासाठीं ते हौशीनें मोहीमेंत सामील होतात. अनेक लोकांतून सुदृढ व काटक लोकांनाच भारवाहक म्हणून निवडण्यांत येतें. कांहीं विशेष उंचीवर ओझीं वाहून नेलीं किंवा धाडसाचें कृत्य केलें तर त्यांना प्रशंसापत्रें व बक्षिसें मिळतात. भारवाहकांपैकीं कांहीं जणांनीं हिमालयांतील गिर्यारोहणाच्या इतिहासांत उल्लेखनीय अशी शौर्याची व इमानीपणाची कृत्यें केली आहेत. त्यांचीं वर्णनें पुढें योग्य ठिकाणीं येतीलच.





## एव्हरेस्ट दर्शन : : ४

शंभर वर्षांपूर्वी गंगोत्री, जम्नोत्री इत्यादि पवित्र स्थळांखेरीज, हिमालयांतील नद्यांची, दऱ्याखोऱ्यांची शिखरांची, व बर्फप्रवाहांची माहिती जगाला नव्हती. तिबेट आणि नेपाळ हे दोन्ही देश परदेशीयांना व विशेषतः पाश्चिमात्यांना आपल्या देशांतून संचार करूं देण्याच्या विरुद्ध होते. शिवाय दळणवळणांच्या साधनांचा अभाव असल्यानें हिमालयाच्या अंतर्भागांत एखाद दुसरा धाडसी शोधक-प्रवाशांखेरीज कोणी जात नसत. अशा शोधक- प्रवाशांनीं जी माहिती मिळविली ती सुद्धां त्रोटक स्वरुपाची होती. अखिल जगांतील उंच शिखर हिमालयांत आहे याची कल्पनासुद्धां सन १८५२ पर्यंत कुणाला नव्हती. या शिखराचा शोध लागला तो प्रसंग छोटासाच पण उल्लेखनीय आहे. हिंदुस्थान सरकारच्या सर्व्हे ऑफ इंडिया या खात्यानें सन १८०० मध्यें जमीन मोजणीच्या कामाला सुरवात केली. हिंदुस्थानांतील सखल प्रदेशाची मोजणी झाल्यावर त्यांनीं हिमालयाचे डोंगर व दऱ्याखोरीं यांची पाहणी व मोजणी करण्याचें काम अंगावर घेतलें. हें काम कष्टाचें होतें. मोजणी करण्यासाठीं, उंच उंच डोंगरांवर त्यांना निशाणें व मोजणीची यंत्रें घेऊन जावें लागत असे. अशा ठिकाणीं, तीव्र

थंडीमुळें हाताचीं बोटें गारठून जात, व उंचीवरच्या विरळ हवेमुळें श्वासोच्छ्वास करण्यास त्रास होऊन थकवा येत असे. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जातांना वाटेंत चिंचोळया पण प्रचंड वेगानें वाहाणाऱ्या नद्या आडव्या येत. त्यांतून पलीकडे जाणें म्हणजें दिव्यच असे. डोंगरी किल्ल्यावर सहलीला जाऊन आलेल्यांना उंच डोंगरांतील पायवाटा किती कठिण व धोक्याच्या असतात याची कल्पना येईल. अशा वाटांनीं, आपलीं नाजुक यंत्रें त्यांना न्यावीं लागत. अशा अडचणींतून काम चालू ठेवून सर्व्हेखात्यानें सन १८५२ पर्यंत हिमालयाचा बहुतेक भूभाग नकाशावर आणिला होता. त्यामध्यें एका शिखराला " शिखर नंबर पंधरा " असें साधें नांव होतें. हिमालयाच्या अंतर्भागांत असल्यानें व त्याच्या आसपासही उंच डोंगर असल्यानें त्या शिखराकडे कोणाचें फारसें लक्ष गेलें नव्हतें. एके दिवशीं राधानाथ सिकदार नांवाचा सर्व्हेखात्यांतील एक मोजणीदार या शिखरासंबंधीची माहिती चाळीत असतां, त्याला एक शंका आली म्हणून त्यानें पुन्हां नीट आंकडेमोड करून पाहिली. तेव्हां त्याची खात्री झाली कीं, आतांपर्यंत मोजलेल्या सर्व शिखरांपेक्षां हें पंधरा नंबरचें शिखर उंच आहे. तो धांवतच आपल्यावरचे अधिकारी सर अँड्र्यू वॉघ यांच्या खोलींत गेला व म्हणाला, " साहेब, जगांतील सर्वांत उंच पर्वत मी शोधून काढला आहे. " त्यानंतर यंत्राच्या साहाय्यानें त्या पंधरा नंबराच्या शिखराची उंची पुन्हां मोजण्यांत आली व ती २९००० फूट भरली. ( त्यानंतरच्या काळांत पुन्हां बारकाईनें मोजणी होऊन एव्हरेस्टची उंची २९१४५ फूट निश्चित् करण्यांत आली आहे. ) त्या शिखराला तद्देशीय कांहीं नांव आहे याची माहिती न मिळाल्यामुळें त्या काळचे सर्व्हेअर जनरल ऑफ इंडिया सर जॉर्ज एव्हरेस्ट यांचें नांव देण्यांत आलें. एव्हरेस्टवर गेलेल्या गिर्यारोहकांना पुढें या शिखराचें तिबेटी नांव समजलें. तिबेटी लोक त्याला चामोलांग अर्थात हिमदेवी असें म्हणतात. हें नांव कितीतरी सुंदर आहे ! परंतु त्या शिखरावर चढून

जाण्याच्या धाडसी प्रयत्नामुळें त्या शिखराशीं एव्हरेस्ट हें नांव पूर्णपणें निगडित झालें आहे. उच्च ध्येय गांठण्यासाठीं धडपड करण्याचा जो मानवी स्वभाव आहे त्याचें एव्हरेस्ट हें प्रतीक होऊन बसलें आहे. त्यामुळें तें नांव बदलण्याचा प्रयत्न करण्यांत अर्थ नाहीं. एव्हरेस्ट हें नांव घेतलें कीं, प्राणाची पर्वा न करितां, पराक्रमाची पराकाष्ठा करून पंचमहाभूतावर मात करूं पाहणाऱ्या मानवाची मूर्ति डोळ्यापुढें उभी राहतें.

एव्हरेस्टची मोजणी करून त्याचें जगांतील अत्युच्च स्थान निश्चित करण्यांत आलें तेव्हांपासून एव्हरेस्टच्या महाकाव्याला आरंभ झाला असें मानण्यास हरकत नाहीं. कुणाचाही घातपात न करितां आपल्या अंगांतील बळ पराकोटीला नेऊन केवळ पर्वताशीं झुंजत, अतीव थंडी व तुफान झंझावात यांचा मारा सहन करीत, हिमप्रपाताखालीं सांपडण्याचा, व बर्फावृत उतरंडीवरून घसरण्याचा धोका पत्करीत,—"आपण जाऊं शकलों नाहीं तर निदान दुसरें कुणीतरी वरती पोंचावें," अशी इच्छा करणाऱ्या गिर्यारोहकांचें हें महाकाव्य श्रवणीय आहे. धाडसाची व स्वार्थत्यागाचीं कामें करून ज्यांनीं आपली नांवें एव्हरेस्टच्या हिममय भिंतीवर कोरून ठेविलीं आहेत, अशा व्यक्तींची स्फूर्तिदायक चरित्रें, पंचमहाभूतांच्या उग्र स्वरूपामुळें झालेल्या मनुष्यहानींचे करुणरम्य प्रसंग, काळरात्रींनंतरच्या पुनर्भेटीचे हळुवार व आनंददायक प्रसंग, हिमाचलांतील विविध देखाव्यांची दृश्यें यांनीं हें महाकाव्य भरलेलें आहे. सकृद्दर्शनीं अशक्य वाटणाऱ्या गोष्टी, हिंमत व निर्धार या दोन गुणांच्या जोरावर माणसाला कशा शक्य होतात याची अनेक उदाहरणें या गिर्यारोहणाच्या इतिहासांत आढळतील.

एव्हरेस्टवर—जगांतील सर्वांत उंच शिखरावर चढण्याची कल्पना कुणाच्या डोक्यांत प्रथम आली हें नक्की सांगतां यायचें नाहीं. ही कल्पना पुढें यायला अनेक गोष्टी व व्यक्ती कारणीभूत झाल्या. गिर्यारोहणाचा प्रसार जसजसा वाढत गेला तसतशीं हळुहळु ही कल्पना निरनिराळ्या

माणसांच्या मनांत आली. या कल्पनेसंबंधीं जास्त विचार होऊन ती मूर्त-स्वरूपांत येईपर्यंत अनेक वर्षे गेलीं. मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें आल्प्समधील शिखरें पालथीं घातल्यावर गिर्यारोहकांचें लक्ष हिमालयाकडे वळलें, व त्यांनीं हिमालयांत गिर्यारोहणास सुरवात केली. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापूर्वी श्लागिनवेरो नांवाचा गिर्यारोहक कामेट पर्वतावर २२००० फुटापर्यंत जाऊन आला. बुलॉक वर्कमन यानें काराकोरममध्यें २३००० फुटाची उंची गांठली. नंगा पर्वतावर गिर्यारोहण करीत असतां ममरी नांवाचा गिर्यारोहक नाहींसा झाला. त्याचें काय झालें कुणाला कळ-लेंच नाहीं. अलीकडे म्हणजे सन १९१९ मध्यें ड्यूक ऑफ ॲब्रुझी या धाडसी गिर्यारोहकानें ब्राइडपीक नांवाच्या २५००० फूट उंचीच्या शिखरावर जाण्याचा प्रयत्न केला होता. धुक्यामुळें त्याला शिखरावर पोहोंचतां आलें नाहीं तरी तो २४६०० फुटावर जाऊन आला होता. ड्यूक ऑफ ॲब्रूझी-बरोबर डॉ. फिलिपी नांवाचा दुसरा एक गिर्यारोहक होता. आल्प्समधील गिर्यारोहणापेक्षां हिमालयांतील गिर्यारोहण किती कठीण आहे याचें त्यानें वर्णन केलें आहे. आल्प्सपेक्षां हिमालय कितीतरी मोठा व उंच आहे. हिमालयाच्या भव्य स्वरुपामुळें शिखरांची उंची, दऱ्यांची खोली, खोऱ्यांची लांबी इत्यादींचा योग्य अंदाज, हिमालयांत नव्यानें प्रवास करणाऱ्यांना येत नाहीं. समोर दिसणारें शिखर खूप उंच असेल असें प्रथम वाटत नाहीं. पण तें चढून जाऊं लागलें म्हणजे चांगली कल्पना येते. हिमालयांतील बर्फ आल्पस्पेक्षां जास्त चिवट आहे. त्यामुळें हिमालयांत कड्यावरून अधांतरी लोंबणारे बर्फप्रवाह आढळून येतात. असे हे अधांतरी बर्फप्रवाह कोसळून हिमप्र-पात होण्याची भीति असते. या उलट, डोंगरांच्या कण्यावर बर्फ सांठतें तें कांहीं वेळां, हात लावल्याबरोबर ढासळून जाईल इतकें ठिसूळ असतें. या खेरीज हिमालयांतील हवामानही उग्र आहे. त्यामुळें हिमालयांत गिर्यारोहण करायचें म्हणजे अगदीं कसोशीनें व पूर्ण तयारी करून जावें लागतें.


हिमालयांतील शिखरें दाखविणारा
हिंदुस्थानचा नकाशा
मैल
० १०० २०० ३००
के२
नंगा पर्वत
काश्मिर
सिंधु
कैलास
कामेट
नंदादेवी
सतलज
दिल्ली
राणीखेट
अलमोरा
नेपाळ
एव्हरेस्ट
ब्रह्मपुत्रा नद
सिक्कीम
कांचन जंगा
भूतान
दार्जिलिंग
गंगानदी
बंगालचा
उपसागर

प्रख्यात गिर्यारोहक स्माइद यानें म्हटल्याप्रमाणें हिमालयापाशीं विनम्र होऊनच गेलें पाहिजे. हिमालयाचे सौंदर्य, त्याची भव्यता, व त्याची शक्ति यांच्याबद्दल आदर बाळगून तुम्ही हिमालयापाशीं गेलांत तर तो तुम्हालाँ नीट वागवील. तेंच पूर्ण तयारी न करितां, माहिती न घेतां, किंवा बेफिकीर वृत्तीनें, तेथें पाऊल टाकाल तर हिमालय तुम्हाला शिक्षा केल्याखेरीज राहणार नाहीं.

अशा या हिमालयांतील अत्युच्च शिखरावर चढून जाणें शक्य होतें काय ? याची कुणालाच कल्पना नव्हती. पर्वताची घडण कशी काय होती, तें कुणाला माहित नव्हतें. तेथील हवामानाचा अंदाज लोक कल्पनेनेंच करीत होते. पण असें असलें तरी एव्हरेस्टबद्दल गिर्यारोहकामध्यें उत्सुकता वाढत होती. एकीकडे चिकित्सक म्हणत होते, ' अठ्ठावीस हजार फुटावर पोहोंचल्यावर मनुष्य जिवंत राहणार नाहीं. समुद्र सपाटीपासून पांच सहा मैल उंच अशा ठिकाणीं हवा इतकी विरळ असणार कीं माणसाला श्वासोच्छ्वास करणें अशक्य होईल. उंच उड्डाण केल्यावर वैमानिकाची नाहीं कां कठिण अवस्था होत ? " " होय " गिर्यारोहक उत्तर देत होते. कबूल आहे. पण वैमानिक खालच्या दाट वातावरणांतून एकदम थोड्या अवकाशांत विरळ हवेंत जातो. त्यामुळें त्याला ती असह्य होतें. गिर्यारोहकाचें तसें नाहीं. तो हळू हळू चढत गेल्यानें त्याला विरळ होत जाणाऱ्या हवेची संवय होत जातें. पूर्वी आल्पस्मध्यें वीस हजार फुटांवर सुद्धां जगतां येईल कीं नाहीं अशी शंका लोकांना वाटतच होती ना ? पण कित्येक गिर्यारोहक २४००० फुटापर्यंत जाऊन आलेले आहेत. तसेंच २९००० फुटांवर जाणेंही शक्य होईल. प्रयत्न करण्यास काय हरकत आहे ? " याप्रमाणें इंग्लंडमध्यें उलट सुलट विचार प्रवाह होते.

शक्य तितक्या जवळून एव्हरेस्ट पर्वत पहावा असा बेत करून सन १९१३ मध्यें कॅप्टन नोएल नांवाचा एक शोधक–प्रवासी हिमालयांतील

लंग्बू खिंडीपर्यंत जाऊन पोहोंचला. तेथें उभा राहिल्यावर त्याला जो देखावा दिसला तो अप्रतिम होता. त्याच्यासमोर धुक्याच्या रेषेच्या वर एकापेक्षां एक मोठमोठीं हिमशिखरें उभीं होतीं. सर्वांच्या मागें एक अत्युच्च शिखर दिसत होतें. नाटकाचा ड्रॉपचा पडदा बाजूला व्हावा तसें एकाएकी धुकें दुभंगून नाहींसें झालें, आणि आतां तोच देखावा त्याला स्पष्टपणें व शोभायमान होऊन दिसूं लागला. त्या सर्वांत उंच असलेल्या शिखराच्या टोंकावरून उडणाऱ्या हिमामुळें बनलेली एक लांब शुभ्र पताका फडफडत असलेली दिसत होती. त्या शिखराचें दृश्य इतर सर्व शिखरांच्या मानानें भव्य दिसत होतें. औत्सुक्यातिरेकानें त्यानें होकायंत्र डोळ्याशीं धरून पाहिलें. त्याचा अंदाज बरोबर होता. तें अत्युच्च शिखर दुसरें तिसरें कोणचें नसून एव्हरेस्टचेंच होतें. एव्हरेस्टचें दर्शन इतक्या जवळून–चाळीस मैलांवरून, तिबेटी व नेपाळी लोकांशिवाय अद्याप कोणीहि घेतलेलें नव्हतें.

या प्रसंगानंतर एव्हरेस्टवर जाण्याचे विचार कॅप्टन नोएलच्या मनांत घोळूं लागले. एव्हरेस्टकडे आकर्षित झालेली दुसरीहि एक व्यक्ति होती. तिचें नांव डॉ. केलास. सुट्टीच्या दिवसांत हिमालयांत भ्रमण करायचा या डॉक्टरास छंद होता. हिमालयाच्या अंतर्भागांत शिरून लहानमोठ्या शिखरांवर गिर्यारोहण करण्याची त्याला हौस होती. डोंगरपायथ्यापर्यंत खेचरें व याक यांच्यावर सामान लादून न्यायचें व पायथ्यापासून वरच्या चढणीवर ओझीं वाहण्याकरितां तद्देशीय भार वाहकांना न्यायचें या पुढें एव्हरेस्टवर अंमलांत आणलेल्या पद्धतीचा त्यानेंच प्रथम अवलंब केला. नेपाळ व तिबेट या दोन देशांकडून प्रवास करण्याची परवानगी न मिळाल्यास, एव्हरेस्टकडे जाण्याचा एक मार्गहि त्यानें आंखून ठेवला होता. एव्हरेस्टवर जाण्याची इतकी जबरदस्त महत्वाकांक्षा त्याला होती कीं, ब्रिटिश व तिबेटी सरकारच्या मनाईविरुद्ध गुप्तपणें एव्हरेस्टवर चढाई करण्याची त्याची तयारी होती. परंतु

पहिलें महायुद्ध सुरू झाल्यानें त्याचा हा बेत सफल झाला नाहीं. युद्ध संपल्यानंतर पुढें त्याला उघडपणें तिकडे जातां आलें. पण एव्हरेस्टवर पाय ठेवणें त्याच्या नशिबांत नव्हतें. सन १९२१ च्या एव्हरेस्ट पथकाबरोबर प्रवास करीत असतां तिबेटमध्यें त्याला मृत्यू आला.

जनरल ब्रूस व सर फ्रान्सिस यंगहजबंड या दोघां सेनाधिकाऱ्यांनीं एव्हरेस्ट जवळील प्रदेशांत प्रवास करण्याची योजना आंखली होती. पण तिबेटचें राजकीय धोरण परकीयांना तिबेटांत शिरूं न देण्याचें असल्यानें, व त्या धोरणाविरुद्ध जाऊन आंतरराष्ट्रीय बेबनाव उत्पन्न करण्याची ब्रिटिश सरकारची इच्छा नसल्यानें कित्येक वर्षें ही योजना पार पाडण्यास हिंदुस्थान सरकारकडून त्यांना परवानगी मिळत नव्हती. सन १९१९ मध्यें कॅप्टन नोएलनें इंग्लंडमधील रॉयल जिऑग्रॉफिकल सोसायटीपुढें भाषण करून हिमालयांतील आपल्या प्रवासाचें वर्णन केलें. तेव्हांपासून पुन्हां या प्रश्नाला चालना मिळाली. त्यापूर्वी थोडे दिवस आधीं उत्तर व दक्षिण ध्रुवावर कांहीं धाडसी प्रवासी जाऊन आलेले होते. तेव्हां आतां धाडसी लोकांचें दुसरें उद्दिष्ट एव्हरेस्ट हेंच होतें. एव्हरेस्टवर लोक गेले तर नवी भौगोलिक व शास्त्रीय माहिती मिळेल असेंही जाणत्या लोकांना वाटूं लागलें.

त्यानंतर थोड्याच दिवसांत सर फ्रान्सिस यंगहजबंड हे रॉयल जिऑग्रॉफिकल सोसायटीचे अध्यक्ष झाले. आपल्या अध्यक्षीय कारकिर्दीत एव्हरेस्टवरील मोहिमेच्या योजनेचा पाठपुरावा त्यांनीं केला. या मोहिमेसंबंधीं लोकांत जागृति करण्याचें, व मोहिमेची पूर्वतयारी करण्याचें कार्य त्यांच्याइतकें दुसरें कोणी केलें नसेल. सर फ्रान्सिस यांचा जन्म हिंदुस्थानांत झाला होता व त्यांनीं हिंदुस्थानांत सरकारी नोकरी केली होती. नोकरींत असतांना हिमालयांत प्रवास करण्याचे त्यांना वारंवार प्रसंग आले होते. हिंदुस्थानांतून तुर्कस्थानांत व तिबेट या देशांत जाण्याकरितां त्यांनीं अकरा वेळा हिमालय ओलांडला होता.

सन १९०४ सालीं तिबेटची राजधानी ल्हासा येथें जें पहिलें ब्रिटिश शिष्टमंडळ गेलें होतें त्यांत ते होते. त्यांचें हिमालयावर फार प्रेम होतें. हिमालयांतील लोकांविषयीं, त्यांच्या चालीरीतीविषयीं त्यांना फार माहिती होती. आपली आध्यात्मिक उन्नति करून घेण्याकरितां हिंदी लोकाप्रमाणें पाश्चिमात्यांनीं सुद्धां हिमालयांत यात्रा कराव्या असें त्यांनीं आपल्या 'एव्हरेस्ट दी चॅलेंज' या पुस्तकांत प्रतिपादिलें आहे. सर फ्रान्सिस यांचें ब्रिटिश सरकारांत वजन मोठें होतें. या सर्व गोष्टींमुळे एव्हरेस्ट गिर्यारोहणाचे महर्षि होण्यांस ते पूर्णपणें लायक होते. त्यांनीं अल्पाइन क्लबच्या सहकार्यानें "मौंट एव्हरेस्ट कमिटी" स्थापन केली; व सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया यांच्याकडे शिष्टमंडळ पाठविलें. त्याशिवाय, या दोन्ही संस्थांचें म्हणणें हिंदुस्थान सरकारला समजावून देण्याकरितां कर्नल हॉवर्डबरी यांना हिंदुस्थानांत पाठविण्यांत आलें. या प्रयत्नांना यश येऊन ल्हासा येथें जाऊन दलाइलामाची परवानगी घेण्याकरितां हिंदुस्थान सरकारनें सिक्कीमचे पोलिटिकल एजंट सर चार्लस बेल यांना पाठविलें. त्यांनीं आपली कामगिरी उत्तम प्रकारें बजाविली. त्यांचा दलाइलामाशीं चांगला परिचय होता. त्यांनीं ल्हासा येथें जाऊन दलाइलामाची गांठ घेतली, एव्हरेस्टवरील गिर्यारोहणाचा उद्देश समजावून सांगितला. तिबेटी मुलखावर आक्रमण किंवा ढवळाढवळ करण्याची ब्रिटिशांची इच्छा नाहीं अशी खात्री करून दिल्यावर दलाइलामानें एव्हरेस्ट मोहिमेला परवानगी दिली, आणि एव्हरेस्ट विभागांतील आपल्या अधिकाऱ्यांना खलिते पाठवून एव्हरेस्ट पथकाला शक्य ती मदत करण्याचे हुकूम सोडले.

ही परवानगी देतांना कांहीं अटी घालण्यांत आल्या होत्या. पहिली अट अशी होती कीं वनचरांना कुठलाही अपाय करतां कामा नये. तिबेटी लोकांत पशू व पक्षी यांच्याबद्दल स्नेहाची भावना असते. ज्या देशांतील कठोर हवामानामुळें जिवंत राहणें म्हणजे निसर्गाशीं अविरत झगडा आहे

त्या देशांत निसर्गाशी बरोबरीनें झगडणारे पशू व पक्षी यांजबद्दल माणसांत नेहभाव असणें साहजिक आहे. दुसरी अट अशी होती कीं पथकांतील लोकांनीं डोंगरांना अपाय करतां कामा नये. उदाहरणार्थ, संशोधनाकरितां, किंवा धातूंच्या खाणींचा शोध करण्याकरितां खडकाचे तुकडे फोडून नेतां कामा नये. तिबेटी लोकांच्या मतें असें खडक फोडले कीं देवाचा कोप होऊन अनर्थ होतो. सन १९२१ च्या मोहिमेंतील भूगर्भशास्त्रज्ञ हेरॉन यानें ही अट न जुमानतां खडक फोडून दगडाचे कांहीं नमुने बरोबर नेले. त्यामुळें देव कोपून तिबेटमध्यें रोगाची सांथ पसरली असा तिबेटी लोकांचा समज झाला. त्यामुळें तिबेटी सरकारनें हेरॉनला सन १९२२ च्या पथकाबरोबर तिबेटमध्यें येण्याची मनाई केली.

याप्रमाणें अटी ठरून परवानगी मिळाल्यावर इंग्लंडमध्यें मोहिमेसाठीं पैशाची व साधन सामुग्रीची जुळवाजुळव, व गिर्यारोहकांची निवडणूक करण्यांत एव्हरेस्ट कमिटीची तारांबळ उडाली. ती सर्व व्यवस्था होऊन एव्हरेस्टवर मोहीम करणारें पहिलें पथक कर्नल हॉवर्डबरी यांच्या नेतृत्वा-खालीं सन १९२१ च्या वसंत ऋतूंत इंग्लंडहून हिंदुस्थानांत आलें.

## दार्जिलिंग तें एव्हरेस्ट : : ४

एव्हरेस्ट पथक हिंदुस्थानांत दार्जिलिंगला येऊन पोहोंचलें. कलकत्या-पासून दार्जिलिंग ३६० मैलांवर आहे. हें शहर हिमालयांत सात हजार फूट उंचीवर वसलेलें असून त्याची लोकवस्ती सुमारें चाळीस हजार आहे. कलकत्यापासून सिलगुरीपर्यंत ब्रॉडगेजनें व सिलगुरीपासून माथेरान लाईट रेल्वेसारख्या छोट्या आगगाडींतून प्रवास करावा लागतो. सिलगुरीपासून दार्जिलिंगपर्यंतचा चाळीस मैलांचा प्रवास गमतीचा आहे. सिलगुरी सोडल्याबरोबर ही गाडी डोंगर चढूं लागते; व चाळीस मैलांच्या अंतरांत ५–७ हजार फूट उंच चढून जाते. वाटेंत चहाच्या मळ्यांतील चहाच्या छोट्या झाडांच्या लांबच लांब रांगा चित्ताकर्षक दिसतात. जसजशी उंची वाढत जाते तसतशी खालच्या मैदानावरील शेतें खूप खोल, व छोटीं छोटीं दिसूं लागतात. वर गेल्यावर हिमालयांतील थंडगार हवेच्या झुळकेनें आल्हाद वाटूं लागतो. गाडी एकसारखी वळणें घेत घेत धापा टाकीत चढत असते. ( १९२४ च्या पथकाचा नेता जनरल ब्रुस हा दार्जिलिंगला जात असतां गाडींतून उतरून, पळत पळत वरती चढून जाऊन गाडी वळण घेऊन वर येण्याची वाट पाहात असे. ) मधुन मधुन झाडी कमी झाली कीं, ढगासारख्या दिसणाऱ्या दूरवरच्या हिमाच्छादित शिखरांचें

दर्शन गाडींतून होतें. कांहीं ठिकाणीं चढण इतकी उभी आहे कीं, इंजिनच्या पुढच्या बाजूला बसलेलीं दोन माणसें रुळावरून गाडी घसरू नये म्हणून रुळावर वाळू टाकतात. असा हा चढणीचा प्रवास केल्यावर गाडी दार्जिलिंगला येऊन थांबते. दार्जिलिंगची हवा आरोग्यवर्धक म्हणून प्रसिद्ध आहे. उन्हाळयांत उत्तर हिंदुस्थानांतील सधन लोक तेथें जाऊन राहातात. येथल्या बाजारांत रंगीबेरंगी व वेगवेगळया तऱ्हेच्या पोषाख केलेल्या निरनिराळया जातीच्या स्त्रीपुरुषांची गंमत दिसते. रुंद चेहरा, तिरपे डोळे, व गालाचीं हाडें वर असलेले तिबेटी लोक, सिक्कीममधील तपकिरी रंगाचे व सौम्य स्वभावाचे लेपचा लोक, नेपाळचे काटक शेर्पा, केसांची वेणी घालणारे भुतिया, चहाच्या मळयांत मजुरी करणाऱ्या आणि नाकांत व कानांत लांब लांब दागिने घालणाऱ्या नेपाळी बायका, भगवे पोशाख केलेले बुद्धभिक्षु असे निरनिराळया जातीचे व वंशाचे लोक तेथें दिसतात. पहाडावर राहाणाऱ्या या लोकांचें जीवित कष्टमय पण वृत्ति हंसरी व आनंदी असते.

दार्जिलिंगला पोहोंचल्यावर एव्हरेस्ट पथकाचें मुख्य काम म्हणजे भारवाहक किंवा ओझेवाले निवडून त्यांच्याशीं करार करणें, त्याशिवाय स्वयंपाक करण्यासाठीं व देखरेख करण्यासाठीं माणसें नेमायचीं हें होतें. पथकाचें सामान वाहून नेण्यासाठीं खेचरांच्या मालकाशीं करार करायचे होते. तिबेटांतील उंच प्रदेशांत गेल्यावर या खेचरांचा उपयोग होणार नव्हता. तेथें गवत कमी असल्यानें व थंडी तीव्र असल्यानें खेचरें काम देत नाहींत. त्याऐवजीं याक नांवाच्या प्राण्यांना वापरण्यांत येतें. हें पथक चार दिवस दार्जिलिंगला राहिलें. तेवढ्या अवधींत सामानाची मोजदाद करणें, निरनिराळया खेचरांवर वाहाण्याकरितां व भारवाहकांनीं वाहून नेण्याकरितां सामान वाटून देणें, दुभाषे नेमणें, मार्गांत टपालाची ने आण करण्याकरितां व्यवस्था करणें वगैरे कामें त्यांनीं उरकलीं. दार्जिलिंगहून ता. १८ मे रोजीं

हें पथक पुढें निघालें. त्यांत गिर्यारोहकांखेरीज दोन मोजणीदार, एक निसर्ग शास्त्रज्ञ, एक डॉक्टर, चाळीस भारवाहक व शंभर खेचरें एवढा समुदाय होता. नेपाळमधून जाण्याची परवानगी न मिळाल्यामुळें ते पूर्वेकडून वळसा घेऊन तिबेटांतील चोमलहारी पर्वताच्या डाव्या बाजूनें एव्हरेस्टच्या उत्तर पायथ्याकडे जाणार होते. तिबेटच्या पठारावरून अनेक मैल प्रवास करणें त्यांना अवश्य होतें.

निघाल्या दिवशींच पावसानें झोड उठविली. त्या पहिल्या पावसाला तिकडे छोटी बरसात म्हणतात. छोट्या बरसातीनंतर एक दीड महिन्यानें खऱ्या पावसाळ्याला सुरवात होतें. पावसामुळें त्यांची प्रगति मंद झाली व वाटेंत त्रासही खूप झाला. सिक्कीममधील नेहमींच्या दळणवळणाच्या मार्गानें ते जात होते. रस्त्याच्या बाजूनें ल्हासाला जाणारी टेलिग्राफची तार होती. या रस्त्यानेंच तिबेटांतून हिंदुस्थानांत विक्रीकरितां लोंकर आणितात. लोंकरीच्या गठ्ठ्यांनीं लादलेले खेचरांचे काफिले तिबेटांतून येत असतात. त्यांच्या गळ्यांतील मंजूळ घंटानादानें टिस्टानदीचें खोरें दुमदुमून जातें. नदीच्या खोऱ्यांतील सखल भागांतून जातांना तेथील दमट व उष्ण हवेमुळें कपडे घामानें चिंब होऊन जात होते. चिखलाच्या रस्त्यावर खेचरांचे पाय वारंवार घसरत होते. पावसामुळें जळवांचा सुळसुळाट झाला होता. फांद्यावरून टपकन् खालीं पडून खेचरांच्या अंगावर बसून त्या रक्त शोषूं लागत. याप्रमाणें मार्गांत जरी त्रास होता तरी मन रमून जाण्यासारखे निसर्गाचे देखावे भरपूर होते. अनेक रंगाच्या फुलझाडांमधून फुलपांखरें उडत होतीं. वाटेंत कांहीं ठिकाणीं दाट जंगलांतून मार्ग जात होता. दोन्ही बाजूला मोठमोठे वृक्ष, त्यांच्या फांद्यांवरून लोंबकळणाऱ्या सापासारख्या वेली, कुजलेल्या पानांच्या वासानें भरलेली कुंद हवा, रातकिड्यांची किरकिर व बेडकांचें गाणें यांच्यामधून ते चालत गेले. पुढें गेल्यावर, टिस्टा नदीवरील झुलत्या पुलावरून ते दुसऱ्या तीरावर गेले. त्या ठिकाणची समुद्रसपाटी-

पासून उंची केवळ ६०० फूट होती. कालिपाँग, व पेडाँग या मार्गानें ते सिक्कीमची राजधानी गँगटॉक येथें पोंहोचले. तेथें सिक्कीमच्या महाराजांचा राजवाडा आहे. गँगटॉक हें शहर डोंगराच्या कडेला उंचीवर वसलेलें आहे. त्याचा देखावा लांबून फारच सुंदर दिसतो. उंचीवर गेल्यावर दमट हवा नाहींशीं होऊन थंड व आल्हादकारक हवा मिळूं लागली. निसर्गानेंही कृपा-केल्यानें स्वच्छ सूर्य प्रकाश पडला होता. आतां ते ओक व मॅग्नोलिया या झाडांच्या राईतून जात होते. त्या प्रदेशांत आढळून येणारी रोडोडेंड्रॉन नांवाची फुलझाडें व त्यांची गुलाबी, किरमिजी, पिवळी, फिकट जांभळी अशी रंगारंगाचीं फुलें शोभून दिसत होतीं. सृष्टिशोभेच्या दृष्टीनें पाहातां जगांतील अतिशय सुंदर देशांत सिक्कीमची गणना होईल. पण आर्थिक-दृष्ट्या तो देश दरिद्री आहे. येथें सखल प्रदेश थोडा असल्यानें जेमतेम थोडेसें धान्य उगवतें. दुसऱ्या देशांत निर्यात करतां येण्याजोगी कोणतीच व्यापारी वस्तु येथें तयार होत नाहीं. तिबेट व चीन देश आणि हिंदुस्थान यांच्या दळणवळणाच्या मार्गावर हा देश असल्यानें याचें भौगोलिक स्थान मात्र महत्त्वाचें आहे.

पथक मार्ग आक्रमीत जेलाप खिंडीच्या माथ्यावर येऊन पोंहोचलें. सिक्कीम व तिबेट यांच्या सरहद्दीवर असणाऱ्या या खिंडीची उंची चवदा हजार फूट आहे. चोमलहारी हें २३९०० फूट उंचीचें शिखर येथून जवळच आहे. तें शिखर सूर्य प्रकाशांत तेजस्वी दिसत होतें. आतां त्यांनीं तिबेटमधील ज्या खोऱ्यांत प्रवेश केला होता, तें रमणीय होतें. निरभ्र आकाशांत टेकड्या व दऱ्या खुलून दिसत होत्या. रानटी फुलांचा वास दरवळत होता. वाटेवरील खेड्यांतील मातीच्या व तट्ट्याच्या झोंपड्या, नदीवर किंवा विहिरीवर पाणी भरणाऱ्या स्त्रियांची गर्दी, लहानशीं मंदिरें वगैरे दृश्यें पाश्चिमात्य गिर्यारोहकांना नवलाईची वाटत असल्यानें त्यांची

करमणूक होत होती. वाटेतील लहान मठांत, जुन्या ग्रंथांचे उतारे करीत असलेले, किंवा मातीचे बुद्धाचे पुतळे तयार करीत असलेले भिक्षु दिसत होते.

इतर राष्ट्रांच्या जीवनांत उलथापालथी व सुधारणा चालूं असतात. पण तिबेटी लोकांच्या जीवनांत आज अनेक शतकांत कांहीं फरक झालेला नाहीं. अतीव थंडी व पाऊसपाण्याचा अभाव, यामुळें तिबेटला निसर्गा-नेंच अगदीं उजाड व दरिद्री ठेवलें आहे. पण त्यामुळें तिबेटचा एक फायदा झाला. सुवर्णभूमि म्हणून प्रसिद्ध असलेल्या हिंदुस्थानावर जशा परकीयांच्या स्वाऱ्या झाल्या तशा तिबेटवर झाल्या नाहींत. त्याच्या वाटेला कोणी गेले नाहीं. तिबेट देश पंधरा हजार फूट उंचीवरील पठारावर असल्यानें, त्याला जगाचें छत म्हणतात. त्यांतील सखल भाग सुद्धां आपल्या कडील डोंगरांपेक्षा उंच आहेत. मध्य आशियांतून येणारे थंड व रुक्ष वारे तिबेटच्या पठारावर वाहातात. त्यामुळें हा देश अगदी उजाड आहे. तिबेटची राजधानी ल्हासा हिंदुस्थानच्या सरहद्दीपासून फारशी दूर नाहीं. पण एका हिमालयामुळें, अलाहाबादचें व ल्हासाचें हवापाणी यांत केवढा फरक पडला आहे ! तिबेटमध्यें झाडें अगदीं तुरळक आहेत. तीं तोडण्याविरुद्ध धार्मिक बंधन आहे, म्हणूनच कांहीं झाडें तिबेटमध्यें दिसतात. कांहीं ठिकाणीं ऊन पाण्याचे झरे आहेत. पण हवेंत गारठा असल्यानें ऊन पाण्याच्या झऱ्याजवळचें सांचलेलें पाणी गोठून गेल्याचें दृश्य आढळतें.

तिबेटची खनिज संपत्ति खूप आहे असें म्हणतात. उत्तर तिबेटमध्यें नद्यांच्या वाळूंत सोनें सांपडतें. परंतु दळणवळणाचे मार्ग कठीण असल्या-मुळें, व तिबेटच्या सत्ताधीशांचा विरोध असल्यानें, खनिज संपत्ति उकरून काढण्यांत अजून कांहींच प्रगति झालेली नाहीं. तिबेटची लोकसंख्या तीस लाख आहे. त्यांतील बहुतेक लोक ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यांत राहतात. तेथें फळें भाजीपाला व बार्ली यांचें उत्पादन होतें. उंच प्रदेशांत जे लोक रहातात त्यांचें जीवन मात्र कठीण असतें. खूप थंडीमुळें छोट्याशा झुडपाखेरीज,

तेथें कांहीं होत नाहीं. हीं झुडपें व गवत फक्त उन्हाळयांत वाढतात. तेथील लोक याक नांवाच्या बैलांचे कळप पाळतात, आणि लोंकरी कपडे व कांबळी विणणें, व मातीची भांडीं बनविणें इत्यादि व्यवसाय करितात. त्यांचें मुख्य खाणें म्हणजे याकचे मांस व चैनीचें पेय म्हणजे एक प्रकारचा चहा. या चहाची त्यांना फार आवड आहे. दिवसांतून वीसतीस भांडी चहा ते पितात. हा चहा तयार करण्याची पद्धत आपल्यापेक्षां फार वेगळी आहे. त्यांचा चहा चीनमधून वडयांच्या स्वरूपांत येतो. पाणी, सोडा, मीठ व तूप यांच्या मिश्रणांत तो उकळला जातो. उकळल्यावर तो कांहीं दिवस तसाच ठेवून देतात. त्याला वास येऊं लागला कीं, तो फर्मास चहा ते लाकडी पेल्यांतून गिटक्या मारीत पितात. आपल्याला हा चहा तोंडांतसुद्धां घ्यावासा वाटणार नाहीं. एव्हरेस्टवर जाणाऱ्या गिर्यारोहकांना मात्र, पाहुणे म्हणून त्यांना दिलेला चहा, सौजन्यादाखल प्यावा लागला. या चहाचा एक मोठा फायदा तिबेटी लोकांना होतो. त्यांत चरबी असल्यामुळें थंड हवेंत शरीर गरम राहाण्यास मदत होते. तिबेटमधील सर्वांत मोठा प्रश्न शीतनिवारण कसें करावें हा असतो.

या लोकांचीं घरें म्हणजे दगडमातीच्या कोठड्या असतात. त्यांत वारा येण्याची सोय मुद्दाम ठेवलेली नसते. जळणासाठीं ते याकच्या शेणाच्या गवऱ्या वापरतात. त्यांचा वास अनेक वर्षांत न धुतलेल्या कपड्यांच्या वासाबरोबर घरांत दरवळत असतो. अंगावर ते बोक्कस म्हणजे एक भला मोठा कांबळ्याचा कोट घालतात. त्या कोटावरून कमरेपाशी दोरी बांधलेली असते. हिवाळ्याच्या कडाक्यांत ते पोशतीन म्हणजे लोकरीसहित कातड्याचा कोट, लोकर आंतल्या बाजूला व कातडे बाहेर, अशा पद्धतीनें घालतात. आपल्याकडे पाकिस्तानांतील सरहद्दीवरील पठाण असेच पोशतीनीचे कोट हिवाळ्यांत वापरतात. या कोटांत उब फार असते. पण कांहीं दिवसांनीं त्यांना घाण येऊ लागते. तिबेटी लोकांत

स्वच्छतेचा फार अभाव आहे. अंघोळ केल्यानें अंगावरील सर्व छिद्रें मोकळी होऊन गार वाऱ्याचा जास्तच त्रास व्हायचा, म्हणून ते तसेंच तेलकट शरीर ठेवणें पत्करतात.

सर्वसाधारणपणें तिबेटी लोक उदार व गरीब स्वभावाचे आहेत. त्यांची राहाणी कष्टमय असली तरी ते आनंदी असतात. त्यांचे कायदे व न्यायदानपद्धती मध्ययुगीन आहेत. अपराध्यांकडून कबुली जबाब काढण्याकरितां त्याला वाटेल तसें शासन करितात. चोरी करणाऱ्यांना फटके लगावणें, हातपाय तोडणें वगैरे शिक्षाही प्रचलित आहेत. यांतील कांहीं प्रत्यक्ष पाहिलेल्या शिक्षांचीं वर्णनें गिर्यारोहकांनीं लिहून ठेवलीं आहेत. तीं 'कथा-रम्या' या दृष्टीनें मनोरंजक आहेत. एका खेड्यांत एका चोरानें कोणत्या हातानें चोरी केली हें ठरवण्याकरितां फार बारकाईने चौकशी करण्यांत आली. कारण ज्या हातानें चोरी केली तो हात तोडून टाकायचा होता. १९२२ च्या एव्हरेस्ट पथकाच्या सामानापैकीं कांहीं चोरीला गेलें. तेव्हां त्यांनीं तिथल्या झाँगपेनला (पाटलाला) कळविलें. त्या झाँगपेननें, चोर बेपत्ता झाल्यामुळें चोराच्या भावालाच झोडपून काढलें. त्या भावावर निष्कारण अन्याय होत आहे असें गिर्यारोहकांनीं म्हणतांच झाँगपेननें उत्तर दिलें कीं, त्या चोराचा भाऊ (स्वतःला मार मिळाल्यामुळें) चोराला आपणहून शिक्षा करील. म्हणजे ज्याला शिक्षा करावयाची ती त्याला होईलच. सन १९३३ चें पथक एव्हरेस्टच्या वाटेवरील शेखरझाँगकडे जात असतां याकवर लादलेल्या खोक्यांमधून बरेंच महत्त्वाचें सामान चोरीला गेल्याचें त्यांना आढळून आलें. ज्या चार याकहाक्यांवर चोरी केल्याचा संशय होता त्यांना सार्वजनिक रितीनें फटके लगावण्याचा हुकूम झाँगपेननें दिला. हा विधि पाहायला पथकांतील गिर्यारोहकांना मुद्दाम बोलाविण्यांत आलें होतें. सभोंवतीं गांवचे लोकही जमले होते. फटके लगावणारे आरोपींना फटके मारीत होते. दर दहा फटके मारल्यावर थांबून ते

"गुन्हा कबूल आहे कां?" म्हणून आरोपीला विचारीत. कच्च्या कातड्याच्या आसूडांनीं असे शंभर फटके प्रत्येकी लगावण्यांत आले. परंतु त्या आरोपींनीं गुन्हा कबूल केला नाहीं. चोरलेले बूट, दारूच्या बाटल्या, खाद्यांचे डबे, वगैरेची किंमत त्यांना शंभर फटक्यांपेक्षां जास्त होती. एवढ्या उपयुक्त व दुर्मिळ जिनसा मिळण्याकारितां कांहीं फटके खाण्यास काय हरकत आहे असा विचार त्यांनीं केला असेल.

तिबेटमध्यें धर्मगुरूंचें म्हणजे लामाचें राज्य आहे. बहुतेक गांवांच्या जवळच डोंगरावर लामांचे मठ आहेत. तेथें बुद्धांची मंदिरें असतात. या देवळाच्या गाभाऱ्यांत अगदी अंधार असतो. मध्यभागीं बुद्धाची मूर्ती असते, व त्याभोंवती बोधिसत्वांच्या, किंवा जुन्या लामांच्या मूर्ती असतात. यांतील कांहीं मूर्तीं सोन्याचा थर दिलेल्या असतात. जवळच तुपाचे दिवे जळत असतात. प्रार्थनेच्या वेळेस लामा नगारा, डफ, व शिंग या वाद्यांचा उपयोग करतात. हा आवाज मठांत दुमदुमत असतो. प्रत्येक तिबेटी मनुष्य जवळ एक प्रार्थनाचक्र बाळगतो. ते आपल्याकडील चरख्या सारखें असतें. या चक्रावर प्रार्थना लिहिलेल्या असतात. त्या चक्राला फेरा दिला कीं, ती प्रार्थना म्हटल्याचें श्रेय मिळतें. त्या चक्राला जितके जास्त फेरे देतां येईल तितकें पुण्य अधिक वाढतें. कांहीं प्रार्थनाचक्रें खूप मोठी असतात. एका मठांतील एका चक्रांत वीस लाख प्रार्थना होत्या. पथकांतील भारवाहकांनीं भाविकपणानें त्या चक्राला फिरविलेंच, पण युरोपीय गिर्यारोहकांनीं सुद्धां चक्राला एकेक फेरा देऊन पुण्यसंचय केला.

तिबेटांतून प्रवास करणें कंटाळवाणें आहे. तेथें सूर्य प्रकाश स्वच्छ असतो. पण पश्चिमेकडून अंगाला झोंबणारे थंड वारे वाहातात. उन्हाळ्याच्या दिवसांत, त्या वाऱ्याबरोबर धूळही खूप उडते. ती नाका तोंडांत गेल्यानें कोरड्या हवेत आधींच सुकून गेलेल्या घशाला अपाय होतो. तिबेटमधून जाणाऱ्या गिर्यारोहकांना घसादुखी होऊं नये म्हणून

औषधी पाण्याच्या नियमित गुळण्या करून काळजी घ्यावी लागते. वाटेंत झाडें, फुलें, वगैरे कांहीं आढळत नाहीं. त्यामुळें उजाड वाटतें. हिमालयांतील पर्वतांचा देखावा मात्र नेहमी सुंदर व नेत्रांना सुखाविणारा असा असतो.

फारीझाँग या गांवीं पोंहोचल्यावर एव्हरेस्ट पथकानें सोबतच्या तट्टांना रजा देऊन त्या ऐवजीं याक घेतले. कारण तिबेटच्या हवेला व बर्फावरील चालीला याकाइतकें दुसरें जनावर टिकत नाहीं. पायानें चपळ व तितकाच मजबूत असा हा याक उतारावर घसरत नाहीं. त्याचें नेहमीचें रहाणें विरळ हवेंतच असतें. आठ हजार फुटाच्या खालची दाट हवा त्याला मानवत नाहीं. त्याच्या अंगावर खूप केस असल्यानें कितीही थंडी पडली, गार वारा वाहात असला, किंवा हिमकणांनीं त्याचें शरीर भरून गेलें तरी तो गारठून जात नाहीं. तिबेटी लोकांना तो अन्न, जळण, वस्त्र व वहातुकीचें साधन पुरवितो. त्याचें मांस ते खातात. त्याच्या शेणाच्या गवऱ्या जळणासांठीं वापरतात. त्याच्या केसाच्या लोंकरीचे कपडे घालतात. शिवाय त्याच्या आयाळीचे केस चिखलांत कालवून त्या चिखलाने ते घराच्या भिंती बांधतात. उत्तर ध्रुवाजवळील लोकांना जसा रेनडीअर हा प्राणी सर्व कांहीं जरूरीच्या वस्तु पुरवितो त्या प्रमाणेंच याक हा प्राणी तिबेटी लोकांच्या बऱ्याच गरजा भागवितो.

फारीझाँग हें जगांतील सर्वात गलिच्छ असें गांव आहे. फारी या शब्दाचा अर्थ डुकर टेकडी असा आहे. व तो अगदी सार्थ आहे. थंडीच्या दिवसांत येथल्या रस्त्यावरील चिखल गोठलेला असतो. पण उन्हाळ्यांत बर्फ वितळल्यानंतर, हा चिखल तुडवीत जाणें नकोसें होतें. उघड्या मैदानावर असल्यानें येथें धूळ खूप उडते. ती अन्नांत गेल्यानें हगवणीसारखे रोग होतात. १९२२ व २४च्या पथकांतील कांहीं गिर्यारोहक फारी येथें गेल्यावर आजारी पडले. तिबेटमध्यें प्रवास करतांना दोन गोष्टींची काळजी घ्यावी

लागते. एक, पाणी उकळून पिणें दुसरे, खेड्याजवळ मुक्काम करायचा असला तर जिकडून वारा वाहात असेल त्या बाजूला तळ ठोकणें. फारी येथें पोस्ट व तार ऑफिस आहे. येथूनच एव्हरेस्ट पथकाचे संदेश हिंदुस्थानांत पाठविले गेले. फारी सोडल्यावर रस्त्याला चढण लागली व त्यांना पश्चिमेकडे वळावें लागलें. यापुढील वातावरण कसें असेल याची कल्पना त्यांना येऊं लागली. झाडेंझुडपें तुरळक होऊं लागलीं. एकावर एक गरम कपडे चढविले तरी, गार वारा अंगाला झोंबू लागला. रात्रीं बाहेर सांचलेल्या पाण्याचें बर्फ होत असे. दिवसा वाहणारा धबधबा रात्रीं गोठून निश्चल होई. निरभ्र आकाशांत व विरळ हवेंत रात्रीं चांदण्या फार तेजानें चमकतांना दिसत. वाटेंत भेटणारे मेंढराचे कळप आता क्वचितच दिसूं लागले. या उजाड मैदानांत त्यांना एक किलबिल करणारा पक्षी दिसला तेव्हां केवढें आश्चर्य वाटलें.

कांहीं आठवड्यांच्या चालीनंतर सर्व पथक खंबाझॉंग या गांवीं येऊन पोहोंचलें. उंच कड्यावर बांधलेला खंबाझॉंगचा किल्ला लांबूनच प्रवाशाचें चित्त वेधून घेतो. त्या किल्ल्याचें एकावर एक बांधलेले बुरुज आणि वर टोंकावर असलेला बालेकिल्ला हीं सर्व, एखाद्या यक्ष नगरींतिल किल्ल्याप्रमाणें भासतात. खंबाझॉंग येथें त्यांच्यावर एक अनर्थ कोसळला. दमट हवेच्या खोऱ्यांत शिरल्यापासून पथकांतील एक गिर्यारोहक डॉक्टर केलास याची प्रकृति बिघडली होती. तिबेटच्या थंड हवेंत प्रवेश केल्यावर ती सुधारायच्या ऐवजीं जास्तच बिघडली. त्याला चालतां किंवा घोड्यावर बसतां येईनासें झाल्यानें डोलींतून न्यावें लागलें. त्या सालीं केलासनें दुसऱ्या कांहीं पर्वतांवर चढाया केल्या होत्या. त्यामुळें तो थकल्यासारखा झाला होता. पण त्याची वृत्ति नेहमीं आनंदी असल्यानें त्याची प्रकृति इतकी बिघडली असेल याची कुणाला कल्पना नव्हती. खंबाझॉंगला जाऊन डॉक्टर हॉवर्डबरी तेथल्या झॉंगपेनशीं बोलणें करीत होते. तेवढ्यांत एका जासूदानें पळत पळत येऊन

मागील एका खिंडींत हृदयक्रिया बंद पडून डॉ. केलासला मृत्यू आल्याचें सांगितलें. डॉ. केलासच्या मृत्यूनें एक सहकारी व मित्र गेल्याचें दुःख सर्वांना झालेंच. परंतु एव्हरेस्ट मोहिमेच्या दृष्टीनेंहि मोठें नुकसान झालें. हिमालयाच्या अंतर्भागाची माहिती डॉ. केलासइतकी दुसऱ्या कोणाला नव्हती. एव्हरेस्टवर जाण्याची डॉ. केलासची आयुष्याची महत्त्वाकांक्षा होती. त्याच्या ज्ञानाचा, अनुभवाचा व दुर्दम्य उत्साहाचा एव्हरेस्टवर फार उपयोग झाला असता. परंतु जें होणार तें चुकलें नाहीं. जड अंतःकरणांनीं त्यांनीं त्याचें शव मठाजवळील एका टेकडीवर पुरलें, व तेथें दगडांची रास करून कबर तयार केली. एव्हरेस्टच्या नजरेखालीं त्याला कायमचें ठेवून पथक पुढें वाट चालूं लागलें.

दुसरे दोन गिर्यारोहक आजारी पडले. त्यांना सिक्कीममध्यें परत पाठवावें लागलें. राहतां राहिलें दोघे गिर्यारोहक, मॅलरी आणि बुलॉक. ते दोघेहि हिमालयांत नवखे होते.

खंबाझाँगच्या मठांत त्यांचें चांगलें स्वागत झालें. तसें करण्याबद्दलची सुचना दलाई लामाकडून तेथील मठाधिकाऱ्याला मिळाली होती. हॉवर्डबरीनें त्याला एक विजेचा टॉर्च नजर केला, तेव्हां तो फारच खूष झाला. आणखी २७ मैल चालून गेल्यावर ते शेखरझाँग नांवाच्या मठाशीं आले. हा मठ पायथ्यापासून दोन हजार फूट उंचीच्या डोंगरावर अगदीं कड्याच्या टोकाला बांधलेला आहे. तो लांबून फारच सुंदर दिसतो. शिल्पकलेंत तिबेटी लोक निष्णात आहेत. शेखरझाँगचा किल्ला हा त्यांच्या शिल्पकलेचा उत्तम नमुना आहे.

यापुढें त्यांची वाट उंच डोंगराच्या खिंडींतून व खोल दऱ्यांतून जात होती. वाटेंत हिमाच्या पाण्याचे जोरांत वाहणारे प्रवाह त्यांना ओलांडावे

लागत होते. ओझ्यानें लादलेल्या जनावरांना तें कष्टाचें होई. रस्त्याच्या बाजूला एकांतवासांत राहाणाऱ्या साधूंच्या गुहा दिसत. वनस्पति दुर्मिळ होऊं लागली. वाऱ्याची गति वाढूं लागली. दार्जिलिंगहून निघाल्यापासून सुमारें एक महिन्यानें ते एव्हरेस्टच्या पायथ्याच्या रॉंगबक मठापाशी येऊन पोहोंचले. कायमची वस्ती असलेलें जगांतील सर्वांत उंच ठिकाण असें रॉंगबकचें वर्णन करतां येईल. येथें जवळ जवळ तीनशे भिक्षु बाराही महिने थंडीला न जुमानता राहातात. रॉंगबकच्या मुख्य लामाची कीर्ति व आसपासच्या लोकांत वजन मोठें आहे. त्याच्या आशीर्वादाला, तिबेटी लोकच नव्हे, तर नेपाळांतील शेर्पा लोकही फार मानतात. मठांत जाऊन पथकांतील सर्व लोकांनीं मुख्य लामाचें दर्शन घेतलें. प्रत्येकानें आळी-पाळीनें पुढें जाऊन लामाच्यापुढें मस्तक नमविलें. लामानें प्रार्थनाचक्रानें त्यांच्या डोक्याला स्पर्श करून कांहीं पुटपुटत आशीर्वाद दिला. लामानें प्रत्येकाकडून " ओममणि पद्मेहुं " ही प्रार्थना म्हणून घेतली. ते शब्द उच्चारतांना युरोपीय गिर्यारोहकांची तारांबळ उडाल्यामुळें गंमत होत होती. एव्हरेस्टवर चढाई करतांना काळजी घेण्यास सांगून लामानें त्यांच्याकरितां प्रार्थना करण्याचें कबूल केलें. लामाच्या आशीर्वादानें भारवाहकांना बराच धीर आला.

रॉंगबक दरींतून दिसणारा एव्हरेस्टचा देखावा प्रेक्षणीय आहे. ही दरी एक मैल रुंद व वीस मैल लांब आहे. या दरीच्या टोकाशीं एव्हरेस्ट पर्वत जणुं काय एखाद्या दरबारांत राजा विराजमान झाल्यासारखा दिसतो. एव्हरेस्टच्या शिखरावरील हिम तुफान वाऱ्यानें नेहमीं उडत असल्यानें एव्हरेस्टच्या शिखरापासून सहा मैल लांबीची एक शुभ्र पताका नेहमीं दिसते. ज्यावेळीं गिर्यारोहक रॉंगबकला पोहोंचले त्यावेळीं वातावरण स्वच्छ

असल्यानें २० मैल लांब असलेलें एव्हरेस्टचें शिखर अगदीं जवळ असल्या-सारखें दिसत होतें. गिर्यारोहकांना तें जणुं काय आव्हान देत होतें कीं, " पुढें या, आणि बघा मला जिंकता येतें कां ! " आपला प्रतिस्पर्धी इतक्या जवळून पाहिल्यावर गिर्यारोहकांचें रक्त सळसळलें असल्यास नवल नाहीं.



## पहिले प्रयत्न : : ६

एव्हरेस्टच्या पायथ्यापर्यंतचा, मधून मधून कंटाळवाणा होणारा प्रवास संपला. आता त्या लोकांनीं कामास सुरवात केली. या पहिल्या मोहिमेचा मुख्य उद्देश शिखरावर जाणें हा नव्हता. त्यांतील गिर्यारोकांचें काम एव्हरेस्टच्या पर्वताची व पायथ्याच्या डोंगरांची पाहाणी करून वर जाण्यास योग्य मार्ग शोधून काढण्याचें होतें. असा मार्ग शोधून काढण्याची जरूरी होती. कारण अद्यापपर्यंत एव्हरेस्टच्या ४० मैलांच्या टापूंत कोणी गेलेले नव्हते. शिखराजवळच लांबलचक एकसारखी उतरंड दिसत होती. तीवरून चढता येईल असें दुरून पाहिलें असतां वाटत होतें. परंतु पायथ्यापासून तेवढ्या उंचीवर चढण्यास काय अडथळे येतील या विषयीं कुणाला कल्पना नव्हती. त्यामुळें १९२१ च्या पथकाला, 'वर जाण्यास उत्तम मार्ग शोधून काढावा' एवढाच आदेश दिला गेला होता. अर्थात्, शक्य झाल्यास शिखरापर्यंत जाऊन पोहचण्यास त्यांना मनाई नव्हती.

वर जाण्याचा मार्ग शोधून काढण्याचें काम सोपें नव्हतें. पर्वताजवळ गेले असतां त्याजवळील लहान डोंगर व कडे मध्यें आल्यानें मूळ पर्वत दिसेनासा होतो व दिशाभूल होते. एखाद्या बाजूनें जायचा प्रयत्न केला व वाटेंत दरी, किंवा उभा कडा आडवा आला तर तो मार्ग सोडून देऊन परत

यावें लागतें. एव्हरेस्ट पर्वत खूप ऊंच असल्यानें लांब पसरलेला आहे. पाय-थ्यापासून शिखर सुमारें १६ मैल लांब आहे. एवढ्या अंतरावरून शिखराकडे जाणारा मार्ग पहिल्याच प्रयत्नांत सांपडणें अशक्य होतें. रॉंगबक मठाच्यापुढें चारपांच मैलावर त्यांनीं पायथ्याचा तळ ठोकला. तेथें तंबू ठोकून बरोबरचें सामान नीट लावलें. मॅलरी व त्याच्या सहकाऱ्यांनीं कामास सुरवात केली. जॉर्ज मॅलरीचें नांव एव्हरेस्टच्या इतिहासांत फार प्रसिद्ध आहे. पुढें तीन वर्षांनंतर म्हणजे १९२४ मध्यें गेलेल्या एव्हरेस्ट मोहिमेत, तो व दुसरा एक गिर्यारोहक आर्व्हिन् हे शिखराजवळ चढत असता, बेपत्ता झाले. या संबंधीचें वर्णन पुढील प्रकरणांत येईलच. मॅलरीनें आल्पस्मध्यें अनेक शिखरांवर चढाया केल्या होत्या व तो एक बेडर, हुशार व अनुभवी गिर्यारोहक होता. एव्हरेस्टवर पाहाणी करणें किंवा प्रत्यक्ष चढाई करणें या दोन्ही कामास तो अगदी लायक होता. उदार, प्रेमळ व गुणी असल्यामुळें तो सर्व गिर्यारोहकांचा आवडता होता. त्याचा स्वभाव जात्याच धाडसी असल्यानें चढणींत विशेष धोका नसेल ती चढण त्याला मिळमिळीत व कंटाळवाणी वाटत असे. ज्या कड्यावर चढतांना दुसऱ्यांना भीति वाटावी तेथें तो हौशीनें चढत असे. ही त्याची साहसी वृत्ति पाहून सन १९११ मध्यें एका आस्ट्रेलियन गिर्यारोहकानें म्हटलें होतें, "हा तरुण फार वर्षे जगायचा नाहीं असें मला वाटतें." शारिरिक ताकतीच्या जोडीला, समयसूचकता, व प्रसंगावधान हे गुण त्याच्यांत होते. त्यामुळें गिर्यारोहण करीत असतां त्यानें धोक्याच्या प्रसंगीं अनेक वेळा झटकन् योग्य ती गोष्ट करून आपले व साथीदाराचे प्राण वाचविले होते.

एव्हरेस्टची पाहाणी सुरु केल्यावर मॅलरीनें प्रथम रॉंगबक बर्फप्रवाहाचा मार्ग अनुसरिला. आपले शेर्पा भारवाहक बरोबर घेऊन तो प्रवाहाच्या उगमाशी गेला. बर्फप्रवाहावरून चढण्याची शास्त्रशुद्ध पद्धत त्यानें भार-

वाहकांना शिकविली. भारवाहकांना चढण्याकरितां खास प्रकारचे बूट देण्यांत आलें होते. या बुटाच्या तळाशी खिळे मारलेले असतात. त्या खिळ्यांमुळें बर्फांत व खडकांत बूट पकड धरतो व सहजासहजी घसरत नाहीं. सशास्त्र पद्धतीनें चढण्याची कला भारवाहक हळुहळु आत्मसात करीत होते. पाठीवर ओझे घेऊन उत्साहानें चढत जाताना त्यांना पाहून त्यांच्या काटकपणाबद्दल युरोपीय गिर्यारोहकांना कौतुक वाटूं लागलें. योग्य नेतृत्व व मार्गदर्शन मिळाल्यास अडाणी हिंदी मनुष्यसुद्धां कशी अचाट कामें करून दाखवितो, हे दोन्ही महायुद्धांत भाग घेतलेल्या शिपायांप्रमाणेंच एव्हरेस्ट व इतर शिखरांवर युरोपीय गिर्यारोहकांबरोबर गेलेल्या भारवाहकांनींही सिद्ध करून दाखविलें आहे.

मॅलरीची टोळी ज्या बर्फप्रवाहावरून जात होती, त्या बर्फ प्रवाहांत बर्फाचे मनोऱ्याच्या आकाराचे सुळके होते. बर्फप्रवाह वळतांना पडणाऱ्या दाबामुळें बर्फातील कांहीं तुकडे वर येऊन त्यांचे मनोरे बनले होते. सूर्याच्या उष्णतेमुळें ते पांढरे झाले होते. त्यांच्या छाया निळ्या व गडद हिरव्या रंगाच्या होत्या. बर्फ प्रवाहावर या मनोऱ्यांची खूप गर्दी होती. हवेच्या परिणामामुळें कांहीं मनोरे ठिसूळ झाले होते. साधा धक्का लागला तरी ते पडण्याची भीति होती. या अडचणींमुळें व पुढचा मार्ग दिसत नसल्यानें थोडे चालून गेल्यावर वाटेंत अडथळा आल्यास परत फिरावें लागत होतें. मनोऱ्यांमधून मार्ग काढीत जाणें त्रासदायक होतें. सूर्याच्या किरणांचा बर्फावर परिणाम होऊन हवेंत एक प्रकारचा दमटपणा आला होता. या दमटपणामुळें मेंदू व शरीर सुस्त होऊन जात होतें.

रॉंगबक बर्फप्रवाहाच्या मार्गानें पर्वताच्या वायव्य कण्याच्या पायथ्याशीं जेव्हां ते पोहोंचलें तेव्हां त्यांना कळून चुकलें कीं, त्या वाटेनें एव्हरेस्टवर जाणें शक्य नव्हतें. कारण वाटेंत एक उभा कडा होता. म्हणून ते

एव्हरेस्टच्या दक्षिणेकडे पाहूं लागले. ईशान्य बाजूच्या कण्यावरून शिखराकडे जाणें शक्य दिसत होतें. तिकडून चढण सोपी दिसत होती. पण या ईशान्य कण्यावर जाण्यास रॉंगबक प्रवाहाकडून मार्ग नव्हता. वाटेंतील बर्फाचा उंच धबधबा चढून जाणें अशक्य होतें. या पर्वताची नेपाळकडील दक्षिण बाजू तर फारच कठीण होती. त्या बाजूनें चढायला नेपाळ सरकारची परवानगी नव्हती ही गोष्ट वेगळीच. शेवटी पश्चिमेकडील एका छोट्या डोंगरावर त्यांनीं चढून पाहिलें, तेव्हां त्यांना ईशान्य कणा व एव्हरेस्टचें उत्तर शिखर यांना जोडणारी एक हिमावृत टेकडी दिसली. या टेकडीलाच पुढें नॉर्थकोल हें नांव पडलें. एव्हरेस्ट मोहिमांच्या वर्णनांतून "नॉर्थकोल" हें नांव वारंवार येतें म्हणून तेंच नांव प्रस्तुत पुस्तकांत वापरलें आहे. कसेंही करून या नॉर्थकोलवर गेले तर हमखास वर जाता येईल अशी आशा त्यांना वाटूं लागली.

वर थोडक्यांत वर्णन केलेली पाहाणी करण्यास त्यांना पांच आठवडे लागले. या काळांत केलेल्या श्रमामुळें त्यांना विश्रांतीची जरूरी होती. म्हणून ते खर्ता खोऱ्यांत विश्रांति घेण्यासाठीं गेले. खर्ता खोऱ्याची उंची कमी असल्यानें तेथें गवत व झुडपें होती. एव्हरेस्टजवळील बर्फमय वातावरणांतून या खोऱ्यांत आल्यावर त्यांना खरोखरच आल्हादकारक वाटलें असल्यास नवल नाहीं. थोडे दिवस विश्रांति घेऊन त्यांनीं वर दर्शविलेल्या दुसऱ्या बाजूनें शिखरावर जाण्याचा मार्ग शोधण्यास सुरवात केली. पुन्हां सुमारें सहा आठवडे फिरून, सर्व प्रदेश पायाखालीं घातल्यानंतर एव्हरेस्टच्या पायथ्याच्या दऱ्यांची व बर्फप्रवाहांची त्यांना चांगली माहिती झाली, व वर जाण्याची वाटही त्यांना सांपडली. या अवधींत मॉर्सहेड व व्हीलर या दोघा मोजणीदारांनी त्या सर्व टापूची मोजणी करून, नकाशे तयार केले. गिर्यारोहकांनीं शोधून काढलेली नवी वाट पूर्व रॉंगबक बर्फप्रवाहावरून जात होती. एव्हरेस्टवर जाणारी पुढील सर्व पथकें याच मार्गानें नॉर्थकोल-

वर गेली. मध्यें नॉर्थकोल व उत्तर शिखर असल्यामुळें, हा पूर्व रॉंगबक बर्फप्रवाह मुख्य रॉंगबक प्रवाहापासून वेगळा झालेला आहे. प्रथम पूर्वेकडे वाहात जाऊन नंतर तो एकदम पश्चिमेकडे वळून मुख्य रॉंगबक प्रवाहाला मिळतो. या त्याच्या दिशाबदलामुळें हा बर्फप्रवाह एव्हरेस्टच्या पायथ्यापासूनच उगम पावत असेल ही कल्पना मॅलरीला प्रथम आली नाहीं.

या पूर्व रॉंगबक प्रवाहावरुन उगमापाशीं गेले म्हणजे जवळजवळ उभ्या भिंतीसारखी बर्फावृत चढण लागते. या बर्फाच्या भिंतींत, खड्डे व भेगा आहेत. या भिंतीचें वरचें टोक म्हणजेच नॉर्थकोलचें पठार. नॉर्थकोलवरून पुढें ईशान्य कण्यावर जाता येतें. पूर्व रॉंगबक बर्फप्रवाहावरून चालत जाऊन, मॅलरी, बुलक व व्हीलर यांनीं बर्फाच्या भिंतीच्या पायथ्याशी २२००० फुटावर तंबू ठोकले व तेथें रात्रीं मुक्काम केला. जोराच्या वाऱ्यामुळें तंबूचें कापड फडफडत असल्यानें व कडक थंडीमुळें त्यांना फारशी झोप आली नाहीं. पहाटे उठून त्यांनीं बर्फाची भिंत चढण्यास सुरवात केली. ते सर्व कसलेले गिर्यारोहक असल्यानें फार न दमता ते बरीच उंची चढून गेले. शेवटची दोनशें फुटांची चढण मात्र कठीण होती. तेथें चढण उभी होती व हिम भुसभुशीत होतें. त्या ठिकाणीं त्यांना जवळच्या कुदळींचा उपयोग करावा लागला. कुदळीनें बर्फांत पायऱ्या खोदीत व त्या पायऱ्यांत पाय टाकीत तें चढत वरती गेले. वरपर्यंत त्यांना जवळजवळ पांचशें पायऱ्या खोदाव्या लागल्या. ज्या ठिकाणीं चढण किंवा उतरण जास्त उभट असते व बर्फावर पाय ठरत नाहीं, त्या ठिकाणीं बर्फात पायऱ्या खोदाव्या लागतात. पायऱ्या खोदणें हें कौशल्याचें काम आहे. नवखा मनुष्य पायऱ्या खोदतांना लवकरच थकून जातो. त्या खोदतांना कुदळ केवढ्या जोरानें मारावी, कुदळ कशी धरावी, पायऱ्या किती खोल व कशा आकाराच्या खणाव्यात व श्रमाची बचत कशी करावी हें वाकबगार गिर्यारोहकाला अनुभवामुळें माहीत असतें. आल्पसूपेक्षां हिमालयांत पायऱ्या खोदायका जास्त

श्रम लागतात. कारण तीव्र थंडीमुळें हिमालयांतील बर्फ डांबरासारखा चिवट झालेला असतो. त्यामुळें बर्फात कुदळ मारली कीं ती जोरानें ओढून बाहेर काढावी लागते. अशा बर्फामध्यें पायऱ्या खोदणें फार कष्टाचें व कंटाळवाणें असतें. भुसभुशीत हिमांत जोरानें पाय आपटून पायऱ्या बनवितां येतात. हें कामही श्रमाचें असतें. जेथें हिम घट्ट असतें किंवा हिमाचें बर्फात रुपांतर झालेलें असतें, अशा चढणीवर पायऱ्या खोदण्याकरितां कुदळीची मदत घ्यावी लागतें. या खेरीज कुदळीचा दुसरा एक उपयोग म्हणजे, घसरणाऱ्या माणसाला तिचा आधार मिळूं शकतो. एखाद्या कठीण जागेवरून जायचें असतें, तेव्हां, म्होरक्या स्वतःच्या कमरेला दोरी बांधून, ती दोरी हिमांत उभ्या रोवलेल्या कुदळीच्या टोंकापाशीं गुंडाळून घेतो. तो घसरलाच तर, दोरामुळें त्याची अधोगति थांबते. ज्या ठिकाणीं हिम दाट नसते व कुदळ त्यांत रोवता येत नाहीं, त्या ठिकाणीं, खडकांतील भेगेत कुदळीचें टोक अडकवून ठेवतात.

मॅलरी व त्याच्या सहकाऱ्यांनीं बर्फाच्या भिंतीवर चढून नार्थकोलवर पाय ठेवला. तेथून ईशान्य कण्याच्या मार्गानें शिखरावर जातां येईल, हा मॅलरीचा अंदाज बरोबर असल्याचें, त्यांना दिसून आलें. 'येथपर्यंत आलों आहोंत तेव्हां शिखरापर्यंत जातां येते कां पाहूं," असा विचार करून ते आणखी पुढें चालूं लागलें. पण थोडें पुढें गेल्यावर ते तुफानी वादळांत सांपडले. एव्हरेस्टवरील थंडीपेक्षाही हे तुफानी वारे जास्त कष्टकारक आहेत. गिर्यारोहकांनीं अंगांत खूप उबदार कपडे घातले होते तरी गार वारा त्यांच्या शरीराला जाऊन भिडत होता. वाऱ्याच्या झोताबरोबर हिम उडून उतरणीवर विखुरलें जात होतें. धुक्यामुळें शिखराजवळील भाग दिसत नव्हता. एव्हरेस्टच्या रौद्रस्वरुपाची त्यांना चांगली कल्पना आली. पुढें जायचा बेत सोडून देऊन, ते घाईघाईनें परत बर्फाच्या भिंतीच्या खालच्या तळावर गेले, व तेथून लवकरच मुख्य तळावर परतले. पावसाळा अगदी जवळ

येऊन ठेपला होता. मार्ग शोधनाचें व पाहणी करण्याचें त्यांचें काम झालें होतें, म्हणून अधिक वेळ न घालवितां ते आल्या मार्गानें हिंदुस्थानांत येऊन इंग्लंडला निघून गेले.

१९२१ च्या पथकानें मोजणी करण्याचा व वर जाण्याचा मार्ग शोधून काढण्याचें प्राथमिक काम केलें. त्यानंतर दुसऱ्याच वर्षी, एव्हरेस्ट शिखरावर जाण्याचें प्रयत्न करण्याकरितां नव्या मोहिमेची योजना करण्यांत आली. या मोहिमेचें नेतृत्व जनरल ब्रूस याना देण्यांत आलें होतें. जनरल ब्रूस यांचें वय जास्त झालें असल्यानें शिखरावर चढाई करणें त्यांच्यानें शक्य नव्हतें. परंतु त्यांना हिमालय व हिमालयांतील लोक यांची चांगली माहिती असल्यानें, मोहिमेच्या हालचालीचें मार्गदर्शन करणें, योग्य भारवाहक निवडून, एव्हरेस्टवर शक्य तितक्या जास्त उंचीवर ओझी वाहून नेण्याबद्दल त्यांच्यांत उत्साह आणणें, इत्यादि कार्यांत त्यांच्या अनुभवाचा फायदा पथकाला खूप होणार होता. हिमालयांतील मोहिमेच्या पथकांत निरनिराळ्या स्वभावाचे, व संवयींचे लोक एकत्र येतात. मोहिमेंतील खडतर जीवनामुळें, पथकांतील सभासदांचा स्वभाव चिडखोर व असंतोषी होण्याचा संभव असतो. अशा वेळेस त्या सभासदांत धुसपुस न होऊं देता, त्यांच्याकडून संघशक्तीनें, व एकमेकाला मदत होईल अशी कामें करून घेणें, हें नेत्याच्या वजनावर व त्याच्या खुबीदार वागणुकीवर अवलंबून असतें. प्रत्येक माणसाच्या आवडीनिवडी व गुणदोष ओळखून त्याला खूष ठेवून त्याच्या अंगांतील गुणांचा व कौशल्याचा शक्य तितका उपयोग करून घेणें, हें जनरल ब्रूसला चांगलें अवगत होतें.

प्रत्यक्ष गिर्यारोहणासाठीं निवड करतांना, आदल्या वर्षीच्या मोहिमेंतील मॅलरी व मॉर्सहेड यांची निवड करण्यांत आली. याखेरीज नॉर्टन सॉमरव्हेल व फिंच हे कसलेले गिर्यारोहक होते. डॉक्टर सॉमरव्हेल हा हुशार शस्त्रवैद्य, चित्रकार, व संगीतज्ञ होता. लहानपणापासून डोंगरपहाडा-

वरून हिंडण्याची त्याला संवय होती. १९२२ ची मोहिम संपल्यावर त्यानें हिंदुस्थान देश पाहाण्यासाठीं दौरा काढला. दक्षिण हिंदुस्थानांत दारिद्य व रोगराई यामुळें लोकांचें जीवन किती दुःखद झालें आहे, हें त्यानें पाहिलें. त्या दृश्याचा त्याच्या मनावर इतका परिणाम झाला कीं, इंग्लंड-मध्यें त्याला देऊं केलेली प्राध्यापकाची मानाची जागा न स्वीकारता त्यानें दक्षिण हिंदुस्थानांतील अमेरिकन मिशनमध्यें सामील होऊन मिशनरी डॉक्टरचें आयुष्य पत्करलें. गेलीं वीस बावीस वर्षें, मिशनच्या धर्मार्थ दवा-खान्यांत शस्त्रवैद्याचें काम करून, त्यानें हजारों गरिबांचा दुवा घेतला आहे. आपल्या आत्मचरित्रात्मक पुस्तकांत त्यानें हिंदुस्थानांतील आपल्या वास्तव्या-विषयीं व हिंदी लोकांविषयीं कळकळीचे विचार प्रदर्शित केले आहेत.

फिंच हा लंडन येथें रसायन शास्त्राचा प्राध्यापक होता. त्याला आल्पस्मधील गिर्यारोहणाचा चांगला अनुभव होता. या पांच गिर्यारोहकां-खेरीज, पथकांतील सभासदांत कॅप्टन नोएल हा होता. एव्हरेस्टच्या चाळीस मैलाच्या परिसरांत पाऊल टाकणारा हाच पहिला युरोपियन. नोएलकडे फोटो काढण्याचें काम होतें. थंडीवाऱ्यास न जुमानतां, वरच्या तळावर फोटो व चलत् चित्रपट घेऊन त्यानें आपलें काम उत्तम प्रकारें बजा-वलें. या मोहिमेची तयारी इंग्लंडमध्यें होत असतांना एक मोठा प्रश्न उपस्थित झाला. उंचीवर हवा विरळ होत जाते, व त्यामुळें माणसाला श्वासोच्छ्वास करतांना पुरेसा ऑक्सिजन मिळत नाहीं. तेव्हां अशा ठिकाणीं कृत्रिम ऑक्सिजन वापरावा कीं नाहीं ? तज्ञांच्या मतें, एव्हरेस्टच्या शेवटच्या हजार दोन हजार फूट चढणींत ऑक्सिजनची कमतरता हीच मुख्य अडचण होती. शिखरापासली पर्वताची घडण, चढण्यास फार कठीण नव्हती. थंडी तीव्र असली तरी उबदार कपडे घालून तिजपासून निवारण करतां येणें शक्य होतें. मोठी अडचण विरळ हवेचीच होती. कृत्रिम सहाय्यानें ऑक्सिजनचा पुरवठा केला. कीं, शिखर गांठणें सहज शक्य होईल, असें

कांहींनी प्रतिपादिलें. या उलट कांहीं म्हणाले कीं, असली कृत्रिम साधनें घेऊन चढण्यांत काय पुरुषार्थ आहे ? मग, कठीण कडे सुरुंग लावून उडवून टाकावें पाहिजे तर ! पण यावर असें उत्तर होतें कीं, लहान शिखरांची गोष्ट वेगळी आहे. एव्हरेस्टसारख्या प्रबळ शत्रूशीं सामना देतांना शक्य ती कोणतीही साधनें वापरणें क्षम्य आहे एवढेंच नव्हे, तर जरूर आहे. एव्हरेस्टवर मानवाच्या शक्तीची, बुद्धीची व सहनशीलतेची पराकाष्ठा करावी लागते.

ऑक्सिजनचा उपयोग करण्यांत एक अडचण म्हणजे ज्यांत ऑक्सिजन वाहून न्यायचा त्या टाक्या फार वजनदार होत्या. थोड्या आकारांत जास्त ऑक्सिजन न्यायचा म्हणजे, तो टाक्यांमध्यें जोरानें दाबून ध्यायला हवा. अशा टाक्यांचा पत्रा जाड असणें आवश्यक होतें. त्यामुळें ऑक्सिजन उपकरणाचें वजन जवळ जवळ ३० पौंड होत होतें. एव्हरेस्टच्या उंचीवर एवढें वजन वाहतांना साहाजिकच जास्त थकवा येणार. प्रश्न असा होता कीं, या थकव्यानें होणाऱ्या तोट्यापेक्षां, कृत्रिम ऑक्सिजनचा पुरेसा पुरवठा झाल्यानें गिर्यारोहकांना जी तरतरी मिळणार तिचा फायदा जास्त होईल काय ? यांवर खल होऊन, निदान, ऑक्सिजनच्या अभावामुळें मोहीम अयशस्वी होऊ नये एवढ्यासाठीं कृत्रिम ऑक्सिजन बरोबर नेण्यास संमति देण्यात आली. ऑक्सिजन बरोबर न घेतां प्रथम एका टोळीनें शिखरावर चढून जायचें, व त्यानंतर दुसऱ्या टोळीनें ऑक्सिजन घेऊन चढाई करायची असें ठरलें. २६००० फुटांपलीकडे कृत्रिम ऑक्सिजन शिवाय जगणें शक्य होईल कीं नाहीं, यावर शास्त्रज्ञांचें एकमत नव्हतें. गिर्यारोहक हळूहळू विरळ हवेची सवय करीत जर वरती चढत गेले तर त्यांना २६००० फुटावरील अति विरळ हवेंत कांहीं त्रास होणार नाहीं, असें कांहीं जणांचें मत होतें.

हें पथक आदल्या वर्षीच्या पथकाप्रमाणें दार्जिलिंगहून निघून सिक्कीम व तिबेट यांमधून प्रवास करीत एक महीन्यानंतर एव्हरेस्टच्या पाय-

थ्याच्या रॅांगबक खोऱ्यांत जाऊन पोहोंचलें. मागील वर्षापेक्षां त्यांची स्वयंपाकाची व्यवस्था चांगली असल्यानें त्यांच्या शरीरप्रकृत्या व मन स्वास्थ्य चांगलें टिकलें होतें. बर्फप्रवाहाच्या मुखाशीं एका उंचशा खडकाळ जागेवर त्यांनीं मुख्य तळ बनविला. शक्य तितक्या जास्त उंचीवर शेवटचा तळ बनवायचा, व तेथून शिखरावर शेवटची चढाई करायची, असा त्यांचा बेत होता. पावसाळयापूर्वीं फक्त थोडे दिवसच एव्हरेस्टवरील हवामान चढाई करण्यास अनुकूल असतें. मे महिन्यापूर्वीं अतिशय थंडी असल्यानें एव्हरेस्टवर जातां येत नाहीं. जूननंतर पावसाळयास सुरवात झाली कीं, गारा व हिम यांच्या वर्षावामुळें आणि हिमयुक्त झंझावातांमुळें पर्वत चढणें जवळजवळ अशक्य होतें.

उत्तर ध्रुवापाशीं जाणाऱ्या शोधक प्रवाशांनीं अमलांत आणलेल्या पद्धतींचा उपयोग एव्हरेस्ट पथकानें केला. चार पांच तास चढण केल्यावर तेथें तळ बनवून मुक्काम करायचा; गिर्यारोहकांनीं तेथपर्यंतचा रस्ता बनविल्यावर, भारवाहकांनीं तो तळ सुसज्ज करण्याकरितां खालून वरती सामान वाहून न्यायचें; दुसऱ्या दिवशीं त्या तळाची नीट व्यवस्था लावून गिर्यारोहकांच्या एका टोळीनें आणखी वर चढत जाऊन दुसरा तळ बनवायचा. याप्रमाणें प्रत्येक तळावर पथकांतील लोकांना लागणारें अन्नाचें डबे, स्वयंपाकाची भांडी, झोंपण्याच्या दुलया वगैरे सर्व सामान ठेवून तो तळ स्वयंपूर्ण बनवायचा; म्हणजे प्रतिकूल हवेमुळें एखादेवेळेस दोन तळामध्यें दळणवळण होऊं शकलें नाहीं, तरी तेथें मुक्काम करीत असलेल्या गिर्यारोहकांवर थंडीनें गारठून किंवा भुकेनें मरण्याची पाळी येऊं नये. याप्रमाणें चढाईचें काम सुरू झालें, व भारवाहकांनीं एका तळाहून दुसऱ्या तळावर सामान वाहून नेण्याचें काम सुरू केलें. पहिला तळ १७८०० फुटांवर, दुसरा तळ १९८०० फुटावर व तिसरा तळ बर्फप्रवाहाच्या उगमाशीं,—नॉर्थ कोलच्या पायथ्याशीं बनविण्यांत आला.

तिसऱ्या तळानंतर खऱ्या चढणीला सुरवात झाली. शिखर चढून जाण्याच्या कल्पनेंत, आतां भारवाहकांनासुद्धां गंमत वाटूं लागली. कोणता साहेब जास्त उंचीवर चढून जाईल, याबद्दल त्यांच्यांत पैजा सुरू झाल्या. ता. १३ मे रोजीं मॅलरी व सॉमरव्हेल हे दोघे गिर्यारोहक व एक भारवाहक, नॉर्थ कोलवर जायला निघाले. सकाळभर खपून त्यांनीं कोलवर जाण्याच्या चढणीवर लाकडी मेखा बर्फांत गाडून त्यांना दोर बांधला. त्या कठीण चढणीवर ओझें घेऊन जाणाऱ्या भारवाहकांना तोल सांभाळण्याकरतां अशा दोराची आवश्यकता होती. या मार्गानें भारवाहकांनीं ओझीं वर आणल्यावर, कोलवरील चौथ्या तळाचें तंबू ठोकण्यांत आले. २३००० फूट उंचीवर असलेला हा चौथा तळ अगदीं समृद्ध बनवावयाचें ठरलें होतें. कारण वरच्या तळांवरील लोकांना येथूनच वारंवार मदत पोहोंचवायची होती. या तळापर्यंत सामान आणण्याकरितां भारवाहकांची येजा पुन्हां जोरांत सुरू झाली. झोपण्याकरितां दुलईच्या पिशव्या, प्रायमस् स्टोव्ह, कॅमेरे, स्वैपाकांची भांडी, या खेरीज चहा, कोको, सूप, चीझ व मासांचें खाद्यपदार्थ यांचे डबे, फळ व जॅम यांचे डबे इत्यादि सामानाच्या पेट्या चवथ्या तळावर नेण्यांत येऊन व्यवस्थित लावण्यांत आल्या.

ता. २० मे रोजीं सकाळीं साडेसात वाजतां मॅलरी, सॉमरव्हेल व नॉर्टन हे गिर्यारोहक, आणखी दोन हजार फूट उंचीवर याच्यापुढील तळ बनविण्याच्या उद्देशानें वर चढूं लागले. त्यांच्याबरोबर प्रत्येकीं दहा शेर ओझें असलेले चार भारवाहक होते. हिम वितळवून केलेल्या पाण्यानें, त्यांनीं गरम कॉफी बनवून थर्मासमध्यें घेतली होती. गिर्यारोहकांच्या पाठीवर छोट्या पिशव्या होत्या. त्यांत गरम कपडे, थोडे खाद्यपदार्थ, वगैरे जिनसा होत्या. निघतांना स्वच्छ सूर्यप्रकाश होता. फारसा वारा नव्हता. पण ते जेव्हां वर जाऊं लागले, तेव्हां थंडी जाणवूं लागली. एका ठिकाणीं थांबून त्यांनीं आणखी गरम कपडे अंगावर चढविले. पाठीवरील पिशवी सोडून आपल्या पुढयांत

घेऊन, नॉर्टन बसला होता. तेवढ्यांत ती त्याच्या पायांतून निसटली, आणि उतरणीवरून घसरत जाऊन दिसेनाशी झाली.

अकरा वाजण्याच्या सुमारास ते २५००० फुटांवर जाऊन पोहोंचले. त्या वेळेस पर्वतावर ढगांची दाटी झाली होती. ढग अगदीं जवळून पाहिलें असतां धुक्यासारखेंच दिसतात. त्या ढगांच्या धुक्यांत त्यांनीं थोडा वेळ इकडे तिकडे हिंडून पाहिलें. तळ बनविण्याकरितां अगदीं सपाट जागा मिळेना. जागा शोधायला जास्त वेळ घालवितां येईना, कारण भारवाहकांना चवथ्या तळावर परत पाठवायचें होतें. म्हणून त्यांतल्या त्यांत बरीशी जागा पाहून, त्यांनीं दगड गोळा करून एक चौथरा, केला, व त्यांवर दोन छोटे तंबू ठोकले. तंबूच्या खुंट्या जमिनींत ठोकून भागलें नसतें; कारण वाऱ्याच्या जोरामुळें खुंट्या उपटून आल्या असत्या. म्हणून त्यांनीं तंबूच्या दोऱ्यांवर मोठें वजनदार दगड ठेविले. भारवाहकांना परत पाठवून, त्यांनीं त्या तंबूत रात्रीं मुक्काम केला. प्रत्येक तंबूत दोघे गिर्यारोहक होतें. बूट गोठून कडक होऊं नयेत म्हणून, मॅलरीनें ते उशाखालीं घेतलें होतें. तंबू लहान असल्यामुळें दाटी होत होती. शिवाय बिछान्याखालचे दगड अंगाला टोचत असल्यामुळें त्यांना चांगली झोप मिळाली नाहीं. सकाळ केव्हां होते आणि आपण झोपण्याच्या पिशवींतून बाहेर केव्हां पडतो असें त्यांना वाटत होतें. रात्रभर हिमवर्षाव होत होता. सकाळीं चारही दिशा धुक्यांनी भरलेल्या होत्या. गरम पेय घेतल्यानंतर ते वरची वाट चालूं लागले. सुमारें शंभर यार्ड गेल्यावर, "आपल्याला बरं वाटत नाहीं," असें मॉर्सहेडनें सांगितलें. दुसऱ्यांनीं त्याच्याजवळ जाऊन पाहिलें. मॉर्सहेडला थंडी भरली होती. वर येताना हवाबंद कपडे घालावयाचे तो विसरला होता. थंडीमुळें त्याच्या हाताचीं कांहीं बोटें बधिर झालीं होती. हिमालयासारख्या उंच पर्वतावर तीव्र थंडीमुळें शरीराचें अवयव करपून जाण्याची भीति फार असते. हा बधिरपणा फार टिकला तर जखम कुजून जाते, व तसे झाले तर शरिरांतील



नॉर्टन आणि मॅलरी २७००० फुटांवर चढत आहेत.

सर्व रक्त नासूं नये म्हणून तो अवयव कापून काढण्याची पाळी येते. मॉर्स-हेडला पुढें जाणें शक्य नसल्यानें तो तंबूकडे परत फिरला, व बाकीचे पुढें जाऊं लागले. हवा विरळ असल्यानें त्यांना श्वासोच्छ्वास करणें कठीण जात होतें. यावर उपाय म्हणजे, तोंडानें लांब श्वास घेऊन शक्य तितका ऑक्सिजन फुप्फुसांत जाईल असें करायचें, व वारंवार दम खाण्यासाठीं उभे रहायाचें. बूट घट्ट बसला गेल्याने मॅलरीचा एक पाय बधिर झाला. त्याचे बूट सोडून नॉर्टननें तो चोळून काढला. त्यांत कांहीं वेळ गेला. मध्यान्हीच्या आधींच त्यांना कळून चुकलें कीं, अशा प्रगतीनें शिखर गांठणें शक्य नाहीं.

वेळेवर परत जाऊन मॉर्सहेडला मदत करणें, हेंही त्यांचें कर्तव्य होतें. सहासात तास चढून गेल्यावर, सुमारें अडाच वाजतां ते २६९८५ फुटावर जाऊन पोहोंचले. त्या वेळेपर्यंत एवढ्या उंचीवर कोणीहि मनुष्य चढून गेला नव्हतां. परतीच्या प्रवासाकरीतां दम शिल्लक ठेवणें जरूर आहे, म्हणून त्यों ठिकाणाहून परतावे असें सर्वानुमतें ठरलें. एका खडकाच्या आडोशाला बसून त्यांनी अल्पाहार केला. सॉमरव्हेलनें कांहीं फोटो काढले. एवढयानें समाधान न होता, खऱ्याखुऱ्या कलावंताप्रमाणें, त्या २७००० फूट उंचीवर थंडी बेजार करत होती तरींही, तेथल्या देखाव्याचें रेखाचित्र काढण्याची त्याला लहर आली. सर्वजण उठले, तेव्हां त्याचें चित्र काढणें चालूच होतें. " तुम्ही पुढें जा. मी मागून येऊन तुम्हाला गांठतो," सॉमरव्हेल म्हणाला " चलरे, कसले चित्र काढीत बसला आहेस !" असें म्हणून मॅलरीनें त्याला जवळ जवळ ओढलेच. तेथला देखावा अप्रातिम होता. आसपासच्या सर्व शिखरांपेक्षां ते जास्त उंचीवर होते. पण त्यांना तेथें फार वेळ थांबणें शक्य नव्हते. ज्या तळापासून ते निघालें होते, तो पांचवा तळ दोन हजार फूट खालीं होता. तेथें पोहोंचून मॉर्सहेडला घेऊन, रात्र होण्यापूर्वी नॉर्थकोल वरील चवथ्या तळावर त्यांना जायचें होतें. पांचव्या तळावर ते पोहोंचले, तेव्हां मॉर्सहेडची तब्येत जास्तच खराब झाली असल्याचें त्यांना दिसून आलें.

 

म्हणून वेळ न दवडतां, ते त्याला आधार देत, खालीं जाऊं लागले. एका दोराने चौघांनीं आपल्या कमरेला बांधले होते. एके ठिकाणीं दोरावरील तिसरा गिर्यारोहक घसरला. त्याच्या हिसक्यामुळें चौथाही घसरून पडला, व दोघेही बर्फावर घसरत खालीं जाऊं लागले. दोरावरील दुसऱ्या माणसानें कांहीं वेळ त्या दोघांना ओढून धरलें. पण त्यांच्या वजनामुळें त्याचाही आधार सुटून तोही घसरंडीला लागला. सर्वांत पुढें, पहिला गिर्यारोहक मॅलरी होता. त्यानें प्रसंगावधान राखून, आपली कुदळ हिमांत घट्ट रोवून तिच्याभोंवतीं दोर गुंडाळला. त्यामुळें, त्या घसरणाऱ्या लोकांची गति थांबली. आयत्यावेळेस योग्य ती गोष्ट करून, मॅलरीनें सर्वांचें जीव वाचविले.

त्या प्रसंगानंतर, ते जास्त खबदारीनें पाय टाकूं लागले. संध्याकाळ होऊं लागली होती. आळीपाळीनें मॉर्सहेडला आधार देत, ते उतरत होते. अतां अंधार पडला. आजूबाजूच्या ढगांतून विजा चमकत होत्या. वाट शोधण्याचें काम सर्वानुमतें सॉमरव्हेलला देण्यांत आलें होतें. त्याच्याजवळची मेणबत्ती थोडाफार प्रकाश देत होती. एक दोन वेळा ते वाट चुकून भलतीकडेच गेले. मधून मधून बर्फांत पायऱ्या खोदाव्या लागत होत्या. मॉर्सहेडच्या अंगांत त्राण उरलें नसल्यानें त्याला बर्फावर बसून घसरत जावें असें एकसारखें वाटत होतें. पण तसें त्याला करुं देणें इष्ट नव्हतें. कारण, एकदा घसरूं लागलें म्हणजे वेग वाढत जाऊन, शरीरावर ताबा न राहिल्यानें माणूस एखादे वेळेस भलत्याच दिशेनें घसरूं लागतो. वाटेंत एके ठिकाणीं पंधरा फूट खड्डा होता. त्या खालचें हिम पक्के असेल कीं नाहीं याची शंका होती. पण तो खड्डा टाळायला फार लांबून जावें लागलें असतें. ते अगदी थकून गेले होते व त्यांना वेळेची बचत करायची होती. म्हणून त्यांनीं ‘ चान्स ’ घ्यायचें ठरविलें. प्रथम एकानें उडी टाकली. त्याच्या कमरेला बांधलेला दोर इतरांनीं धरला. सुदैवाने तें खालचें हिम घट्ट होतें. मॉर्सहेडला दोराच्या सहाय्यानें खालीं

उतरवून बाकीच्यांनीं खड्डयांत उड्या टाकल्या. सॉमरव्हेलच्या हातांतील मेणबत्ती विझून गेली होती. अंधार गडद होता. धुक्यामुळें आकाशांतील तारे दिसत नव्हते. पण हिमाच्या पांढरेपणामुळें मंदसा प्रकाश होता. सगळे अगदीं कंटाळून गेले होते. पण घाईघाईनें पाय उचलणेंही शक्य नव्हते. प्रत्येक पाऊल टाकतांना पुढें नीट पाहाण्याची आवश्यकता होती. रात्रीं साडेदहाच्या सुमारास ते नॅार्थकोलवरील तळावर पोहोचले. पण तेथे त्यांच्या वाट्याला एक निराशा होती. तळावर सर्व पदार्थ होते. पण स्टोव्ह नव्हता. त्यांना तहान जबरदस्त लागली होती. आधी गरम पेय प्यायल्या-शिवाय पोटांत अन्न जाणें शक्य नव्हतें. व्यवस्थेत कांहींतरी घोटाळा झाल्यामुळें तेथें स्टोव्ह ठेवला गेला नव्हता. मनांत चरफडत त्यांनीं डबे खोलून, त्यातील जॅम व हिम मिसळून खाल्लें. दुसऱ्या दिवशीं उठून ते तिसऱ्या तळावर उतरून गेले. छत्तीस तासांत त्यांना पेय मिळालें नव्हतें. तेथें पोहोंचल्यावर सॉमरव्हेल सतरा कप चहा प्याला.

चार दिवसानंतर कृत्रिम ऑक्सिजन बरोबर घेऊन जाणाऱ्या टोळीची पाळी आली. त्यांत फिंच व जॉफ्रे ब्रूस हे दोघे होते. ऑक्सिजनची एक टाकी दीड तास टिकणारी होती. त्यामुळें अखेरच्या हल्ल्याकरितां त्यांना प्रत्येकीं तीनचार टाक्या लागणार होत्या. त्या सर्वांचें वजन पंधरा शेर होतें. ऑक्सिजन बरोबर घेऊन जावे, या मताचा आग्रही फिंच होता. आपल्या तत्त्वा-चा पडताळा पाहाण्याची संधि आतां त्याला मिळाली होती. या टोळीनें बिन ऑक्सिजनवाल्या टोळीच्या पांचव्या तळापेक्षां कांहीं जास्त उंचीवर आपला तळ ठोकला. रात्रीं वारा जोरांत वाहूं लागून तुफान सुरु झालें. आंतल्या माणसांसकट तंबू उडून जायची पाळी आली. तुफानामुळें त्यांना दुसरा संबंध दिवस तंबूतच काढावा लागला. तंबूचें कापड वाऱ्यानें सारखें फड-फडत होतें. तंबूंतील भेगांमधून हिम आंत येऊन त्यांच्या अंगावर व बिछान्यांवर पडत होतें. दोघे गिर्यारोहक व त्यांच्याबरोबरचा गुरखा

शिपाई तेजवीर, या तिघांना वारंवार बाहेर येऊन तंबूच्या दोऱ्या ताणून, दोऱ्यांवर दगड रचण्याचें काम करावें लागत होतें. थंडी मी म्हणत होती, आणि वारा कांहीं विचारुच नका. कांहीं मिनिटांच्यावर बाहेर उभें राहणें असह्य होत होतें. अन्न गरम करावें म्हणून त्यांनीं स्पिरिट लॅम्प पेटविला. वाऱ्यानें त्याची ज्योत भडकून तंबूला आग लागायची पाळी आली होती. तसें झालें असतें तर मात्र अनर्थच ओढवला असता.

तंबूतच पडून रहावें लागल्यानें त्यांना कंटाळवाणें वाटत होतें. तेवढ्यांत त्यांना बाहेर बोलण्याचा आवाज ऐकू आला. त्यांनीं पाहिलें तों, कांहीं भारवाहक त्यांच्यासाठीं गरम पेयांनीं भरलेली थर्मास पात्रें घेऊन तुफान वादळांतून खालच्या तळाहून आले होते. खूप उंचीवर होणाऱ्या गैरसोयींपैकीं एक गैरसोय म्हणजे [ हवेचा दाब कमी असल्यानें ] पाणी फार थोड्या उष्णतामानावर उकळतें. उकळत्या पाण्यांत हात घातला तरी भाजत नाहीं.

दुसऱ्या रात्रींसुद्धां वाऱ्याचा जोर कमी झाला नाहीं. रात्रीं तंबू सावरण्याचें श्रम त्यांना पुन्हां करावे लागले. श्रमानें, काळजीनें व पुरेसें अन्न न मिळाल्यानें त्यांना थकवा आला होता. मधून मधून त्यांना ऑक्सिजनचा उपयोग करावा लागला. तिसऱ्या दिवशीं पहाटें वारा पडला होता म्हणून, आपलें उद्दिष्ट गांठण्याकरितां ते बाहेर पडले. दोन दिवसांच्या त्रासानें थकलेल्या परिस्थितींत शिखर गांठणें अशक्य होतें, हें त्यांना कळून चुकलें होतें. कारण तेथून शिखर चार हजार फूट उंचीवर होतें. तथापि, जितकें वर जातां येईल तितकें जायचें असा त्यांनीं बेत केला. २६००० फूट गेल्यावर, "खलास झालो," असे उद्गार काढून तेजवीर पालथा पडला. त्याच्याबरोबर असलेल्या ऑक्सिजनच्या टाक्यांवर त्याच्या शरीराचा भार पडून एक दोन फुटून गेल्या, ब्रूस आणि फिंच यांनीं त्याला

उभे केलें. त्याच्या हलगर्जीपणामुळें त्या ठिकाणीं अत्यंत मौल्यवान अशा ऑक्सिजनच्या टाक्या फुटल्यानें फिंच चिडून गेला होता. तो त्याला रागावून बोलणार इतक्यांत, त्यानें तेजवीरच्या चेहऱ्याकडे पाहिलें. अंगातील शक्ति नाहींशी झाल्यानें तेजवीरचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता. फिंचनें आपलें शब्द तोंडांतच गिळलें.

तुला परत जातां येईल कां ? दोघांनीं त्याला विचारलें.

"होय साहेब."

"एकटा जाऊं शकशील ?"

"होय"

"ठीक आहे. उतरण फार कठीण नाहीं. पण खबरदारी घे. पुढें जातां आलें नाहीं तर पांचव्या तळावर थांब" त्यांनीं बजाविलें.

तो हळू हळू उतरू लागल्याचें पाहून त्यांनीं पुन्हां वरचा मार्ग धरला. चढण उभट होती तरी त्यांची प्रगति चांगली चालली होती. ब्रूसला गिर्यारोहणाची सवय नव्हती. पण तोही ठीक चालला होता. मधूनमधून रिकामी झालेली टाकी काढून टाकून नवी जोडण्याकरितां ते थांबत होते. २७३०० फुटावर पोहोंचल्यावर अकस्मात् ब्रूस मटकन् खालीं बसला, आणि ओरडून म्हणाला "फिंच, नळींतून ऑक्सिजन येत नाहीं रे"

फिंच पुढें होता, तो घाईघाईनें परत आला. ब्रूस झुकांडी खाऊन खालीं पडणार तोंच फिंचनें त्याला धरलें. "हं ही नळी घे. चल," असें म्हणून त्यानें आपली नळी ब्रूसच्या तोंडांत कोंबली, व ब्रूसच्या टाकीचें काय बिघडले आहे हें तो पाहूं लागला. काय झालें तें कळेना. ऑक्सिजनच्या अभावीं त्यालाही चक्कर येऊं लागल्यानें तो मधून मधून ब्रूसच्या तोंडांतून नळी काढून तिचे स्वतः झुरके घेत होता. आधीच्या टोळीनें कृत्रिम ऑक्सिजन मुळींच न वापरल्यानें त्यांना त्या उंचीवर श्वासोछ्वासाचा इतका त्रास वाटत नव्हता. पण एकदां कृत्रिम ऑक्सिजन वापरल्यावर, मग त्याशिवाय

चालणें शक्य नव्हतें. फिंचनें सोबतची एक दुसरी नळी घेऊन एका टाकीला दोन नळ्या लावल्या. आतां ऑक्सिजनचा पुरवठा अखंड मिळाल्यानें त्याला हुशारी आली. व त्यानें ब्रूसचें ऑक्सिजन यंत्र दुरुस्त केलें.

पण या अपघातामुळें त्यांची प्रगति खुंटली. बिन-ऑक्सिजनवाल्या टोळीपेक्षां ते पुढें गेले होते. पण आणखी पुढें जाण्याची ताकत त्यांच्यांत राहिली नव्हती. शिवाय ऑक्सिजन यंत्रांत पुन्हां कांहीं बिघाड झाला तर त्याचा परिणाम भयंकरच व्हावयाचा. त्यांचा मानसिक उत्साह दांडगा होता. शिखरहि जवळ दिसत होतें. पण तें थोडेसें दिसणारें अंतर काटणें त्यांच्या शक्तीबाहेर होतें. अशा वेळेस माघार घेणेंच शहाणपणाचें होतें.

"लवकरच परत येऊन तुला गांठू. थोडा थांब," असें एव्हरेस्ट शिखराला बजावून ते मागे फिरले.

दार्जिलिंगला परत जाण्यापूर्वी ऑक्सिजन बरोबर घेऊन पुन्हां एक प्रयत्न करावा असें त्या पथकानें ठरविलें. पावसाळ्यास नुकतीच सुरवात झाल्यानें हिमवर्षाव खूप झाला होता. गिर्यारोहकांनीं खालच्या तळाहून वर येऊन तिसऱ्या तळावरील हिम बाजूला करून तेथें पुन्हां तळ उभारला. खालून शिधा सामुग्री आणली. तेथून पुढचा नॉर्थ कोलवरील तळ बनविण्याकरितां गिर्यारोहक व भारवाहक निघाले. सर्वांत पुढें सॉमरव्हेल, त्याच्यामागून मॅलरी, त्याच्यामागें एक भारवाहक व नंतर क्रॉफर्ड, क्रॉफर्डच्या मागें ओझीं घेतलेले चौदा भारवाहक असा ताफा हळू हळू चढत होता. त्या ताफ्याचे चार विभाग करून प्रत्येक विभागांतलि माणसांनीं दोरानें आपल्या कमरेला बांधलें होतें. पुढें जाऊन हिमांत वाट व पायऱ्या तयार करण्याचें काम सॉमरव्हेल करीत होता. नॉर्थ कोलच्या पायथ्याच्या चढणीवर हिमप्रपात होण्याची शक्यता त्याला वाटली. म्हणून

त्यानें मुद्दाम हिमांत पाय आपटून हिम ढिलें आहे कीं काय तें पाहिलें. पण तें हिम चांगलें घट्ट होतें. त्यापुढें गेल्यावर तर हिमप्रपात होण्याची कांहीं चिन्हें नव्हती. त्यांच्या उद्दिष्टाच्याखालीं ६०० फूट पर्यंत ते पोहोंचले होते. तेवढ्यांत, कांहीं एक इशारा न मिळतां, सॉमरव्हेलच्या वीस फूट पुढें एक भेग पडून, तें सर्व टोळकें ज्या हिमावरून चालत होतें तें हिम जोरानें घसरूं लागलें. गिर्यारोहक व भारवाहक कोलमडून पडले व हिमाच्या लोंढ्यांत वाहूं लागले. हिमाचा प्रवाह थोडा वेळच चालू राहिला. तेवढ्या काळांत सर्वांनीं आपआपल्यापरीनें धडपड केली. बहुतेकांनीं जिवाची आशा सोडून दिली होती. पण सुदैवानें थोडक्यांत हालचाल थांबली. खालीं डोकें वर पाय अशा अवस्थेंत सॉमरव्हेल हिमांत गाडला गेला होता. हाताचा जोर करून त्यानें स्वतःला बाहेर काढलें. तो व दुसरे गिर्यारोहक भारवाहकांची काय अवस्था झाली आहे, ते पाहण्याकरितां धांवले. पण चौदापैकीं फक्त पांच भारवाहक दिसत होते. या प्रकारामुळें ते अगदीं घाबरून गेले होते. बाकीचे भारवाहक हिमाच्या लोंढ्याबरोबर कड्यावरून खालीं साठ फूट खड्डयांत पडले होते. दुसऱ्या बाजूनें खड्डयाच्या खालीं जाऊन हिमाखालीं पुरल्या गेलेल्या भारवाहकांना काढण्यासाठीं ते उकरूं लागले. थोडे उकरल्यावर एक भारवाहक बेशुद्ध पण जिवंत स्थितींत मिळाला दुसराही एक भारवाहक बाहेर काढण्यांत आला व तोही जगला. आणखी एकदोघे बाहेर काढण्यांत आले होते. पण ते बिचारे मरण पावले होते. कांहीं, कठीण बर्फावर आपटल्यामुळें तर कांहीं, हिमांत खोल पुरले गेल्यानें मरण पावले होते. एकूण या हिमप्रपातानें सात जणांचा बळी घेतला. या अपघाताबद्दल कुणालाच दोष देणें शक्य नव्हतें. कारण ज्या ठिकाणीं गिर्यारोहकांच्या अंदाजाप्रमाणें हिमप्रपात होण्याचा संभव नव्हता, नेमका त्याच ठिकाणीं हिमप्रपात झाला. पण अपघातांत फक्त भारवाहकच प्राणास मुकल्यानें त्या पथकांतील गिर्यारोहकांची मनें खायला उठली. या

अपघातानें सर्वांवर दु:खाची छाया पसरली. झाल्या गोष्टीबद्दल त्यावेळीं कांहीं करणें शक्य नव्हतें. पण या अपघाताची भरपाई पुढें १९२४ च्या मोहि-मेंतील गिर्यारोहकांनी केली. त्या वेळेस, त्यांनीं आपलें प्राण धोक्यांत घालून चार भारवाहकांचा जीव वाचविला, त्याची हकीगत पुढील प्रकरणांत येईलच.

## शोकान्त घटना–१९२४ : : ७

या नंतर दोन वर्षांनीं म्हणजे सन १९२४ मध्यें एव्हरेस्टवर तिसरी मोहीम झाली. या मोहिमेंत दोन तरुण गिर्यारोहक मॅलरी व अर्व्हिन् हे शिखराच्या जवळ गेले असतां कायमचे नाहीसे झाले. या घटनेमुळें ही मोहीम एव्हरेस्टवरील सर्व मोहिमांमध्यें विशेष प्रसिद्ध आहे. ही मोहीमसुद्धां अयशस्वी झाली. पण, दुर्दैवामुळें ओढवलेल्या संकटांशी झगडतांना या मोहिमेतील गिर्यारोहकांनीं जे शौर्य दाखविलें, भारवाहकांच्या सुरक्षिततेविषयीं जी कळकळ दाखविली व एव्हरेस्टच्या बालेकिल्ल्यावर हल्ला करतांना जो पराक्रम केला, त्यामुळें या मोहिमांचे अपयश एखाद्या सहजसाध्य यशापेक्षां जास्त तेजस्वी आहे.

मार्च महिन्यांत दार्जिलिंगहून निघून फारीझाँग शेखरझाँग या मार्गानें दरमजल करीत करीत एप्रिलच्या अखेरीस पथक एव्हरेस्टच्या पायथ्याशीं पोहोंचलें. खजिन्यांत कांहीं अफरातफर झाल्यामुळें तिबेट देशांत चांदीचें नाणें बदलून नवें तांब्याचें नाणें चालू झालें होतें. त्यामुळें या पथकाला मोहिमेच्या खर्चासाठीं सुमारे सात आठ हजार तांब्याची नाणीं बरोबर न्यावी लागली. ही नाणीं दहा खेचरांवर लादली होती. सन १९२२ मध्यें चांदीचें नाणें चालू असल्यामुळें तीन खेचरांत काम

भागलें होतें. शेखरझाँग येथील लामांनी पथकांतील गिर्यारोहकांना मठांत नेऊन बुद्धाच्या मूर्ती, ग्रंथालय वगैरे गोष्टी दाखविल्या. ग्रंथालयानें खूप जागा व्यापली होती. कारण त्यांतील बहुतेक ग्रंथ लाकडी पानांवर लिहिले होतें. या पथकाचा नेता जनरल ब्रूस होता. परंतु तिबेटमधील प्रवासांत त्याला मलेरियानें पछाडलें. तो जास्तच आजारी झाल्यानें त्याला दार्जिलिंगला परत पाठवावें लागले. जनरल ब्रूसच्या गैर-हजिरीमुळें पथकाचें मोठें नुकसान झालें. त्याच्या अभावीं मोहिमेचें नेतृत्व कर्नल नॉर्टन याला देण्यांत आलें. ही जबाबदारी पार पाडण्यास नॉर्टन सर्वस्वी लायक मनुष्य होता. नॉर्टन, मॅलरी, सॉमरव्हेल व जॉफ्रेब्रूस हे पूर्वीच्या पथकाबरोबर एव्हरेस्टपर्यंत जाऊन आलेले होते. नव्या आरोहकांमध्यें ओडेल व अर्विन् हे होते. ओडेल भूगर्भशास्त्रज्ञ होता. एव्हरेस्ट पर्वतावर इतिहासपूर्व काळांतील प्राण्यांचे अवशेष सांपडतील अशी त्याची कल्पना होती. अर्विन् सर्व गिर्यारोहकांत वयानें लहान, बावीस वर्षांचा तरुण होता. आदल्या वर्षीच्या आल्पस्‌मधील एका मोहिमेंत त्यानें चांगलें नांव काढलें होतें. त्याची शरीरयष्टी मजबूत होती. मॅलरीला त्याच्याबद्दल विशेष जिव्हाळा होता. मोहिमेंत भाग घेण्यापूर्वी, मॅलरीनें त्याला आपल्याबरोबर गिर्यारोहणास नेऊन निरनिराळ्या क्लुप्त्या शिकविल्या होत्या. छोटीं उपकरणें दुरुस्त करण्यांत अर्विन्‌चा हातखंडा असे. बिघडलेल्या ऑक्सिजनच्या टाक्या व प्रायमस स्टोव्ह, दुरुस्तीकरितां त्याच्याकडे जात. त्याच्या तंबूला टिनमेकरच्या दुकानाचें स्वरूप आलें होतें.

पावसाळ्यास प्रारंभ होण्यापूर्वी पर्वतावर चढाई करावी अशी या पथकाची इच्छा होती. कारण १९२२ च्या मोहिमेंतील अपघात पावसाळ्याच्या सुरवातीस झाला होता. खालचे तळ शक्य तितक्या लवकर बनवावे व उंचीवर जाणारे भारवाहक, खालच्या तळांवर ओझीं वाहण्याच्या

श्रमामुळें थकून जाऊं नये म्हणून पायथ्याच्या तळापासून दुसऱ्या तळा-पर्यंत सामान वाहाण्यासाठीं त्यांनीं दीडशे तिबेटी मजूर कामाला लावेल होते. तिबेटी भारवाहकांत कांहीं स्त्रियांही होत्या. एका ओझेवालीनें वीस शेरांचें ओझें पाठीवर घेऊन, व त्यावर आपले दोन वर्षांचें मूल बसवून ती दोन हजार फूट चढून गेली. तेथून खालीं परत आल्यावर पुन्हा एक खेप करण्याची तिची तयारी होती. दुसऱ्या तळापासून पुढें सामान वाह-ण्याचें काम शूर शेर्पा व भुतिया भारवाहक करणार होते. पायथ्याशी पोचल्याबरोबर पथकानें जोरानें काम चालू केलें. केवळ सहा दिवसांत त्यांनीं २१००० फुटावरील तिसरा तळ उभारला. त्यानंतर मात्र दुर्दशा सुरू झाली. हिमवादळास सुरवात होऊन थंडी वाढली. उष्णतामान शून्याखालीं तीस अंश गेलें. वरच्या तळांवर वापरण्याकरितां केलेल्या खास पिशव्या त्यांना दुसऱ्या व तिसऱ्या तळावर वापराव्या लागल्या. अशा प्रतिकूल हवा-मानाला न जुमानता भारवाहक सामान वर वाहून नेण्याचें काम जोरांत करीत होते. पुढें थंडी व वादळ यांचा जोर जसजसा वाढूं लागला, तसतसा भारवाहकांचा उत्साह कमी होऊं लागला. त्यांच्या काटपणालाही सीमा आहे. शिवाय गिर्यारोहकांना एव्हरेस्ट गांठण्याची जितकी ईर्ष्या होती तितकी ईर्ष्या त्यावेळीं भारवाहकांना नव्हती. त्यामुळें एकदोन दिवस हवा प्रतिकूल राहिली की त्यांच्यांत औदासिन्य पसरत असे. तिसऱ्या तळावर राहणें फार कष्टाचें होतें. रात्री वाऱ्याच्या जोरानें तंबूच्या ताडपत्र्या एकसारख्या फडफडत असत. त्यामुळें झोप येत नसे. वाऱ्याबरोबर पावडरीसारखें हिम आंत येऊन कपड्यांत, केसांत व सर्व ठिकाणीं पडत होतें. भारवाहक निरुत्साही झाल्यानें त्यांना उठवून, तंबूतून बाहेर काढून कामाला लावणें हें काम मोठें जिकिरीचें होतें. गिर्यारोहकांनीं चिकाटीनें व कौशल्यानें भारवाहकांना चुचकारून खुलवून व प्रसंगी आर्जवें करून, तंबूबाहेर काढावे व त्यांच्याकडून काम करवून घ्यावें. जवळ जवळ पंधरा दिवस हवा प्रतिकूल राहिली. अशा हवेत

वर जाणें अशक्य दिसूं लागल्यानें, सर्वांनीं पायथ्याच्या तळावर परत जावें असा नॉर्टननें हुकूम दिला. तंबू बिछाने वगैरे सामान तेथेंच निवाऱ्याच्या जागीं पुरून ठेवून, व बाकीचें नाजूक सामान बरोबर घेऊन सर्वजण खालीं आले. तीव्र थंडींत श्रम न करितां कांहीं दिवस काढल्यानें एक भारवाहक हिमदग्ध झाला. दुसऱ्या एकाला न्युमोनिया झाला.

भारवाहकांत उत्साह निर्माण करण्यासाठीं नॉर्टननें एक युक्ति काढली. त्यानें सर्वांना पायथ्याच्या तळाहून चार मैलावर असलेल्या रॉंगबक मठांत नेलें. तिथल्या मुख्य लामानें भारवाहकांना आशीर्वाद देऊन, त्यांच्या सुरक्षिततेसाठीं प्रार्थना करण्याचें आश्वासन दिलें. लामाच्या दर्शनानें व त्यानें दिलेल्या उत्तेजनानें भारवाहकांच्या अंगांत उत्साह आला. मठां-तून ते पायथ्याच्या तळावर परत गेले, त्यावेळेस हवा सुधारली होती. पुन्हां सर्वजण वरचे तळ बनविण्याच्या कामाला लागले. आतांपर्यंत महत्वाचे पंधरा दिवस फुकट गेले होते. यापुढें त्यांना जलदीनें प्रगति करणें अवश्य होतें. पावसाळा सुरू होण्यापूर्वी फारसा अवधि नव्हता. " आतां पुन्हां माघार घ्यायची नाहीं, " मॅलरी म्हणाला, " बर्फ प्रवाहावरून आतां जाऊं तें शेवटचेंच. " मॅलरीला काय कल्पना होती कीं त्याचें शब्द, त्याच्या स्वतःच्या बाबतींत अक्षरशः खरे होणार होते.

बर्फप्रवाहावरून चढत जाऊन त्यांनी ता. १९ मे पर्यंत तिसरा तळ गांठला. दुसऱ्या दिवशीं नॉर्टन मॅलरी व ओडेल या तिघांनीं तिसऱ्या तळाहून निघून नॉर्थ कोलकडे जाण्याचा रस्ता बनविला. सन १९२२ सालीं ज्या उतारावर हिमप्रपात झाला होता तो उतार टाळून, त्यांनीं खडकांतील एका मोठ्या भेगेतून वर जाण्याचा रस्ता काढला. दोघेजण स्वतःच्या कमरेस दोर बांधून, त्या भेगेतून कौशल्यानें वर चढले. वर गेल्यावर त्यांनीं बर्फांत मेखा ठोकून दोराची एक शिडी तयार केली. त्या शिडीनें वर जाण्यास इतरांना सोपें झालें. या मार्गानें दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं अर्विन्

हॅझार्ड व सॉमरव्हेल या तिघांनीं बारा भारवाहक बरोबर घेऊन, चौथ्या तळाचें साहित्य वर नेलें. खडकाच्या भेगेमधून पाठीवर ओझी घेऊन चढणें भारवाहकांना शक्य नसल्यामुळें अर्व्हिन् व सॉमरव्हेल यांनीं वरच्या कड्यावर उभें राहून दोराच्या सहाय्यानें सर्व ओझीं वर ओढून घेतली. त्यांनीं कड्यावर जवळच चौथा तळ बनविला. वर राहणाऱ्यांची फार गर्दी नको म्हणून सॉमरव्हेल व अर्व्हिन् तिसऱ्या तळावर परत आले. एकटा हॅझार्ड बारा भारवाहकांसहित चौथ्या तळावर राहिला. आतां पुन्हां वादळास सुरवात झाली. वादळ व थंडी यामुळें तिसऱ्या व चौथ्या तळावर राहणें दुरापास्त झालें. दोन दिवस तेथें काढल्यावर चौथा तळ सोडून परत खालीं येण्याचें हॅझार्डनें ठरविलें. पण बारा भारवाहकांपैकीं आठ भारवाहकच त्याच्या बरोबर खालीं आले. बाकीचे चौघे गतत्राण झाले होते. त्यांनीं तेथेंच राहण्याचें पत्करिलें. खडकांतील भेगेच्या उभ्या उतरणीवरून खालीं जायचें त्यांना नकोसें वाटत होतें. त्यांच्यापैकीं दोघांना हिमदाह झाला होता.

पथकाचा नेता नॉर्टन तिसऱ्या तळावर होता. चौघे भारवाहक खालीं आले नाहींत हें जेव्हां त्याला कळलें, तेव्हां त्याच्या मनाला धक्का बसला. कांहीं झालें तरी त्या भारवाहकांना तेथें असहाय्य परिस्थितींत सोडतां कामा नये. हवा अशीच प्रतिकूल राहिली तर थंडीनें व उपासमारीनें ते प्राणास मुकतील. त्यांना खालीं आणणें सोपें काम नव्हते. बर्फावर नवें हिम सांठलें होतें. खड्ड्यांवर पडलेलें हिम गोठल्यामुळें, खड्डे सकृद्दर्शनी बुजल्यासारखें वाटत होते. हिमप्रपात होण्याची भीति होती. भारवाहकांना खाली आणायला जाणाऱ्या गिर्यारोहकांचें जीव धोक्यांत येणार होते. पण हे सर्व धोके पत्करून, भारवाहकांना खालीं आणलेंच पाहिजे असें नॉर्टननें ठरविलें. गिर्यारोहकांनीं एव्हरेस्टवर जावे म्हणून जे भारवाहक स्वतःचे प्राण धोक्यांत

घालून श्रम करीत होते,ते आतां संकटांत सांपडले असतां गिर्यारोहकांनींही आपल्या जिवाची पर्वा न करतां त्यांना सुखरूप आणले पाहिजे. त्या वेळच्या प्रतिकूल हवेंत धोकेबाज हिमावरून जाणें कसलेल्या गिर्यारोहकां-शिवाय दुसऱ्या कोणाला जमलें नसतें. म्हणून, शेवटचा हल्ला करणाऱ्या गिर्यारोहकांना खालच्या तळांवरील चढणीत अनावश्यक श्रम करूं द्यावयाचे नाहींत अशी योजना ठरली असतांहि, नॉर्टन स्वतः, मॅलरी व सॉमरव्हेल यांना बरोबर घेऊन निघाला. धोक्याची पर्वा न करतां चौथ्या तळापाशीं जाऊन या तिघांनीं भारवाहकांना सुखरूप खालीं आणलें, तो प्रसंग एव्हरे-स्टच्या इतिहासांतील कांहीं संस्मरणीय प्रसंगांपैकीं एक आहे.

ते हळूहळू बर्फप्रवाहावर चढूं लागले. हिमाच्या पापुद्र्याखालीं खोल खड्डा असेल अशी ज्यावेळीं शंका येई, तेव्हां त्या तिघांपैकीं एक कमरेला दोर बांधून कुदळ हिमांत आपटीत, आस्ते आस्ते पुढें जाई. दुसरे दोघे दोर धरून उभे राहात. यदाकदाचित् पापुद्र्याखालीं असलेल्या खड्ड्यांत, पुढें गेलेला गिर्यारोहक कोसळला तर त्याच्या कमरेला बांधलेल्या दोरानें त्याला काढतां यावें. पुढें जाणाऱ्याला सर्वांत जास्त श्रम होत होते. म्हणून तें काम तें आळीपाळीनें करीत. हिम चिखलासारखें मऊ व खोल होतें. त्यांत गुडघ्यापर्यंत पाय जात होतें, खोल गेलेला पाय हिमांतून काढून पुन्हां दुसरें पाऊल टाकतांना म्होरक्याची दमछाक होत होती. पुढच्याच्या पावलावर पावलें टाकून मागील दोघे जात. बर्फाच्या भिंतीच्या पायथ्यापर्यंत पोचायला त्यांना सात तास लागले. हेंच अंतर दोन वर्षांपूर्वीं त्यांनीं चार तासांत काटलें होतें. बर्फाच्या भिंतीची कठीण चढण चढण्यास त्यांनीं सुर-वात केली. मॅलरी व नॉर्टन दोर हातांत धरून एका सुरक्षित स्थळीं उभे राहिले. त्या दोराचें दुसरें टोक कमरेस बांधून सॉमरव्हेल चढूं लागला. चढणीच्या वरच्या टोकावर ते चौघे भारवाहक बसले होते. त्यांच्याखालीं सुमारें वीस फूट सॉमरव्हेल गेल्यावर दोर संपला. म्हणून त्यानें कमरेचा दोर

सोडून तो कुदळीला बांधून, कुदळ बर्फात रोवली. कुदळीच्या टोकाला धरून तो उभा राहिला व त्यानें चौघा भारवाहकांना हळूहळू उतरून त्याच्यापाशीं येण्यास सांगितलें. ते चौघे अगदीं हताश झालेले होतें. जीवन-मरणाविषयीं ते बेफिकिर होतें. खूपशा बोलावण्यानंतर त्यांतील दोघे पुढें आलें. परंतु घाईनें उतरूं लागल्यामुळें ते दोघेही घसरले, व हिमाच्या लोंढ्याबरोबर वाहूं लागले. ते मृत्यूच्या जबड्यांतच जात आहेत असें इतरांना क्षणभर वाटूं लागलें. पण सुदैवानें वाटेंतील एका अडथळ्यामुळें त्यांची घसरगुंडी थांबली. ते हळुहळू सॉमरव्हेलपाशीं आले व तेथून दोराच्या सहाय्यानें खालीं, नॉर्टन व मॅलरी उभे होते तेथपर्यंत गेले. उरलेल्या दोघांनीं सॉमरव्हेलच्या सुचना बरोबर पाळल्यामुळें ते व्यवस्थितपणें खालीं आले.

यापुढें लवकर लवकर पावलें टाकणें जरूर होतें. संध्याकाळ होऊं लागली होती. त्या चौघांना सावरीत गिर्यारोहक उतरत होते. बर्फप्रवाहावर पोंचले तेव्हां अंधार पडला होता. दिवसभरच्या श्रमांमुळें, व काळजीमुळें त्या तिघां गिर्यारोहकांना खूप ताण पडला होता. ते कसेंबसें पावलें टाकीत होते. खालून नोएल व ओडेल त्यांच्यासाठीं गरम रस्सा घेऊन वरती येत होते. त्यांची गांठ पडल्यावर गिर्यारोहक मटकन् खालींच बसले. त्यांच्या तोंडांतून शब्द निघेना. भारवाहकांची स्थिति तर फारच वाईट झाली होती.

प्रतिकूल हवामानांत सुधारणा न झाल्यामुळें तिसरा तळ सोडून देऊन पुन्हा एकदां खालच्या तळावर जाण्याची आज्ञा नॉर्टननें दिली. माघार घेणाऱ्या एखाद्या सैनिकी पथकाप्रमाणें ते परत खालीं आले. पन्नासापैकीं फक्त पंधराच भारवाहक कार्यक्षम राहिले होते. त्यामुळें थोडे भारवाहक व बेताचें सामान वर नेऊन, थोड्या अवधींत गिर्यारोहकांच्या तीन जोड्यांनीं एका मागोमाग एक असें, शिखरावर हल्ले करावें असें सर्वानुमतें ठरलें.

पुन्हां जोरानें वर चढणीला सुरवात झाली. जूनच्या दोन तारखेला मॅलरी व जॉफ्रे ब्रूस यांनीं २५००० फुटांवर पांचवा तळ बनविला. त्याच दिवशीं नॉर्टन आणि सॉमरव्हेल हे चौथ्या तळावरून पांचव्या तळावर जात होते. सकाळच्या प्रहरी देखावा अप्रतिम होता, म्हणून सॉमरव्हेलनें कॅमेऱ्यानें फोटो घ्यायचें ठरविलें. परंतु गार वारा वाहात होता. त्यामुळें थंडी एवढी तीव्र होती कीं, हातावरील हातमोजे एकदोन सेकंदापेक्षां जास्त वेळ काढून ठेवतां येत नव्हते. हातमोजे काढून त्यानें कॅमेरा उघडला पण तेवढ्या अल्पकाळांत हात इतके गारठले कीं लगेच हातमोजे घालून तो हात चोळूं लागला. पुन्हां हात बाहेर काढले, पण थंडीनें बोटें इतकी आखडली होती कीं कॅमेऱ्याचें शटर दाबतां येईना. कांहीं वेळ मोजे घातल्यावर, पुन्हां एकदां मोजे काढून त्यानें शटर दाबण्याचा प्रयत्न केला. तो मात्र यशस्वी झाला, व एव्हरेस्टच्या उत्तर बाजूच्या देखाव्याचा एक उत्तम फोटो त्याला मिळाला.

मॅलरी व जॉफ्रे ब्रूस वरून परत येत होते, त्यांची या दोघांशी गांठ पडली. पण झोंबणाऱ्या वाऱ्यांत त्यांना फार वेळ बोलतां आलें नाहीं. रात्रीं नॉर्टन व सॉमरव्हेल या दोघांनीं पाचव्या तळावर मुक्काम केला. सकाळीं २७००० फुटावर सहावा तळ बनविण्याकरितां ते दोघे लवकर उठले. पण २७००० फुटांच्यावर ओझीं वाहून नेण्यास भारवाहक तयार होईनात. नॉर्टननें त्यांच्या तंबूपाशीं उभे राहून जवळजवळ चार तास त्यांची विनवणी केली, व त्यांना नानाप्रकारें सांगून पाहिलें. अखेरीस लखपा चेडी नांवाचा भारवाहक उठला व त्यानें बाकीच्यापैकी दोघांना तयार केले. सकाळीं ९ वाजतां दोन गिर्यारोहक व पांच भारवाहक पाचव्या तळावरून निघाले. जवळील एका दुसऱ्या डोंगरावर चढून कॅप्टन नोएलनें सिनेकॅमेऱ्यानें त्या दोघांच्या २७००० हजार फूटावरील आरोहणाची फिल्म घेतली. त्यांनीं त्या दिवशीं २६८०० फुटांवर एक चौथरा तयार करून तेथें

सहावा तळ बनावेला. जगाच्या इतिहासांत एवढया उंचीवर बनविलेला हा पहिलाच तळ होता. हा तळ बनविण्याचें श्रेय गिर्यारोहकांइतकेंच शूर भारवाहक लखपा चेडी यांस आहे. सॉमरव्हेलनें त्याची पाठ थोपटून शाबासकी दिली. पुढें कांहीं वर्षांनीं सॉमरव्हेल दार्जिलिंगला गेला असतां, तेथील एका हॉटेलांत लखपा चेडी वेटरचें काम करीत असतांना त्याला दिसला. तेव्हां शूर लखपा चेडीच्या या दोन्ही अवस्थेंतील फरकाची जाणीव होऊन सॉमरव्हेलला वाईट वाटलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळी उठून तंबूचा पडदा बाजूला करून नॉर्टन व सॉमरव्हेल यांनीं पाहिलें तेव्हां सूर्योदय झाला होता. त्यांनीं आदल्या दिवशीं रात्री हिम वितळवून थर्मासमध्यें गरम पेयें भरून घेतली होती. रात्रभर तुफान चालू होतें. त्यामुळें रात्रीं त्यांना वारंवार उठून बाहेर येऊन खुंट्या ठोकून तंबूचें दोर ताणून घ्यावे लागलें होते. त्यांचा तंबू १९२२ च्या मोहिमेंतील सर्वांत उंचींच्या तळापेक्षां एक हजार फूट वर होता. निघण्यापूर्वी थोडी न्याहारी करून ते सात वाजण्यापूर्वींच शिखराची वाट चालूं लागले. सूर्याच्या किरणांपुढें धुक्याची पांगापांग होत होती. सूर्यकिरणांनीं न्हाऊन निघाल्यामुळें हिम चमकत होतें. एकंदर वातावरण एव्हरेस्टवरील चढाईला अनुकूल होतें. परंतु ते दोघे, मोहिमेच्या सुरवातीस जितके दमदार होते तितके आतां राहिले नव्हते. तसें असते तर अशा अनुकूल हवेंत त्यांनीं शिखर गांठलें असतें. उंचीवरील विरळ वातावरणाचा परिणाम त्यांच्यावर होऊं लागला. एक पाऊल टाकल्यावर पूर्वी चार वेळा श्वासोच्छ्वास करावा लागत होता, तेथें आतां दहा वेळा श्वासोच्छ्वास केल्यावर मग पुढचें पाऊल टाकायची शक्ति येत होती. याखेरीज, दर पांच मिनिटांनीं खालीं बसून ते विश्रांति घेत होते. एव्हरेस्टच्या उत्तर बाजूवर चालणें कठीण होतें. तेथील दगड घरावरील मंगलोरी कौलासारखे उतरते होते. अशा फरशीवजा दगडावर जें हिम पडलें होतें ते पावडरीसारखे होतें. त्यामुळें घसरण्याची जास्तच भीति

होतो. ते दोघे जोराजोरानें श्वासोच्छ्वास करीत हळूहळू चढत होते. तोंडाला कोरड पडत होती. सुमारें एक हजार फूट चढून गेल्यावर सॉमरव्हेलला खोकला आला. खोकून खोकून छाती फुटेल कीं काय असें त्याला वाटूं लागलें. कुदळीच्या आधारानें उभा राहून तो उद्गारला,

"नॉर्टन माझ्याच्यानें आतां पुढें येववत नाहीं."

"मी थांबू का तुला मदत द्यायला ?" नॉर्टननें विचारलें. सॉमरव्हेलला पहाटेपासून घसादुखीचा किती त्रास होत होता हें त्यानें पाहिलें होतें.

"नको, नको. तूं पुढे जा. जरा विश्रांति घेतल्यावर मला बरें वाटेल," सॉमरव्हेलनें उत्तर दिलें व तो खालीं बसला.

दरम्यान नॉर्टन पुढें जात होता. पण त्याची प्रगति मंद चालू होती. एका ठिकाणीं पुढें पाय कुठें टाकावा हे पाहाण्याकरितां त्यांनें आपला काळा चष्मा डोळयावरून काढला. त्यामुळें त्याच्या डोळयापुढें अंधेरी आली. ऑक्सिजनच्या कमतरतेमुळें त्याचे शरीर व मेंदू क्षीण झालें असल्यानें त्याला दोन दोन आकृत्या दिसूं लागल्या. वाटेंत खडक आहे असा भास होऊन तो एकदोनदां कल्पित खडकाला टाळून उगीचच बाजूनें गेला. अशा प्रकारें सुमारें तासभर हालचाल केल्यावर मागें वळून पाहतो तों त्याला केवळ शंभर फूट खालीं सॉमरव्हेलची आकृति दिसली. एका तासाच्या धडपडीनंतर अवघी शंभर फूट प्रगति ! अशा वेगानें शिखर गांठणें अशक्यच होतें ! तेथून शिखर जवळ दिसत होते. सारे हजार फूट उंच ! पण ते हजार फूट त्याच्याच्यानें चढून जाणें शक्य होते काय ? त्या वेळेस एक वाजलेला होता. एका तासास शंभर फूट या वेगानें चढून गेले तरीही तो रात्रीं पोहोचला असता. शिवाय त्या उतरत्या दगडावरून रात्रीं उतरायचे कसें ? तळावर पोचतां आलें नाहीं तर थंडीनें गारठून मृत्यू ठरलेलाच. समुद्रसपाटीपासून २८००० फूट चढून येणाऱ्या गिर्यारोहकांना

ते शेवटचे हजार फूट चढणें अशक्य होतें. एव्हरेस्टनें आपला बालेकिल्ला मोठा बळकट केला आहे. थकलेल्या गिर्यारोहकांनें मनाचा निर्धार करून व अंगांतील बळ एकवटून त्या बालेकिल्ल्यावर हल्ला केला तरी तेथील उंची, विरळ हवा, व कठिण खडक या तिन्हींमुळें त्याचें कांहीं चालत नाहीं. थकून गेले असताही त्याला प्रत्येक पाऊल काळजीपूर्वक टाकावें लागतें. छपरावरील कौलासारख्या त्या दगडावरून घसरगुंडी झाली तर वाटेंत कुठें न थांबता थेट दहा हजार फूट खालीं असलेल्या राँगबक बर्फ प्रवाहावर कोसळून पडण्याची भीति असते.

एका ठिकाणीं हिम खोल होतें. त्यांत नॉर्टन अवळजवळ कमरेपर्यंत बुडाला. तेथून स्वतःला कसाबसा बाहेर काढून, शिखराकडे एकदां नजर टाकून तो परत फिरला. सॉमरव्हेलपाशीं पोहोंचल्यावर त्याला एका हिमाच्छादित उतरंडीवरून उतरणें धोक्याचें वाटूं लागलें. म्हणून त्यानें सॉमरव्हेलला हांक मारून दोर देण्यास सांगितलें. त्या दोराच्या आधारानें तो उतरला. सहाव्या तळापाशीं पोचल्यावर, त्या दोघांनीं तेथील महत्वाच्या वस्तू बरोबर घेतल्या व ते पुढें चालूं लागले. सुमारें २५००० फुटांवर सॉमरव्हेलला पुन्हा खोकल्याची उंबळ आली. घशांत कांहींतरी अडकल्यासारखें वाटून त्याला धड श्वासोच्छ्वास करतां येईना. दोर बांधलेला नसल्यानें, पुढें उतरत असलेल्या नॉर्टनला कांहीं खूण करतां येईना. सॉमरव्हेल खालीं बसला. आता आपण जगणार नाहीं, असें त्याला वाटूं लागलें. त्याला कांहीं झालें आहे, हें न कळल्यामुळें नॉर्टन तसाच पुढें जात होता. सॉमरव्हेलनें पुन्हां जोरानें श्वासोच्छ्वास करून पाहिला. पण छे ! अखेर निर्वाणीचा उपाय म्हणून त्यानें दोन्ही हातांनीं छाती दाबली व नंतर छातीवर जोरानें बुक्की मारली. त्याच्या तोंडांतून रक्त आलें. पण घशांत जे अडकलें होतें तें मोकळें झाल्यानें त्याला बरें वाटलें, व वेगानें उतरून तो नॉर्टनला जाऊन मिळाला.

एखादे रेखाचित्र काढायला सॉमरव्हेल थांबला आहे अशी नॉर्टनची कल्पना झाली होती.

पांचव्या तळावर पोचेपर्यंत सूर्यास्त झाला होता. विजेच्या टॉर्चच्या प्रकाशांत उतरत ते चवथ्या तळावर पोहोंचले. तेथें असलेले गिर्यारोहक ऑक्सिजनची टाकी घेऊन बाहेर आले. पण त्या दोघांना ऑक्सिजनपेक्षां गरम पेयाची जास्त जरूर होती. गरम चहा व सूप पिऊन ते आपापल्या झोपण्याच्या पिशव्यांत शिरले. सॉमरव्हेलच्या खोकण्यानें त्याला झोंप येऊं दिली नाहीं. नॉर्टनला हिमांधत्व आले होतें. त्याला दुसऱ्या एका गिर्यारोहकानें धरून तिसऱ्या तळावरून खालीं नेलें. नॉर्टनचा पाय आपल्या हातानें उचलून हिमांत खोदलेल्या पायरींत ठेवीत व त्याला सांभाळीत नेत असतां त्या गिर्यारोहकाला किती कष्ट पडले असतील याची कल्पनांच करावी.

आतां शिखरावर चढाई करण्याची पाळी मॅलरी व अर्व्हिन् या जोडीची होती. चवथ्या तळापर्यंत चढउतर केल्यामुळें मॅलरी जरी थकला होता तरी त्याचा उत्साह दुर्दम्य होता. तिन्ही मोहिमांत भाग घेतल्यानें एव्हरेस्टवरील गिर्यारोहणांत तो वाकबगार होता. तेथील अडचणी व धोके याची त्याला चांगली माहिती होती. या मोहिमेची पूर्व तयारी चालूं होती त्या वेळेस त्याची केंब्रिज विश्वविद्यालयांत अध्यापक म्हणून नेमणूक झालेली होती. तेथें हुशारी दाखविण्यास त्याला चांगला वाव होता. त्याचें वय त्यावेळीं ३७ वर्षांचें होतें. एव्हरेस्टवर चढून जाण्याचें प्रयत्न ३५ वयाच्या आंतील तरुणांनीं करावेत असें त्याचें मत होतें. असें असतांहीं एव्हरेस्ट पथकांत सामील होण्याची विनंति त्यानें ताबडतोब मान्य केली. एकदां भाग घेतल्यानंतर, त्याच्या अंगांत गिर्यारोहकाचें स्फुरण चढलें, व एव्हरेस्टच्या टोकावर चढून जाण्याचा निकराचा प्रयत्न करण्याचें त्यानें आपल्या मनाशीं ठरविलें.

एरवी बोलतांना, " एव्हरेस्ट चढून जाण्याचा संभव फारच अल्प आहे, " असे तो प्रतिपादीत असे. मनांतून मात्र शिखरावर जाऊन उभें राहण्याची आशा, त्याला वाटत होती. आतां हवामान सुधारलें होतें. नॉर्टन व सॉमरव्हेल यांची जोडी कृत्रिम ऑक्सिजन बरोबर न घेतां २८००० फुटापर्यंत जाऊन आली होती. तेव्हां ऑक्सिजन घेऊन जाणारी जोडी यापेक्षां वर जाऊं शकेल असें सर्वांना वाटत होतें. प्रयत्नांची आणखी शिकस्त केली, कळ सोसली, हवामान अनुकूल राखून दैवानें आयत्या वेळेस हात दिला, तर शेवटचें हजार फूट चढून आपण एव्हरेस्टच्या शिखराला वेसण घालूं शकूं असें त्यांना वाटूं लागलें.

ज्या दिवशीं नॉर्टन व सॉमरव्हेल खालीं परतलें त्याच दिवशीं म्हणजे ता. ४ जून रोजीं मॅलरी व अर्व्हिन् यांनीं नॉर्थकोलवरील तळ गांठला. ता. ६ रोजीं आठ भारवाहक बरोबर घेऊन ते पांचव्या तळावर, व ता. ७ रोजीं सहाव्या तळावर गेले. त्यांच्या पाठ राखणीचें काम ओडेलवर सोंपविलें होतें. त्याची तब्येत उत्तम असल्यानें शिखरावर चढाई करण्याची संधि आपल्याला मिळावी असें त्याला साहाजिकच वाटत होतें. शिखरावर प्रथम पाय ठेवणाऱ्याला मोठा मान मिळाला असता. पण मॅलरीनें अर्व्हिनलाच बरोबर घेण्याचें ठरविलें, व त्याला नॉर्टननें संमति दिली. पथकाच्या अंतिम यशासाठीं आपली इच्छा बाजूस ठेवून, आपल्यावर सोंपविलेलें मदतनिसाचें काम ओडेलनें उत्तमपणें पार पाडलें. तो त्या दिवशीं पांचव्या तळावर जाऊन पोहोंचला. दुसऱ्या दिवशीं सहाव्या तळावर जाऊन, स्वैपाक व गरम पेयें बनवून अंधार पडायच्या आंत पांचव्या तळावर परत यायचें, हें त्याचें काम होतें. कांहीं झालें तरी त्यानें सहाव्या तळावर राहायचें नाहीं. कारण तेथें जो एकच तंबू होता, तो दोघे गिर्यारोहक जेमतेम मावतील एवढाच मोठा होता.

त्या रात्रीं ओडेल २५००० फुटावरील पांचव्या तळावर एकटा झोपला. सूर्यास्ताचे सुमारास तंबूच्या बाहेर येऊन तो सृष्टिशोभा पाहात होता. मावळत्या सूर्याची पिवळी व तांबडी किरणें जवळच्या शिखरांवर पडून ती शिखरें जळत्या मशालीसारखी दिसत होती. त्या धूसर वातावरणांत मधून मधून दिसणारी शिखरें पाहून, पृथ्वी सोडून दुसऱ्याच एका ग्रहावर आपण आलो असल्याचा भास त्याला झाला असल्यास नवल नाहीं. कांहीं वेळानें सूर्य मावळून अंधार झाला. विरळ वातावरणांत चांदण्या तेजानें चमकूं लागल्या. बाहेर उभे राहिल्यानें ओडेलला थंडी वाजू लागली. म्हणून तो घाई-घाईनें तंबूंत शिरला, व त्यानें तंबूचे पडदे काळजीपूर्वक बंद करून टाकले.

दुसऱ्या दिवशीं पहाटे झोपण्याच्या पिशवींतून बाहेर पडून तो कामाला लागला. त्याच्याहून दोन हजार फूट वर झोपलेले दोघेजण उठले असतील कीं नाहीं, याची तो मनाशीं कल्पना करीत होता. " आजचा दिवस महत्वाचा आहे. आपण येथून वर जायला निघण्याच्या आधीच ते दोघे सहाव्या तळावरून शेवटचा हल्ला करायला निघाले पाहिजेत. अर्व्हिन्‌चा खोकला बरा झाला कीं नाहीं ? नाहींतर कठीण काम आहे ! " अशाप्रकारें विचार करीत, पाठीवर अन्नपदार्थांनीं भरलेली पिशवी घेऊन ओडेल वर जायला निघाला. त्याला वर जाण्याची घाई नव्हती. म्हणून तो सावकाश जात होता. मधून मधून एकादा दगड हातांत घेऊन तो निरखून पाही. भूगर्भशास्त्रज्ञ असल्यानें वर आढळून येणाऱ्या दगडांसंबधीं व खडका-संबंधी त्याला कुतूहल होतें. मधून मधून तो शिखराकडे पाहत होता. " मॅलरी व अर्व्हिन् कुठे दिसताहेत काय ? नशीब आहे दोघांचें ! अजून कोणीही गेलें नाहीं अशा ठिकाणी जाण्याची त्यांना संधि मिळाली आहे, " असा तो विचार करीत आहे तोंच एक गोष्ट घडली. ती तो कधीही विसरणें शक्य नाहीं. त्याच्यासमोरील ढग दुभंगून बाजूला झाले, आणि त्याला शिखराजवळची चढण सूर्यप्रकाशांत स्वच्छ दिसूं लागली.

जिज्ञासापूर्वक तो शिखराकडे निरखून पाहूं लागला. शिखराजवळ दिसणाऱ्या दोन मोठ्या पायऱ्यांपैकीं खालच्या पायरीच्या उतरंडीवरील हिमांत एक काळा ठिपका हालतांना त्याला दिसला. त्या नंतर मागून दुसरा एक काळा ठिपका येऊन त्या पाहिल्या ठिपक्याला मिळाला. ओडेलचें कुतूहल वाढलें व तो जास्तच रोखून पाहूं लागला. पण तीनचार मिनिटांत वाऱ्यानें ढग पुन्हां एकत्र येऊन, शिखर व त्या आकृत्या दिसेनाशा झाल्या. ते दोन काळे ठिपके म्हणजे शिखरापाशी चढत असलेले मॅलरी व अर्व्हिनच होत अशी ओडेलची खात्री झाली. त्या तीनचार मिनिटांत त्यानें जो चित्रपट पाहिला त्यांतील पात्रें मॅलरी व अर्व्हिन् हे पुन्हा कधींही दिसणार नाहींत, याची ओडेलला तेव्हां काय कल्पना असणार ?

त्यावेळेस मध्यान्ह होऊन गेली होती. मॅलरी व अर्व्हिन् यांच्या शिखर चढून जाण्याच्या शक्याशक्यतेबद्दल ओडेलच्या मनांत विचारचक्र सुरू झालें. ते दोघे जेथें दिसले, तेथून शिखरमाथा हजार फूट वर होता. ऑक्सिजनच्या उपकरणाचें ओझें अंगावर घेऊन, त्या उंचीवर, उभी चढण चढणें फार कष्टाचें होतें. तेथून शिखरापर्यंत पोचायला त्याना चार पांच तास सहज लागले असते. शिखरावर जाऊन परत सहाव्या तळावर यायचें म्हणजें निदान माध्यान्हीच्या वेळीं तरी शिखरावर पोहोंचले पाहिजे. सुरक्षिततेच्या दृष्टीनें पाहिलें, तर यापूर्वींच शिखराहून परतीचा प्रवास सुरू केला पाहिजे. मॅलरीला या गोष्टीची पूर्ण कल्पना होती. मग ते एवढया उशीरा वरती कसें चढत होते ? कदाचित् ऑक्सिजनच्या उपकरणांत कांहीं बिघाड झाला असेल; किंवा तब्येत ठीक नसल्यानें, वा प्रतिकूल हवेमुळें, त्यांना निघायला उशीर झाला असेल. याच्यापुढें चढून शिखर गांठून, रात्रीच्या आंत परत येणें शक्य नव्हतें, हें दिसतच होतें. शिखरापर्यंत जाण्याचा मोह आवरून, मॅलरी अर्व्हिन्सह योग्य वेळीं परत फिरेल असें ओडेलला वाटत होतें.

वाऱ्यानें हिम उधळत होतें. खडकांमध्यें थोडावेळ शोधल्यावर ओडेलला सहावा तळ सांपडला. तंबूंत जाऊन त्यानें जरा वेळ विश्रांति घेतली. बाहेर वाऱ्याचा घूं घूं असा आवाज येत होता. ओडेलच्या मनांत त्या दोघांच्या हालचालीखेरीज दुसरा विचार नव्हता. "ते शिखरावरती पोहोंचले असतील कां ? कां आधीच मागे फिरले असतील ? बहुतेक पूर्ण विचार करून ते मागेच फिरले असावेत. उडत असलेल्या हिमामुळें त्यांना सहाव्या तळाचा तंबू चटकन दिसणार नाहीं. त्यांना गरम पेयाची फार जरुरी असेल," असा विचार करून तो त्यांना मदत करण्याच्या हेतूनें तंबूच्या बाहेर पडला. बाहेर हवेचा जोर वाढला होता. त्यांचें लक्ष वेधण्याकरितां शीळ घालीत, व त्या दोघांना हांका मारीत, ओडेल पुढें चालला होता. परंतु त्यांच्या हांकेला वाऱ्याच्या आवाजाखेरीज दुसरें उत्तर आलें नाहीं. अखेरीस त्यांचा नाद सोडून देऊन तो परत तळावर आला. सायंकाळ व्हायला अजून कांहीं अवकाश होता. त्यामुळें त्यांच्याविषयीं काळजी करण्यासारखें नव्हतें. आपल्याबरोबर आणलेले अन्नपदार्थ तेथें नीट ठेवून, तंबू बंद करून तो थेट खालीं नॉर्थ कोलवरील चवथ्या तळावर गेला.

चवथ्या तळावर त्याच्या जोडीला हॅझार्ड होता. त्या दोघांनीं वरच्या चढणीवर निरखून पाहिलें, पण तेथें गिर्यारोहकांची हालचाल दिसली नाहीं. ते दोघे एव्हाना सहाव्या तळावर परतले असतील अशी आपल्या मनाची समजूत करुन घेऊन, अंधार होऊं लागल्यामुळें ओडेल व हॅझार्ड तंबूंत शिरले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं डोळयाला दुर्बिण लावून ते सहाव्या तळाकडे पाहूं लागले. पण तेथें कांहीं हालचाल दिसली नाहीं. मग मात्र त्यांना त्या दोघांच्या सुरक्षिततेविषयीं शंका वाटूं लागली. ते वारंवार तंबूच्या बाहेर येऊन, डोळ्यांस ताण पडेतोंपर्यंत आळीपाळीनें दुर्बिणीनें डोंगराची वरची बाजू न्याहाळत होते. त्यांनीं दुपारपर्यंत वाट पाहिली. तरी सुद्धा मॅलरी–अर्व्हिन्‌च्या हालचालीची कांहीं चिन्हें दिसेनात.

मग मात्र त्यांच्याच्यानें स्वस्थ बसवेना. दोन भारवाहक बरोबर घेऊन ओडेल त्या दोघा गिर्यारोहकांच्या शोधार्थ निघाला. त्या दिवशींची रात्र त्यांनीं पाचव्या तळावर काढली. थंडी जबरदस्त होती. अंगावरचे कपडे न काढतांच, ओडेल झोपण्याच्या पिशवीत शिरला. मॅलरी-अर्व्हिन्‌संबंधांच्या विचारांनीं त्याला रात्रभर झोप येऊन दिली नाहीं.

"मॅलरी-अर्व्हिन् कां बरे आले नाहींत?" तो स्वतःशी विचार करीत होता, "वरती हवा एवढी बिघडली कीं काय? एव्हांना ते पाचव्या तळावर परत यायला पाहिजे होते. सहाव्या तळावरील त्या छोट्याशा तंबूत दोन दिवस काढणें त्यांना शक्य नाहीं. मग काय कुणाची प्रकृति बिघडली कीं काय? एकाची प्रकृति बिघडली असली तर दुसरा त्याला सोडून खालीं यायचा नाहीं. का ते कुठें घसरले कीं........." ती शेवटची कल्पना येताच त्याला कसेंसें झालें. त्यानंतर त्याचा अजिबात डोळा लागला नाहीं. पहाट केव्हां होते आणि आपण या शंकाकुशंकांचें निरसन केव्हां करतो असें त्याला झालें.

पहाटे उठून त्यानें पाहिलें तेव्हां, थंडीनें गारठल्यामुळें पुढें येण्यास भारवाहक असमर्थ दिसत होते. आदल्या रात्रीं फार थकून गेल्यामुळें खाद्य-पेयें गरम करून खाण्याचा त्यांनीं कंटाळा केला व ते तसेंच झोपले होते. त्यामुळें सकाळीं त्यांच्या अंगात त्राण उरलें नाहीं. ओडेलनें त्यांना चवथ्या तळावर परत जाण्यास कांहीं अंतरापर्यंत मदत केली. आणि तो एकटाच सहाव्या तळावर जायला निघाला. त्याची प्रगति हळूहळू होत होती. बाजूनें येणारा वारा जोराचा होता. त्यामुळें सरळ उभें राहणें कठीण होत होतें. मधून मधून खडकाच्या आड निवाऱ्याच्या जागी उभा राहून तो विश्रांति घेत होता.

सहाव्या तळावर मनुष्यवस्तीचें कांहींच चिन्ह दिसेना. तंबूचें पडदे बांधलेलें होतें, व तंबू थोडासा कोलमडला होता. काय झालें

असेल याची कल्पना येऊन त्याच्या पोटांत कळमळूं लागलें. त्यानें हांका मारल्या. 'ओ' द्यायला तिथें कोण होतें! "आंतमध्यें ग्लान स्थितींत तरी ते दोघे गिर्यारोहक दिसतील," अशी शेवटची आशा करून त्यानें थरथरत्या हातानें तंबूचा पडदा बाजूला सारला. पण तेथें कोणी नव्हतें. दोन दिवसांपूर्वी त्यानें कपडे, अन्न व इतर वस्तू जशा ठेवल्या त्या तशाच होत्या. तें दृश्य पाहून ओडेलला सर्व कांहीं कळून चुकलें. "मॅलरी व अर्व्हिन् सहाव्या तळावर परतलेच नाहींत. ते अजून कुठें तरी पर्वताच्या पाठीवर असले पाहिजेत," ओडेलचें विचारचक्र पुन्हां सुरू झालें. "तो दमदार अर्व्हिन् आणि तो सर्वांचा आवडता मॅलरी, दोघे नाहींसे झाले असतील ? छे ! शक्यच नाहीं. अशी चांगली माणसं इतक्या लवकर या जगांतून निघून जातात काय ? अगदीं व्यवस्थित-पणें चढत असतांना त्यांना आपण परवाच पाहिलें होतें. आतां ते पुन्हां दिसणार नाहींत! असें कसें होईल ?" हताश होऊन ओडेल खालीं बसला. पण कितीहि विचार केला तरी झालेली गोष्ट थोडीच बदलणार होती. बाहेर तुफानाचा आवाज चालू होता.

स्वतःच्या मनाची समजूत घालून ओडेलनें अंगांत बळ आणिलें. 'स्वस्थ बसून कांहीं उपयोग होणार नाहीं. आपल्या हातून जितकें होईल तितकें केलें पाहिजे,' असा विचार करून तो त्यांचा शोध करण्याकरितां निघाला. निदान त्यांचीं प्रेतें तरी सांपडतील. आणि दैवी योजना असेल तर कदाचित् ते जिवंतही सांपडतील. आशा अमर असतें. ओडेल वर चढूं लागला. वादळाचा जोर वाढत होता. गेल्या तीन दिवसांत दोन वेळां खालच्या तळावरून २७००० फुटांवर चढून आल्यामुळें तो थकला होता. मॅलरी व अर्व्हिन् हे जिवंत भेटतील किंवा निदान त्यांचीं प्रेतें तरी दिसतील या आशेच्या जोरावर तो चढण्याचें कष्ट करीत होता. परंतु त्यांचा ठावठिकाणा मिळेना. शेवटीं तो परत फिरला. आतां

त्यांना शोधणें व्यर्थ होतें. सहाव्या तळावरील तंबूतील त्या दोघा गिर्यारोहकांच्या पराक्रमाच्या स्मृतीचें चिन्ह अशा, व इतर मौल्यवान् वस्तू बरोबर घेऊन, त्यानें तंबू बंद केला व पूर्व संकेताप्रमाणें इशारा करून झालेल्या अनर्थाची बातमी ह्रॅझार्डला कळविली.

खालच्या तिसऱ्या तळावरून नोएल लांब पल्ल्याच्या दुर्बिणीनें वरच्या भागाकडे निरखून पहात होता. चवथ्या तळाजवळील हिमावर ह्रॅझार्डनें एका शेजारी एक पिशव्या ठेवून क्रॉसची खूण बनविली. ती नोएलला दिसली. त्याची छाती धडधडूं लागली. क्रॉसची खूण म्हणजे अपघाताची वार्ता असा त्यांचा पूर्वसंकेत होता. आपण पाहिलेली खूण क्रॉसचीच आहे काय हें नक्की ठरविण्याकरितां त्यानें जवळच उभ्या असलेल्या ब्रूसजवळ दुर्बिण दिली. ब्रूसनें पाहिले; तो क्रॉसच होता. पर्वताकडे पहात त्या दोघांनीं लांब सुस्कारा सोडला. अपयश घेऊन कां होईना मॅलरी व अर्व्हिन् परत येतील असें त्यांना वाटत होतें. ती आशा नष्ट झाल्यावर त्यांना दुःख झालें. त्यांनीं ही बातमी पथकाचा नेता नॉर्टन यांस सांगितली. नॉर्टनही स्तंभित झाला. त्या दोघां गिर्यारोहकांच्या मृत्यूबद्दल त्याला वाईट वाटलेच, पण आपण नेते असतांना त्यांचा मृत्यू होऊं दिला याबद्दल त्याला टोचणी लागली. अर्थात्, त्यांच्या या अपघाती मृत्यूची जबाबदारी त्याच्यावर नव्हती.

त्या दोघां गिर्यारोहकांचा शोध करण्याकरितां पर्वतावर व पायथ्या-जवळील दऱ्यांत जाण्याची तयारी दोघांतिघां गिर्यारोहकांनीं दाखविली. पण नॉर्टननें त्याला विरोध केला. त्यांच्या शोधार्थ जाण्यांत कांहींही उपयोग नव्हता. ते नाहींसें होऊन चारपांच दिवस झाले होते. नॉर्टननें इंग्लंडला पाठवायचा संदेश तयार करून फारी येथील मुख्य तळावर पाठवून दिला, व चवथ्या तळावरील लोकांना खालीं येण्याचा हुकुम दिला.

मॅलरी व अर्व्हिन् जगांतील अत्युच्च शिखरापाशीं कायमचे नाहींसें झाले.

ते कसे नाहींसे झाले हें एक गूढच राहिलें. * शिखरावर जात असतां ते मरण पावले की शिखरावर पोंचून सहाव्या तळावर परत जात असतां त्यांना मृत्यू आला, हा प्रश्न वादग्रस्तच राहिला. पुढे नऊ वर्षांनीं १९३३ च्या मोहिमेंतील हॅरिस नामक गिर्यारोहकाला सहाव्या तळाच्यापुढें कड्याखाली एक कुदळ सांपडली. ती मॅलरी किंवा अर्व्हिन् यापैकी कुणाची तरी होती. ती कुदळ सांपडल्यानंतर गिर्यारोहकांत मॅलरी व अर्व्हिन् यांच्या गिर्यारोहणाविषयीं, पुन्हां चर्चा झाली. पण निश्चित व खात्रीलायक मत अजून कोणीही देऊ शकलें नाहीं.

दुःखद योगायोग असा कीं, इकडे मॅलरीची एव्हरेस्टवरील अखेरची चढाई चालू होती त्याच सुमारास, त्याच्या हातचें पत्र इंग्लंडच्या मार्गावर होतें. त्यांत त्यानें लिहिलें होतें, "शिखरावर जाणें आम्हाला शक्य होवो वा न होवो. पण कांहीं झालें तरी पथकांतील सर्वांना सुरक्षितपणें खालीं आणण्यासाठीं मी माझ्याकडून शक्य ते प्रयत्न करीन. कोणीही गिर्यारोहक किंवा भारवाहक प्राणास मुकणार नाहीं याबद्दल माझ्याकडून शक्य ती काळजी घेईन"

मॅलरी व अर्व्हिन् यांना कसा मृत्यू आला ? कड्यावरून घसरून तडाफडकी, किंवा सहाव्या तळावर पोचूं न शकल्यामुळें भुकेनें व्याकूळ होऊन, अथवा थंडीनें गारठून जाऊन, हें कोणीही सांगू शकत नाहीं. ते शिखरावर जाण्यांत यशस्वी झाले, कां वर जाण्याचा प्रयत्न करीत असतानांच त्यांना मृत्यू आला हेंही रहस्य कोणी उकलू शकत नाहीं. कसेही

---

* मॅलरीचे बंधू सर ट्रॅफर्ड मॅलरी हे ब्रिटिश विमानदळांत मोठे अधिकारी होते. सन १९४४ सालीं ते विमानानें हिंदुस्थानांत येत असतां त्यांचें विमान वाटेंत बेपत्ता झाले. त्याचा शोध लागला नाहीं. दोघेही भाऊ जगांतून असें एकाएकीं नाहींसे झाले व दोघांचाही शोध लागला नाहीं हा केवढा योगायोग !



पायथ्याच्या तळावरून एव्हरेस्टचा टेलिफोटो. ( सन १९३३ )

असलें, तरी अशा उच्च ध्येयासाठीं झगडत असतां त्यांना मरण आलें ही गोष्ट महत्वाची आहे, एव्हरेस्ट हें त्याच्या बलिदानाचें कायमचें स्मारक झालें आहे. एव्हरेस्टवर जाऊन आपले प्राण धोक्यांत घालण्याची त्यांना काय जरूर होती? त्यांचे जीव नाहक गेलें नाहींत कां? असें प्रश्न कांहीं-जण विचारतील. सॉमरव्हेलनें आपल्या आत्मचरित्रांत या प्रश्नांना उत्तरा-त्मक लिहिलें आहे, "पृथ्वीच्या पाठीवर असलेल्या अत्युच्च शिखरावर, पूर्ण तयारी करून जाणाऱ्या धाडसी जीवांचे प्राण फुकट गेले असें कसें म्हणतां येईल? मानव जातीची धाडसी वृत्ति जगविण्याकरितां अशा प्राणांचें मोल मधून मधून द्यावें लागतें. मनुष्यांतील ही धाडसी वृत्ति नाहींशी झाली तर त्याचें जीवन नीरस होईल, व मानवजातीची प्रगति खुंटेल. हा मुद्दा सोडून दिला, तरी पर्वतांशी झुंज करितांना आलेलें मरण, माणसामाणसांतील युद्धामध्यें आलेल्या मरणापेक्षां जास्त उदात्त आहे." अज्ञाताच्या शोधासाठीं जिवापाड श्रम करून, त्यासाठीं वेळ प्रसंगीं जिवाचें मोल देणाऱ्या महात्म्यांची वाण मानवजातींत पडूं लागली, तर मानवजातीची प्रगति थांबेल. आज ज्या गोष्टी अंगवळणी पडल्या आहेत, त्याचें प्रथम ज्ञान होण्याकरितां किती माणसांनीं साहसें केली आहेत याचा आपण विचार करतो कां? अफाट दर्यांत आपली नौका घेऊन कोलंबस निघाला, तेव्हां तो आपल्या जिवावर उदार झाला आहे असें लोकांना वाटलें. पण त्यानें शोधून काढलेलें अमेरिका खंड आज सुधारणेच्या शिखरावर आहे. विमानानें आरामशीर प्रवास करून मुंबईहून दिल्ली, दिल्लीहून कलकत्ता अशा दूरदूरच्या ठिकाणीं थोड्या तासाच्या अवधींत जातां येतें. मुंबईहून उतारू घेऊन निघालेलें विमान अवघ्या चार दिवसांत, न्यूयार्कला जातें. अशी वेगानें धावणारी, व नव्या नव्या बांधणीची विमानें प्रथम उडविण्याचा प्रयोग करितांना कितीतरी धाडसी संशोधकांचे व वैमा-निकांचें बळी गेलेलें आहेत. त्यांच्या धाडसी वृत्तींमुळेंच आज आपल्याला

एवढ्या जलद व सोयिस्कर रितीनें एका ठिकाणाहून दुसरीकडे जातां येतें. स्वतंत्र भारताचा ध्यास घेऊन त्यासाठीं आपलें आयुष्य वेचणाऱ्या धैर्यवान् व ध्येयनिष्ठ हिंदी वीरांनीं जे कार्य केलें, त्यामुळेंच आज आपण स्वातंत्र्याचा उपभोग घेत आहोत. " कुठे ब्रिटिश साम्राज्यशाही आणि कुठे तूं ! कशाला भिंतीवर डोकें आपटून घेतोस, " अशा प्रकारच्या उपदेशाला भीक न घालतां हिंदुस्थानांतील देशभक्तांनीं ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं झुंज केली नसती तर आपण अजून गुलामांचें जीवन कंठीत राहिलो असतो.



## प्रयत्न पुढें चालू : : ८

एव्हरेस्ट शिखराच्या अगदीं जवळ म्हणजे फक्त हजार फूट खालीं जे गिर्यारोहक जाऊन पोंहोंचले, त्यांना पुढें जाणें अशक्य झाल्यानें परत फिरावें लागलें. परत फिरतांना त्यांना खंत वाटली नाहीं. जिवाचें रान करून तेवढ्या उंचीवर चढणारा गिर्यारोहक शरीरानें व मनानें इतका थकलेला असतो कीं त्यावेळेस, यशापयशाची क्षिति बाळगण्याच्या मनःस्थितीत तो राहात नाहीं. उलट, परत फिरतांना, 'संपले एकदाचे कष्ट' असें वाटून त्याला बरेंच वाटतें. पण तोच गिर्यारोहक पर्वत उतरून खालच्या खोऱ्यांतील सुसह्य वातावरणांत गेला कीं एव्हरेस्ट जिंकण्याचा त्याचा उत्साह पुन्हा जागृत होतो. सन १९२४ च्या अपयशी पथकाचा नेता नॉर्टन यानें दार्जिलिंगला परत पोचण्यापूर्वींच तिबेटांतून इंग्लंडमधील एव्हरेस्ट कमिटीला तार पाठवून पुढल्या वर्षी पुन्हा एव्हरेस्ट मोहीम हाती घेण्याबद्दल सूचना केली होती. परंतु चामोलांग (एव्हरेस्ट) वरील दैवतानें त्या मोहिमेंतील दोघा गिर्यारोहकांचा बळी घेतला, ही बातमी दलाईलामाला कळल्यावर त्यानें पुढील मोहिमेस परवानगी देण्याचें नाकारलें. एव्हरेस्टवरील दैवताला त्रास झाल्यानें तें कोपलें आहे, पुन्हा मोहीम करून त्याला त्रास देण्यांत आला तर तिबेटवर अनर्थ ओढवतील, अशी समजूत त्याच्या सल्लागारांनीं

करून दिली. त्यामुळें पुढील आठ वर्षें एव्हरेस्ट मोहीम होऊं शकली नाहीं. अखेर, अनेक खटपटीनंतर १९३२ च्या ऑगस्टमध्यें दलाइलामानें एव्हरेस्ट-वर पथक नेण्यास परवानगी दिली. एव्हरेस्ट कमिटीनें पुढच्या वर्षी म्हणजे सन १९३३ च्या वसंत ऋतूंत एव्हरेस्टवर सुसज्ज मोहीम करण्याचा निर्णय घेतला, व ताबडतोब तयारीस सुरवात केली. पहिल्या मोहीमेपासून एव्हरेस्टचा पिच्छा पुरविण्याच्या श्रेयाचा बराचसा वांटा सर फ्रान्सिस यंगहजबंड यांजकडे आहे. त्यांनीं इंग्लिश लोकांत एव्हरेस्ट मोहिमांविषयीं जागृती व जुळवाजुळव करून एव्हरेस्टवरील चालू असलेल्या संग्रामास अनेक प्रकारें सहाय्य केलें.

१९२४ च्या मोहिमेनंतर नऊ वर्षें लोटल्यामुळें पूर्वीच्या मोहिमांतील गिर्यारोहकांचें वय पुन्हां मोहिमेंत भाग घेण्याचें राहिलें नव्हते. जनरल ब्रूस आतां वृध्द झाला होता. नॉर्टन मोहिमेंत भाग घेऊं शकला असतां पण त्याला ब्रिटिश सैन्यांत एका महत्त्वाच्या व जबाबदारीच्या जागेवर नेमण्यांत आले होते. सॉमरव्हेल यानें त्रावणकोर संस्थानांत मिशनरी डॉक्टरचा व्यवसाय पत्करिला होता. तेथें धर्मार्थ रुग्णालयांत अविश्रांत श्रम केल्यानें त्याची प्रकृति पूर्वीसारखी कणखर राहिली नव्हती. मोहिमेचें नेतृत्व ह्यू रटलज नांवाच्या एका सेवानिवृत्त आय. सी. एस. अधिकाऱ्याला देण्यांत आलें. रटलज सुमारें पांच वर्षें, हिमालयांतील आलमोडा जिल्ह्यांत अधिकाराच्या जागेवर होता. त्या काळांत त्यानें कुमाऊन हिमालयांत अनेक चढाया केल्या होत्या. त्याचें वय ४८ वर्षांचें होतें. त्यामुळें त्यानें वरच्या तळावर न जातां खाली राहून मोहिमेची हालचाल व व्यवस्था या संबंधीची नेत्याची कामगिरी करावी असें ठरलें होतें. प्रत्यक्ष गिर्यारोहकांची निवड करणें हें काम सोपें नव्हतें. एव्हरेस्टवर नवी मोहीम होणार हें प्रसिद्ध झाल्याबरोबर एव्हरेस्ट कमिटीकडे हजारों उमेदवारांचे अर्ज आले. त्यांत सैनिक, प्राध्यापक, शास्त्रज्ञ व इतर अनेक व्यवसाय करणारांचे अर्ज होते. कांहीं शालेय विद्यार्थ्यांनींही एव्हरेस्ट पथकांत आपल्याला घ्यावें अशी विनंति

केली होती. त्या अर्जदारांपैकीं कांहींना गिर्यारोहण म्हणजे काय याची सुद्धा कल्पना नव्हती. परंतु निवडसमितीनें, निवड करितांना उमेदवाराचें वय, शरीरप्रकृति, व गिर्यारोहणाचा अनुभव वगैरे गोष्टी ध्यानांत घेऊनच गिर्यारोहकांची निवड केली. सन १९३१ मध्यें एक पथक हिमालयांतील कामेट नांवाच्या २५४४७ फूट उंचीच्या पर्वतावर गेलें होतें. तें पथक कामेट शिखरावर जाण्यांत यशस्वी झालें होतें. या मोहिमेंतील एक खंदा गिर्यारोहक फ्रँक स्माइद याची एव्हरेस्ट मोहिमेकरिता निवड करण्यांत आली. स्माइदचें वय फक्त ३३ वर्षांचें होतें. पण त्यानें आल्प्स्‌मध्यें व हिमालयांत बरेच गिर्यारोहण केलें होतें. १९३० मध्यें कांचनजंगा पर्वतावर मोहिमेस गेलेल्या जर्मन पथकामध्येंही त्यानें भाग घेतला होता. गिर्यारोहण करीत असतांना छायाचित्रें घेण्याचा त्याचा आवडीचा छंद होता. स्माइदखेरीज एरिक शिप्टन, ग्रीन, बर्नी, विन् हॅरिस, वेजर, लाँगलँड वगैरे गिर्यारोहकांना पथकांत सामील करून घेण्यांत आलें. ब्रिटिश वैमानिक दलाच्या डॉक्टरांनीं या गिर्यारोहकांची सर्व प्रकारें कडक वैद्यकीय तपासणी केली.

कमिटीनें मोहिमेस लागणारें सामान व उपकरणी यांची काळजीपूर्वक निवड केली. त्यांना लागणारी साधनें निरनिराळ्या व्यापारी कंपन्यांनीं मोफत किंवा नाममात्र किंमतीस देऊं केली. असें करण्यांत एव्हरेस्ट मोहिमेला मदत करण्याखेरीज, त्यांनी तयार केलेल्या वस्तू एव्हरेस्टवर वापरण्यांत आल्या, अशी शिफारस मिळविण्याचा त्यांचा हेतु होता. मोहिमेला दीडदोन लाख रुपये खर्च येणार होता. एव्हरेस्ट कमिटीजवळ पाउणलाख रुपये शिल्लक होते. बाकीची रक्कम देणग्यांच्या रूपानें, व मोहिमेचा अधिकृत वृत्तांत छापण्याचा हक्क वृत्तपत्रांना विकून गोळा करण्यांत आली. मोहिमेकरितां लागणारे तंबू, विमानाच्या पंखाकरितां वापरण्यांत येणाऱ्या कॅनव्हासचे केलेले असून, कुठल्याही वादळांत टिकतील असे होते. इतके असूनही त्यांचें वजन प्रत्येकी सात शेर होतें. खालच्या तळांकरिता वेगळ्या

प्रकारचे व मोठे तंबू घेण्यांत आले. इतर साधनें बनवितांनासुद्धां एव्हरेस्ट-वरील हवामान लक्षांत घेऊन जरूर त्या योजना करण्यांत आल्या होत्या. बूट, गॉगल्स, हवाबंद कपडे, झोपण्याच्या पिशव्या, कुदळी, दोर, हात-मोजे, तंबूच्या मेखा, अन्नधान्य, स्टोव्ह, साधे व चलच्चित्रपटाचे कॅमेरे, वगैरे सर्व साधनें एव्हरेस्टवरील अडचणी व गरजा ध्यानांत घेऊन या मोहिमेसाठीं खास बनविण्यांत आली होती. हवामानाची बातमी कळविण्या-करितां, दार्जिलिंगहून पायथ्याच्या तळ वर संदेश मागविता यावे म्हणून बिनतारी संदेशवाहक बरोबर नेण्यांत आले. तिसरा तळ व नॉर्थकोलवरील चौथा तळ यामध्यें वापरण्याकरितां एक टेलीफोनही त्यांनीं बरोबर घेतला. टेलीफोन व बिनतारी संदेशवाहक यानीं आपली कामगिरी कशी बजा-वली याचें उदाहरण म्हणून एक प्रसंग सांगण्यासारखा आहे. २२८०० फुटावरील चौथ्या तळावर रटलजनें एक संदेश टाइपरायटरवर टाइप केला. एवढ्या उंचीवर पूर्वी कधी टाइपरायटर वापरला गेला नसेल! तो संदेश चौथ्या तळावरून टेलीफोननें तिसऱ्या तळावर पाठविण्यांत आला. तेथून बिनतारी संदेशवाहकाच्या सहाय्यानें पायथ्याच्या तळावर, व पाय-थ्याच्या तळावरून सांकेतिक भाषेत पुन्हां बिनतारीनें तो संदेश दार्जिलिंगला गेला. तेथून टेलिफोननें कलकत्ता व कलकत्त्याहून केबलनें लंडन येथील डेली टेलीग्राफ या वृत्तपत्राच्या कचेरींत. याप्रमाणें तो संदेश अवघ्या सहा तासांत चौथ्या तळावरून लंडनला जाऊन पोहोचला.

ऑक्सिजन बरोबर न्यावा कीं नाहीं या विषयीं पुन्हा चर्चा झाली. याविषयीं निर्णय होईना. म्हणून, ऑक्सिजनची उपकरणें बरोबर न्यावींत, परंतु तीं शक्य तो उपयोगांत आणूं नयेत असें त्यांनीं ठरविलें. उंचीवरील विरळ वातावरणांत राहाण्याची संवय हळूहळू अंगवळणी पडल्यास ऑक्सिजनची जरूरी भासणार नाहीं असें रटलजचें मत होतें. उंचीवर राहणें हळूहळू अंग-वळणी पडत गेलें तर गिर्यारोहकाची प्रकृति नीट राहून शेवटच्या चढाईकरितां

गिर्यारोहकाच्या अंगात दम शिल्लक राहील. याउलट, एका तळाहून दुसऱ्या तळावर जलदीनें चढत गेलें तर गिर्यारोहकाला वरच्या तळावरील वातावरण असह्य होतें व त्याच्या प्रकृतीवर परिणाम होतो. पर्वतावर चढण्याची घाई होऊं नये व भरपूर वेळ मिळावा, म्हणून लवकरच, म्हणजे मार्चच्या पहिल्या आठवड्यांत पथकानें दार्जिलिंगहून पुढें निघायचें ठरविलें.

कलकत्त्याच्या वेधशाळेतून वातावरणाचे अंदाज त्यांना तिबेटमध्यें नियमितपणें मिळतील अशी व्यवस्था करण्यांत आली होती. वेधशाळेतील वातावरणशास्त्रज्ञ डॉ. सेन यांनीं त्या वर्षी पावसाळयास लवकर सुरवात होईल असें मत व्यक्त केलें होतें. दुर्दैवानें तें अगदीं खरें ठरलें. पावसाळा लवकर आल्यानें त्यांच्या चढाईचा योजिलेला कार्यक्रम कसा बदलावा लागला तें पुढें ओघानें येईलच. दार्जिलिंगला पोंचल्यावर रटलजनें भारवाहकांची निवड केली. पूर्वीच्या मोहिमांत भाग घेतलेल्यांपैकीं लखपाचेडी, निमा तेंदुप, लेवा, नुर्सेंग, वगैरे शेर्पा व भुतिया, मोहिमेत सामील होण्यास उत्सुक होते. हिमालयांतील एखाद्या शिखरावर स्वारी होणार अशी खबर मिळतांच शेर्पा व भुतिया लोक दार्जिलिंगला खेपा घालूं लागतात. नेहमीच्यापेक्षां चांगली मजुरी व मोहिम संपल्यावर, बूट, गरम कपडे वगैरे मिळण्याची त्यांना आशा असतेच, पण त्यांनाही गिर्यारोहणाचा धाडसी खेळ आवडूं लागला आहे. एव्हरेस्टच्या शिखराचा कबजा व्हावा अशी तळमळ पाश्चात्य गिर्यारोहकांप्रमाणेंच त्यांनाही वाटूं लागली आहे. १९२२ व १९२४ च्या मोहिमांत भाग घेतलेल्या कर्मा पॉल नांवाच्या तिबेटी माणसाला दुभाषा म्हणून घेण्यात आलें. तिबेटांत सामान वाहण्यासाठीं याकची व्यवस्था करणें त्यांच्या भाड्यासंबंधी वाटाघाटी करणें, तसेंच तिबेटांतील गांवच्या पाटलांशी ( झाँगपेनशीं ) बोलणी करणें वगैरे कामी त्याचा पथकास फार उपयोग झाला.

दार्जिलिंगहून वाहतुकीचा व इतर बंदोबस्त करून पथक नेहमीच्या मार्गानें म्हणजे कालिपाँग, सिक्कीमची राजधानी गँगटॉक या गांवांवरून तिबेटांत प्रवेश करून, चुंबी खोऱ्यांत वाट चालूं लागलें. तिबेटांत शिरण्या-पूर्वी त्यांच्या परवान्याची कसून तपासणी करण्यांत आली. वाटेंत ज्या ज्या वेळीं त्यांची तिबेटी अधिकाऱ्यांशीं व लामांशी गांठ पडे त्यावेळीं, 'तुमचा एव्हरेस्टवर जाण्याचा हेतु काय ?' असा प्रश्न त्यांना बहुतेक सर्वांकडून विचारण्यांत येई. 'केवळ गिर्यारोहणाच्या हौशीसाठीं' असे सांगितलें तर तें त्यांना पटत नसे. तिबेटी लोकांना वाटे कीं, एव्हरेस्टवर सोन्याच्या खाणी किंवा असेंच कांहीं मौल्यवान असलें पाहिजे. त्याशिवाय, एवढ्या हाल-अपेष्टा सोसून हे लोक तिकडे कशाला जात असतील ?

पथक १९ मार्चला खंबाझाँग या ठिकाणीं पोहोंचलें. खंबाझाँगची उंची जवळील प्रदेशापेक्षा कमी म्हणजे सुमारे १३००० फूट आहे. म्हणून तिबेटमधील सुसह्य हवामानाची जीं कांहीं ठिकाणें आहेत त्यापैकीं तें आहे. उंच खडकावर बांधलेल्या तेथील किल्ल्याचें बांधकाम शिल्पकलेच्या दृष्टीनें प्रेक्षणीय आहे. तेथील झाँगपेन परगांवी गेला होता. म्हणून त्याच्या मदतनीसाला (न्यायपालला), पथकातर्फे एक हॅट, गॉगल्स, आरसा व दारूची बाटली या वस्तु नजर म्हणून देण्यांत आल्या. उलट, न्यायपालानें सहा डझन अंडीं दिली. ही देवाणघेवाण झाल्यानंतर चांग ( तिबेटी दारू ) पिण्याचा कार्यक्रम झाला. त्यानंतर पथकांतील गिर्यारोहकांनीं केलासच्या थडग्याला भेट दिली. तें थडगें ढांसळून गेलेलें त्यांना आढळलें. त्यावरील दगड पुन्हा नीट रचून, त्यांनीं तेथील लामाच्या मदतीनें त्यावर केलासचें नांव व त्याच्याखालीं 'ओम् मणि पद्मेहुम्' अशी अक्षरें खोदून घेतली. हेतु हा कीं, बौद्धधर्मीयांच्या प्रार्थनेंतील हे शब्द थडग्यावर लिहिल्यानें त्याची कोणी खराबी करूं नये.

खंबाझाँगहून तिबेटच्या ओसाड व शुष्क पठारावरून दरमजल करीत ते शेखरझाँगला पोहोंचले. शेखरझाँग येथील मठ हजार फूट उभा कडा असलेल्या डोंगरावर आहे. खालून तो फारच चित्तभेदक दिसतो. या मठाच्या वरती किल्ला आहे. या मठाचें व किल्लयाचें कामही खंबाझाँगप्रमाणें भव्य व सुंदर आहे. उंच कड्यावर बांधलेल्या या किल्लयावर, गिर्यारोहक चढून गेले व तेथून त्यांनीं पन्नास मैल दूर असलेल्या एव्हरेस्टचें दर्शन घेतलें. शेखरझाँगहून निघून वाटेंत रॉंगबक मठांतील मुख्य लामाचा आशीर्वाद घेऊन पथक तारीख १७ एप्रिल रोजीं पायथ्याच्या तळाशीं पोहोंचलें. पायथ्याच्या तळावर त्यांनीं कामास सुरवात केली, तेव्हां एकंदर वातावरण आशादायक होतें. १९२४ च्या मोहिमेपेक्षां ते बारा दिवस आधीं या तळावर येऊन पोहोचलें होते. पथकांतील गिर्यारोहकांच्या तब्येती एकंदरीनें पाहता उत्तम होत्या. थोड्या कांहींना घसादुखीचा त्रास होत होता. पण यापेक्षा गंभीर स्वरूपाचा आजार कोणाला नव्हता. विरळ वातावरणाची संवय हळूहळू व्हावी म्हणून चढाईचा वेग रटलजनें मंद ठेवला होता. तिसरा तळ ता. २ मे रोजीं बनविला गेला. वरच्या तळांना वेळोवेळीं मदत पाठवितां यावी म्हणून या तळावर भरपूर सामान ठेवण्यांत येऊन त्याला पायथ्याच्या तळाचें स्वरूप दिलें गलें होतें.

या तळापर्यंत प्रगति अपेक्षेप्रमाणें झाली. पण नॉर्थकोलच्या मार्गावरील उभ्या चढणीनें त्यांना खूप त्रास दिला. मध्यंतरीच्या नऊ वर्षांत तेथील बर्फाच्या पृष्ठभागांत फार बदल झाले होते. १९२४ च्या मोहिमेच्या मार्गानें जाणें अशक्य झालें होतें, म्हणून त्यांनीं बर्फाच्या कड्याच्या मार्गानें जायचे ठरविलें. पुढें जाऊन मार्ग बनविण्याकरितां रोज एक टोळी निघत असे. प्रत्येकानें वीस मिनिटें म्होरक्याचें काम करून पायऱ्या खोदायच्या व नंतर मागें व्हायचें. त्या तयार केलेल्या मार्गावर मागून येणाऱ्यांनीं मेखा रोवून त्यांना दोर बांधण्याचें काम करायचें. ओझीं घेऊन चढणाऱ्या भारवाहकांसाठीं दोर बांधण्याची जरूरी होती. जोरानें वाहणाऱ्या वाऱ्यानें व हिम-

वर्षावानें त्यांना त्रास होत होता. पहाटे टोळी कामाला निघायची. पायऱ्या खोदण्याचें काम कांहीं तास केल्यावर तुफान वाऱ्याच्या हल्ल्यामुळें त्यांना तंबूकडे परत यावें लागे. तेवढ्या अवधीत त्यांनीं खोदलेल्या पायऱ्यांवर हिमवर्षाव होऊन त्या दिसेनाशा होत. हिमाच्या स्थितीकडे त्यांना काळजी-पूर्वक लक्ष द्यावें लागे. कारण त्या ठिकाणी हिमप्रपात होण्याची भीति होती. पूर्वीच्या मोहिमेंत याच ठिकाणीं हिमप्रपातानें अनर्थ केला होता. अशा परि-स्थितींत हजार फूट उंचीच्या पृष्ठभागावर मार्ग बनविण्यास त्यांना आठ दिवस लागले. यावरून तेथील प्रतिकूल परिस्थितीची कल्पना येईल. नॉर्थकोलच्या जव-ळच्या बर्फाच्या भिंतीवर शिप्टन व स्माइद हे आपल्या कौशल्याची कमाल करून वर चढले व त्यांनीं दोराची शिडी बांधली. त्या शिडीवरून चढून भारवाहकांनीं वरच्या तळाचें सामान नॉर्थकोलवर नेलें. नॉर्थकोलवरील चौथा तळ एका चिंचोळ्या जागेंत होता. तंबू सोडून दोन तीन पावलें दूर गेलें कीं कड्याचें टोक येत होतें. त्या लोकांत रात्रीं झोपेंत चालणारें कोणी नव्हते म्हणून बरें.

गिर्यारोहक व भारवाहक प्रतिकूल परिस्थितींत प्रगति करीत होते. पण निसर्गानें त्यांच्याशीं पूर्ण असहकार करण्याचें ठरविलें. कलकत्त्याच्या वेध-शाळेहून संदेश आला. त्यांत बंगालच्या उपसागरांत पावसाळ्याला सुरवात झाल्याची अशुभ वार्ता होती. नेहमीपेक्षां सुमारें पंधरा दिवस आधी पाव-साळा सुरू झाला. आतां हळूहळू वर चढत जाण्याचा बेत सोडून देऊन, वर्षाऋतूच्या आगमनानें होणाऱ्या हिमवर्षावानें झोडपलें जाण्याच्या पूर्वीच, शिखरावर हल्ला करणें जरूर होतें. लवकर चढून गेलें असतां नेहमीच्या वातावरणांतून जलदीनें विरळ वातावरणांत जाण्याचे दुष्परिणाम गिर्या-रोहकांना भोगावे लागले असते. पण त्याला नाइलाज होता.

वाऱ्याच्या जोरामुळें व हिमवर्षावामुळें कांहीं वेळा गिर्यारोहकांना तंबूच्या बाहेर पडणें कठीण होत होतें. अशा वेळेस दिवसच्या दिवस



गिर्यारोहक व भारवाहक बर्फाच्या भिंतीवरून चढत आहेत.

तंबूत झोपण्याच्या पिशवींत पडून घालवावा लागे. तें कंटाळवाणे होई. अशा एका परिस्थितीचें व मनस्थितीचें वर्णन स्माइदनें आपल्या दैनंदिनींत लिहिलें आहे. तें त्याच्याच शब्दांत देण्यासारखें आहे. तो लिहितो,

" हवा निवळेल असें कांहीं वेळापूर्वी वाटत होतें. हिमवर्षाव थांबला होता, व सूर्यप्रकाश जास्त दिसूं लागला होता. पण हिमवर्षाव पुन्हां सुरू झाला आहे. तंबूच्या छतावर हिम पडताना सडसड असा आवाज होत आहे. वाऱ्याची जोराची झुळुक आली कीं त्यासरशीं तंबूवर जोरानें आपटणाऱ्या हिमाचा आवाज सर्पाच्या फुसकाऱ्यासारखा येतो. वारा नसला म्हणजे हिम पुष्पवर्षावासारखें पडतें. त्याचा आवाज लोकांच्या गर्दीच्या कुजबुजण्यासारखा येतो. आतां अकरा वाजले आहेत. इंग्लंडमध्यें साडेपांच वाजले असतील. सकाळीच कामावर जाणारे कामगार न्याहारी करीत असतील. लंडनच्या उपनगरांत वाहतूक करणाऱ्या लोकल गाड्या इकडून तिकडे जोरानें धांवत असतील.

" पुन्हां पुन्हां सोसाट्याचा वारा येतो व सबंध तंबू हादरतो. तंबूतील दुसरे गिर्यारोहक आपापल्या दुलईच्या पिशव्यांत पडून आहेत. मधूनच कोणी खोकतो किंवा एका कुशीवरून दुसऱ्या कुशीला वळतो. माझ्याशेजारी माझी सूट केस आहे. तिच्यावर घसा दुखीच्या गोळ्या, हिमाचें गॉगल्स, हातमोजे, मेणबत्ती, चाकू, एव्हरेस्टचा नकाशा, पिकविक पेपर्स या पुस्तकाची प्रत व बायबल इत्यादि वस्तु ठेवलेल्या आहेत. घरच्या लोकांच्या फोटोचा एक आल्बमही तेथें आहे. दुसऱ्या बाजूला माझी सामानाची पिशवी, टोपी, मफलर व पाठीवर बांधण्याची छोटी पिशवी वगैरे वस्तू आहेत. माझ्या झोंपण्याच्या उबदार पिशवीवर, जाड व गरम ओव्हरकोट आहे. माझ्या उशीखालीं कांहीं कपडे घडी करून ठेवलेलें आहेत. उंच प्रदेशांत डोक्याखालचें उसें जाड असलें म्हणजे झोप चांगली येते. मी दोन गरम पाटलोणी, दोन लोकरीचें स्वेटर व उंटाच्या केसाचा स्वेटर एवढे

कपडे अंगावर घातलेले आहेत. डोक्यावर गरम कापडाची टोपी आहे. त्या टोपीमुळें कानाला व गळ्याला चांगली ऊब मिळते. तंबूच्या छतावर हिम पडल्यामुळें तंबूत अंधार होऊं लागला आहे. छतावर काठी आपटल्यावर सांचलेलें हिम पडून गेलें. किती वेळ हिम पडत राहणार आहे कोण जाणें!

"लवकर निरभ्र होण्याची चिन्हें दिसत नाहींत. मजजवळ वाचायला खूप पुस्तकें आहेत. कालच जासूदानें 'पंच' आणि 'पासिंग शो' या साप्ताहिकाचे अंक आणून दिले. त्यांतील शहरी विनोद आणि सिनेतारकां-विषयींचा मजकूर या स्थळीं किती विचित्र वाटतो.

"समुद्रसपाटीवर आरामांत राहायचें सोडून आम्हीं येथें कशाला पडून आहोंत? याला सबळ कारण असो वा नसो माझी इथली जागा दुसऱ्या कुणाला देऊन समुद्र किनाऱ्यावर जायला मी कांहीं तयार होणार नाहीं. आमच्या नशिबाला व इथल्या वातावरणाला आम्ही शिव्या देत आहोंत खरें. पण तरीसुद्धां आमची धडपड चालू आहे. हें असें कां, तें मला सुद्धां कळून घ्यावेसे वाटतें. माझे हात धुळीनें व कित्येक दिवसांत अंघोळ न केल्यामुळें काळे झालेले आहेत; माझा चेहरा उन्हामुळें करपून गेला आहे; ओठ थंडीमुळें फुटून गेले आहेत; आगआग होत आहे. 'तुम्हीं हें सर्व कशासाठीं करतां?' आम्हालाच माहित नाहीं, तर आम्हीं कसें सांगू? पण या प्रश्नाच्या उत्तराची आम्हीं काळजी करीत नाहीं. आम्हांला एवढें समजतें कीं, या हालअपेष्टांत, वादळांत व महान् पर्वताच्या सान्निध्यांत आम्हाला कांहींतरी मिळविल्याचें समाधान मिळतें."

असें कांहीं दिवस गेल्यावर ता. २२ ला हवा थोडी निवळली. त्याचा फायदा घेऊन हॅरिस व वेजर यांनीं कांहीं भारवाहक बरोबर घेऊन २५७०० फुटांवर पांचवा तळ बनविला. दुसऱ्या दिवशीं त्या दोघांनीं तेथून निघून सहावा तळ बनवायचा आणि स्माइद व शिप्टन या जोडीनें पांचव्या तळावर त्यांच्या जागीं येऊन मुक्काम करायचा. असा बेत ठरला होता. पण

हॅरिस व वेजर पांचव्या तळावर पोंचल्यावर पुन्हां वादळाला सुरवात झाली. त्यांना सर्व दिवस हवेला शिव्याशाप देत तंबूत बसून काढावा लागला. वर वादळ असेल अशी कल्पना खालच्या लोकांना आली नाहीं. त्यामुळें दुसऱ्या दिवशीं स्माइद व शिप्टन यांची जोडी पांचव्या तळावर जाऊन हजर झाली. आतां पंचाइत आली! तेथील छोटया तंबूत फक्त दोघांना पुरेल एवढीच जागा होती. तेव्हां कुणीतरी खालीं जायला पाहिजे होतें. हॅरिस व वेजर यांनीं खाली जाण्याचें पत्करिलें. खरें म्हणजे खालीं जाण्यांत त्या दोघांचें नुकसान होतें. कारण त्यामुळें सहाव्या तळावर जाऊन शिखरावर हल्ला करण्याची संधि त्यांना दूरावणार होती. परंतु अशा मोहिमेंत व्यक्तीनें आपल्या स्वतःच्या हिताकडे पाहून चालत नाहीं. एकूण पथकाचें हित साधायचें असतें. त्यास अनुसरून त्या दोघांनीं त्यांच्यापेक्षां ताजेतवानें असलेल्या स्माइद व शिप्टन यांना ती संधि दिली. पण स्माइद व शिप्टन यांच्या नशिबी-सुद्धां वादळच होतें. त्यांनाही वादळामुळें ता. २४ मेचा दिवस तंबूतच काढावा लागला. प्रतिकूल हवामानांत वरच्या तळावर डांबून राहावें लागलें म्हणजे इतका थकवा येतो कीं स्वैंपाक करणें, एकमेकाशीं बोलणें फार काय, स्वतःशी विचार करणें हें सुद्धां कष्टाचें वाटतें. कांहीं न करितां स्वस्थ पडून राहावें असें वाटतें. परंतु तुफानी वारा व त्याबरोबर तंबूतील भेगांतून येणारें हिम यामुळें स्वस्थ पडणेंही नकोसें होतें. तिथला सर्व जीवनक्रमच कष्टमय वाटतो. खालच्या तळावरील निवाऱ्याच्या जागीं परत आल्यावर, गिर्यारोहकाला या कष्टमय जीवनाचा थोडाफार विसर पडतो म्हणून बरें; नाहीं तर एकदां एव्हरेस्टवर जाऊन आल्यावर परत जायला कोणीही धजला नसता.

ता. २५ रोजीं पांचव्या तळावरून निघून वर जाण्याची तयारी स्माइद व शिप्टन यांनीं केली. भारवाहकांना सुद्धां तयार केलें. पण पुन्हां विचार करून, अशा हवेंत, थकलेल्या भारवाहकांना वर नेणें धोक्याचें आहे

असें ठरवून वर जायच्या ऐवजीं, एव्हरेस्टला तात्पुरता रामराम करून स्माइद व शिप्टन भारवाहकांसह चवथ्या तळावर उतरून गेले. पुन्हां एकदां एव्हरेस्टनें त्यांना मागें परतविलें. सर्व अडचणींनां तोंड देण्याची तयारी करून ते मोठ्या ईर्षेनें एव्हरेस्टपाशीं आले होते. पण त्यांच्यावर वायवास्त्र सोडून एव्हरेस्टच्या दैवतानें त्यांना माघार घ्यायला लावलें. पांचव्या तळावरून उतरत असतां एका गिर्यारोहकानें हिमाच्या उतारावरून घसरत जाण्याचा प्रयोग केला. परंतु तोल जाऊन डोकें पुढें व पाय मागें अशा स्थितींत तो भलत्याच बाजूला घसरत जाऊं लागला. ते पाहिल्यावर दात्सेरिंग नांवाच्या शेर्पा भारवाहकानें झेंप टाकून त्याला थांबविलें. दात्सेरिंगच्या प्रसंगावधानामुळें त्या गिर्यारोहकाचे प्राण वांचले.

बादळाचा जोर चालूच राहिला. मोहिमेची प्रगति तेथेंच खुंटली कीं काय अशी भीति सर्वांना वाटूं लागली. परंतु एवढ्यावर निराश होऊन माघार घ्यायला गिर्यारोहक तयार नव्हते. त्यांनीं मन घट्ट करून, अनुकूल हवेची वाट पाहात चौथ्या तळावरच राहायचें ठरविलें. चवथ्या तळाच्या आजूबाजूला हिमप्रपात कोसळत होते. तळावरही बर्फ वाहून येण्याची भीति होती. म्हणून त्यांनीं तळ हालवून पठारावर नेला. पठारावरची जागा उघड्यावर होती. तेथें वारा जोराचा होता. परंतु सुरक्षिततेच्या दृष्टीनें तेथेंच त्यांनीं चवथा तळ उभारला. वारा फार थंड होता. तंबूच्या बाहेर पडल्याबरोबर बर्फगार पाण्याच्या प्रवाहांत बुडी मारल्यासारखें वाटे. शरीराचीं गात्रें ताठ होऊन जात. बर्फ किंवा हिम वितळवून पिण्यासाठीं पाणी तयार करावें लागे. बर्फाची कुदळ व झोळी घेऊन एखादा वीर तंबूच्या बाहेर पडायचा.* जिथें बर्फ किंवा हिम खूप मिळेल अशा ठिकाणीं जाऊन दम लागेतोंपर्यंत खणून, तें हिम पिशवींत घालून तो पळत पळत तंबूत परत यायचा. त्यानें आणलेलें हिम प्रायमस स्टोव्हवर वितळवून पाणी तयार करण्याचें काम दुसरे गिर्यारोहक करीत.



नॉर्थकोलवरून पांचव्या तळाच्या मार्गावर

गारठून गेलेल्या हातापायांत, पुन्हां रक्तप्रवाह सुरू होण्यासाठीं जोरजोरानें चोळण्याचें काम त्याला करावें लागें.

ता. २८ मे रोजीं वादळाचें स्वरूप सौम्य झालें. पांच तास परिश्रम करून कांहीं गिर्यारोहकांनीं पुन्हा पांचवा तळ गांठला. आतां भारवाहकांच्या शक्तीची व कौशल्याची परीक्षा होती. पुढचा सहावा तळ निदान २७००० फुटांवर बनविला पाहिजे. तरच तेथून पहाटे निघून शिखरावर जाऊन परत तळावर येणें गिर्यारोहकांना शक्य होणार होतें. १९२४ च्या मोहिमेंत सहाव्या तळावर सामान वाहून नेण्यासाठीं, नॉर्टनला भारवाहकांची आर्जवें करावी लागली होती. पण या वेळेस तशी जरूरी भासली नाहीं. यावेळेस भारवाहक मागील मोहिमेतील ओझीं वाहण्याचा उच्चांक मोडण्याच्या तयारीनें व मोठ्या ईर्षेनें मोहिमेंत सामील झालें होतें. गिर्यारोहकांप्रमाणेंच त्यांनाही अवघड काम फत्ते करून एव्हरेस्टवरील 'वाघ' म्हणवून घेण्याची इच्छा होती. ता. २९ रोजीं पहाटें सर्वजण लवकर उठले. थोडेसें खाऊन व गरम पेयें पिऊन निघायचें असा त्यांचा बेत होता. पण रात्रीं थर्मासमध्यें भरून ठेविलेला चहा गरम राहिला नव्हता. इतक्या थंडीत गरम पेय प्याल्या-शिवाय हुशारी आली नसती. म्हणून त्यांनीं स्टोव्ह पेटवून चहा उकळण्यास सुरवात केली. पुन्हा गरम (खरे म्हणजे कोंबट) चहा बनवून सर्वांनीं तो घेईपर्यंत आठ वाजलें अखेर, तिघे गिर्यारोहक व आठ बहाद्दर भारवाहक प्रत्येकीं पाच शेरांची ओझीं घेऊन सहावा तळ बनाविण्याकरितां निघालें. चढण उभी होती. दगड उतरते होते. तरीहीं, कसलेल्या गिर्यारोहकांप्रमाणें दमदार पावलें टाकीत भारवाहक चढत होते. त्या ठिकाणी एकमेकांना दोर बांधण्याचा कांहीं फायदा झाला नसतां. उलट त्यामुळें एखादा घसरला असता तर त्याच्याबरोबर बाकीचेही घसरणीला लागले असते. बुटांच्या खिळ्यांच्या योगानें खडकांत पकड धरून ते सुटे चढत होते. दर पन्नास मिनिटांनीं दहा मिनिटें विश्रांतीकरितां

थांबायचें. असेंच एकदां थांबलें असतां, त्यांना बारा मैल दूर असलेला रॉंगबकचा मठ दिसला. दीड महिन्यापूर्वी ते तेथें होते. त्यानंतर कितीतरी दिवस झाल्यासारखें वाटत होते त्यांना !

एव्हरेस्टच्या ज्या उत्तर बाजूवर ते चढत होते, तेथें तंबू ठोकण्याकरितां सपाट जागा मिळणें दुरापास्त होतें. त्यांना ती एक विवंचनाच होती. अखेर कण्याच्या खालीं २७४०० फुटांवर, छोटीशी तीन फूट रूंदीची जागा त्यांना आढळली. आणखीही वर ओझीं नेण्यास भारवाहक तयार होते. परंतु गिर्यारोहकांनीं दूरदर्शीपणानें विचार करून आणखी वर जाऊं नयें असें ठरविलें. तें योग्यच झालें. कारण तंबू उभारून, भारवाहक खालीं जायला निघाले, ते सायंकाळच्या आंत जेमतेम चौथ्या तळावर पोहोचले. चांगली जागा शोधण्यांत आणखी वेळ घालविला असता, तर भारवाहकांना चौथ्या तळावर पोहोचणें अशक्य झालें असतें. खाली जाण्यापूर्वी, त्यांनीं जागा साफ करून व धोंडे रचून छोटा चौथरा बनविला, आणि त्यावर पांच शेर वजनाचा छोटा तंबू उभा केला. १९२४ च्या सहाव्या तळापेक्षां पांचशे फूट उंच अशा जागी ओझीं नेऊन भारवाहकांनीं त्या दिवशीं फार मोठी कामागिरी केली.

खालीं उतरतांना मात्र त्यांना फार त्रास सहन करावा लागला. त्यांना खालीं सांभाळून नेण्याचें काम लॉंगलँडचें होते. भारवाहकांच्याबरोबर गिर्यारोहक नसता तर ते खालीं जायच्या ओढीनें निष्काळजीपणानें, भराभर उतरले असते. अशा वेळीं अपघात होऊन एकादा घसरून गेला असता, तर बाकीच्यांचा धीर सुटला असता. त्या दिवशीं एव्हरेस्टनें त्यांची कसोटीच पाहिली. ते नॉर्थ कोलवर पोंचतात न पोंचतात तोंच, हिमाचें प्रचंड वादळ सुरूं झालें. एका क्षणापूर्वी शांत होतें. दुसऱ्या क्षणांत निसर्गानें उग्र रूप धारण केलें. सर्व वातावरण उधळत्या हिमानें भरून गेलें. तुफानी वाऱ्याचा कर्कश आवाज कानांत घुमूं लागला. चष्म्यांवर हिम सांठल्यामुळें दिसेना, म्हणून

भारवाहकांनीं चष्मे काढले, तेव्हां गोठलेल्या हिमामुळें त्यांच्या पापण्या चिकटून गेल्या. उधळलेल्या हिमामुळें वीस गजापलीकडचें कांहीं दिसत नव्हतें. तशा परिस्थितींत मार्ग शोधत व भारवाहकांना चुचकारत, त्यांतला कोणी भलतीकडे तर गेला नाहींना, हें वारंवार पाहात, लॉंगलॅंड त्यांना खालीं नेत होता. आपण उतरतो आहे ती वाट बरोबर आहेना ? चुकून पूर्व रॉंगबकच्या कड्याकडे तर आपण जात नाहींना ! अशी भीति त्याला सारखी वाटत होती. पण त्यानें धैर्य सोडलें नाहीं, आणि आपल्या मनांतील भीति बाहेर दाखविली नाहीं. ही गोष्ट भारवाहकांना कळली असती तर त्यांचें अवसान आणखी गळालें असतें. ते त्याच्या सांगण्याप्रमाणें बरोबर चालत होते. वाटेंत, त्यांना मॅलरी व अर्व्हिन् यांनीं ज्या तंबूत मरणापूर्वींची शेवटची रात्र काढली होती, तो तंबू लागला. तेथें ते थोडा वेळ थांबले. त्या तंबूच्या चिंधड्या झालेल्या होत्या. त्यांतील नऊ वर्षांपूर्वी ठेवलेल्या कांहीं वस्तू पाहून त्यांना गंमत वाटली, व ते उत्साहानें पुढचा मार्ग आक्रमूं लागले. त्या तंबूत लॉंगलॅंडला जुन्या पद्धतीचा, छोट्या डायनॅमोवर चालणारा एक टॉर्च आढळला. गंमत ही कीं, हातानें फिरविल्याबरोबर तो प्रकाश दाखवूं लागला. नऊ वर्षें तेथें पडलेला असूनही तो नव्यासारखा होता.

तो तंबू सोडून ते पुढे निघाले. वादळ चालूच होतें. भारवाहक इतके थकून गेले होते कीं, त्यांतील कांहीं विश्रांतीकरितां बसूं लागले. पण स्वत: त्यांच्या इतकाच थकून गेला असताहीं लॉंगलॅंड त्यांना उत्तेजन देऊन पुढें चालण्यास लावीत होता. आतां किती वेळ असें चाचपडत जावें लागणार, असा निराशेचा विचार त्याच्या मनांत येत आहे तोंच, त्याला पांचव्या तळावरील तंबू दिसले. तेथल्या गिर्यारोहकांनीं गरम पेयें तयार ठेवली होतीं. तीं पिऊन, वर थोडी विश्रांति घेऊन, आठापैकीं सहा भारवाहक चवथ्या तळावर गेले. दोघे फारच थकले होते, म्हणून ते तेथेंच पांचव्या तळावर राहिले. ज्या आठ भारवाहकांनीं त्या दिवशीं सहावा तळ बनविण्याच्या कामीं

अचाट मेहनत करून ' एव्हरेस्टवरचा वाघ ' ही पदवी मिळविली, त्यांचीं नांवें उल्लेखनीय आहेत.

| | | |
|---|---|---|
| अंगतार्के<br>दात्सेरिंग<br>निमा दोर्जे<br>अंग् त्सेरिंग<br>किपालामा | } | शेर्पा |
| पासंग<br>त्सेरिंग तार्के<br>रिझींग | } | भुतिया |

त्या खडतर दिवशी किपालामानें एक गंमतच केली. तो काटक, पण स्वभावानें अगदीं नांगऱ्या व भोळसर होता. २७४०० फुटावर ओझें नेऊन ठेवल्यावर तेथेंच साहेबापाशीं तो कामाचें सर्टिफिकीट मागूं लागला. आहे कीं नाहीं !

भारवाहक खालच्या तळावर पोंचले त्याच सुमारास, वर सहाव्या तळावर टिनच्या डब्यांतील अन्नाचा आहार करून हॅरिस व वेजर या जोडीनें आपापल्या झोपण्याच्या पिशव्यांत प्रवेश केला. २७४०० फुटांवर, सर्वांत उंच जागीं झोपतांना त्यांच्या मनांत विचारांनीं किती गर्दी केली असेल! संकुचित व खडबडित जागेमुळें त्यांना नीट झोप आली नाहीं. उताराच्या बाजूला हॅरिस झोपला होता. त्याच्या अंगावर त्याचा जोडीदार एकसारखा लोळत येत होता. पहाटे साडेचार वाजतां उठून त्यांनीं गरम चहा तयार केला, आणि बर्फामुळें गोठून कडक झालेले बूट स्टोव्हवर धरून मऊ केले. गरम कपडे घालून व बूट चढवून ते साडेपांच वाजतां शिखरावर चढाई करण्यासाठीं निघाले. थंडी जबरदस्त होती. त्या विरळ हवेंत पुरेसा ऑक्सिजन मिळण्यासाठीं धांपा टाकीत चालल्यानें उच्छ्वासाबरोबर त्यांच्या अंगा-

तील उष्णता झपाट्यानें कमी होत होती. एक तास चालल्यानंतर वेजरचे पाय गारठून गेले. मोठ्या कष्टानें बूट काढून पायाला हिम जोरानें चोळून त्यानें पायांत उष्णता आणली. असें केलें नसतें तर त्याचें पाय कायमचे हिमदग्ध होण्याची भीति होती. मॅलरीच्या संकल्पित मार्गानें म्हणजे कण्यावरून चढत जाऊन पहिल्या व दुसऱ्या पायरीवरून शिखरावर जाण्याला मार्ग आहे कीं नाहीं हें आधी पाहायचें त्यांनीं ठरविलें. त्याप्रमाणें कण्याकडे जात असतां हॅरिसला मॅलरीची कुदळ सांपडली. एका दगडावर उघडी पडलेली असूनसुद्धां तिचें पोलाद अगदी नव्यासारखें दिसत होतें. ओझें वाढूं नये म्हणून परत येतांना ती कुदळ उचलण्याचें हॅरिसनें ठरविलें.

वरच्या पायरीपाशीं पोंचल्यावर तेथील उभ्या कड्यावरून चढणें अशक्य आहे असें त्यांना कळून आलें. म्हणून, मॅलरीचा मार्ग सोडून देऊन १९२४ सालीं नॉर्टननें ज्या मार्गानें जाण्याचा प्रयत्न केला होता त्या मार्गाला ते लागले. आतां कण्याखालीं उतरून डोंगराच्या बाजूवरून आडवे चालत जायचें होतें. तेथील दगड उतरते होते. तेथें कोणाचा पाय घसरला असता तर तो घसरत जाऊन दहा हजार फूट खालच्या रॉंगबक बर्फप्रवाहावर जाऊन आदळला असता. कांहीं वेळानें ते हिमानें भरलेल्या ओहोळापाशीं आले. तेथें त्यांनीं एकमेकाला दोर बांधला. पन्नास फूट रुंदीच्या त्या ओहोळांत भुकटीसारखें हिम होतें. मोठ्या सावधगिरीनें त्यांतून चालत जाऊन ते पुढें गेले. वाटेंत दुसरा एक छोटा ओहोळ आडवा आला. तो ओलांडण्याचा प्रयत्न हॅरिसनें केला. पण तेवढ्यांत त्या दोघांना जाणीव झाली कीं, त्या परिस्थितींत यापुढें आणखी चढण्याचा प्रयत्न करणें अत्यंत धोक्याचें होतें. साडेबारा वाजलें होतें. ते सुमारे २८१०० फुटावर उभे होते. तेथून शिखरमाथा कमींत कमी हजार फूट उंच होता. तेवढें चढून जायला त्यांना चार तास तरी लागले असते. तेवढें चढून गेल्यावर त्यांना सूर्यास्तापूर्वी सहाव्या तळावर परत येतां आलें नसतें. सहाव्या तळावर पोहोंचूनही

भागत नव्हतें. त्या दिवशीं स्माइद व शिप्टन यांची जोडी तेथें येऊन रात्रीं मुक्काम करणार होती. सहाव्या तळावरील तंबू, जेमतेम दोघे राहतील एवढा होता. हा विचार करून,त्यांनीं तेथून परत जाण्याचा निर्णय घेतला, व हॅरिस ओहोळांतून मागें फिरला. परत जातांना हॅरिसनें मॅलरीची कुदळ उचलून घेऊन, त्या जागीं आपली कुदळ ठेविली. सहाव्या तळावर त्यांनीं थोडी विश्रांति घेतली. स्माइद व शिप्टन यांना दिवसाच्या चढाईचा वृत्तान्त आणि मार्गांतील अडचणी थोडक्यांत सांगून ते पांचव्या तळावर गेले व तेथें त्यांनीं रात्रीं मुक्काम केला.

दुसऱ्या दिवशीं नॉर्थकोलवर उतरतांना, हॅरिसला हिमाच्या उतारा-वरून घसरत जाण्याचा मोह झाला. पण तो घसरत घसरत नॉर्थकोलकडे जाण्याऐवजी रॉंगबकच्या कड्याच्या दिशेनें जाऊं लागला. अनेक वर्षें गिर्यारोहण केल्यामुळें कुठल्या वेळीं काय करावें हें चटकन् ठरविण्याची हातोटी त्याला आलेली होती. एका क्षणांत मनाशीं निर्णय घेऊन तो पालथा झाला व आपली कुदळ दोन्ही हातांनीं छातीखालीं दाबून, त्यानें कुदळीचें टोक हळूहळू हिमांत खुपसलें. नांगराचा फाळ जमिनींत जशी खांचणी करीत जातो, तशी ती कुदळ हिमांतून रेघ काढीत जाऊं लागली. त्यामुळें, त्याचा वेग हळूहळू कमी होत, तो कांहीं वेळानें थांबला. त्यानें मागें वळून पाहिलें तों, त्याचे पाय कड्याच्या टोकावर होते. तेथून तो सरपटत आपल्या दोस्तांपाशी जाऊन पोहोंचला. आपल्यावर किती कठीण प्रसंग गुदरला होता, याच्या जाणिवेनें त्याचे पाय लटपटत होते.

त्या दिवशीं वरच्या बाजूला पुन्हां हिममय वादळ झालें. त्यामुळें स्माइद व शिप्टन यांना सबंध दिवस सहाव्या तळावरील तंबूत पडून काढावा लागला. दुसऱ्या दिवशीं म्हणजे ता. १ जून रोजीं, वारा जोराचा होता, तरी आकाश निरभ्र होतें. पहांटे साडेपांच वाजतां उठून, त्यांनीं कपडे घालायला सुरवात केली. गंजीफ्रॉक, त्यावर जाड फ्लॅनेलचा शर्ट,

उंटाच्या लोकरीचा स्वेटर, आणि त्यावरती लोकरीचे सहा पातळ स्वेटर; दोन गरम पाटलोणी, आणि सबंध अंगावर, रेशमाचें अस्तर असलेला हवाबंद पोशाख; डोक्यावर गरम (माकड) टोपी, पायांत चार मोजांच्या जोड्या, व त्यावर खिळे लावलेले मोठे बूट; हातांत कातड्याचे हातमोजे, इंग्लंडसारख्या थंड देशांत राहणाऱ्यांना सुद्धा एवढा पोशाख अंगावर घालावा लागतो, त्यावरून एव्हरेस्टवर किती भयंकर थंडी असेल, याची कल्पना येते. तंबूतून बाहेर निघून त्या दोघांनीं वर चढण्यास सुरवात केली. थोडे अंतर जातात तोंच शिप्टनचें पोट दुखूं लागलें, व त्याला चालवेना. आदल्या दिवसापासून त्याला पोटदुखीचा त्रास होऊं लागला होता. तो आतां इतका असह्य झाला कीं, त्याला खालीं बसावें लागलें, आपल्यामुळें आपल्या साथीदाराची प्रगति थांबू नये, म्हणून त्यानें स्माइदला पुढें जाण्यास सांगून, स्वतः सहाव्या तळावर परत जायचें ठरविलें. २७००० फूट उंचीवर येण्याची धडपड करून अखेर, शिखरावर चढाई करण्याच्या संधीस त्याला मुकावें लागलें.

शिप्टनला सोडून स्माइद एकटां चालूं लागला. साध्या गिर्यारोहणांत-सुद्धां बरोबर सोबती असेल तर एकमेकांच्या आधारानें कठीण चढण सोपीं होतें. मग एव्हरेस्टच्या शिखराजवळच्या धोक्याच्या व कठीण चढणींत सोबत्याची केवढी जरूरी असेल! कांहीं कारणानें सोबती मागें राहिल्यामुळें एकट्यानें त्या कठोर वातावरणांत पुढें जाण्याचा प्रसंग आला, म्हणजे साह-जिकच अंगांतील उमेद थोडी तरी कमी होत असेल. परंतु, कुठल्याही अड-चणी व प्रतिकूल दैवयोग यांनी खचून न जातां, अंगांत त्राण असेल तों-पावेतों वर चढत जायचें, असा निश्चय एव्हरेस्टवर जाणाऱ्या गिर्यारोहकानें इंग्लंडहून निघण्यापूर्वींच केलेला असतो. पायथ्याशी येईपर्यंत त्या निश्चयाची मनांत उजळणी चालूं असते. हेतू हा कीं, थकलेल्या शरीरानें व मनानें आयत्या वेळेस अडचणींचा व संकटाचा बाऊ करून निकराचा प्रयत्न कर-

ण्याचें टाळूं नयें. एव्हरेस्टच्या शिखराजवळील हजार दोन हजार फुटांची चढण गिर्यारोहकाची कसोटीच पाहते. जो कोणी भाग्यवान् गिर्यारोहक एव्हरेस्टवर चढून जाईल त्याच्या यशाचें श्रेय बाह्य साधनापेक्षांही त्याच्या मानसिक बळालाच द्यावें लागेल. त्याचा निर्धार दृढ असेल, मन कणखर असेल, व अंतरीची ज्योत प्रखर असेल तरच तो, मानवी शरीराचें मर्यादित सामर्थ्य, व एव्हरेस्टजवळील निसर्गाचा तीव्र विरोध या दोन्हींवर मात करून, शिखरावर मनुष्याच्या पराक्रमाचें निशाण उभारील. अशा त्या वीरश्रेष्ठास त्याच्यापूर्वी एव्हरेस्टवर जाण्याचें प्रयत्न केलेल्या सर्व गिर्यारोहकांचे, एवढेंच नव्हे तर, एव्हरेस्टवर जाण्याच्या या भगीरथ प्रयत्नाबद्दल आस्था बाळगणाऱ्या तुम्हाआम्हासारख्या जगांतील लाखो मानवांच्या सहानुभूतीचें केवढें अदृश्य सहाय्य मिळेल ! एव्हरेस्टवरच नव्हे, तर आफ्रिकेंतील दाट जंगल, उत्तर किंवा दक्षिण ध्रुव, समुद्राच्या तळाशी किंवा उंच आकाशांत, कुठेंही निस्वार्थी हेतूनें, केवळ धाडसासाठीं जाणाऱ्या वीरांच्या शूर कृत्यांची माहिती करून घेऊन त्यांना आपल्या सदिच्छेचें सहाय्य देतां येईल. अनेक लोकांची मनें एखाद्या ध्येयावर केंद्रीभूत झाल्यानें जें सहाय्य मिळतें त्याचें महत्व दैविक सहाय्यापेक्षांही अधिक आहे.

शिप्टनला सोडून पुढें निघाल्यावर स्माइदला शंभर फुटांची कठीण चढण लागली. ती चढून जाण्यासाठीं त्याला बर्फांत पायऱ्या खोदाव्या लागल्या. २८००० हजार फुटांवर पायऱ्या खोदणें किती कष्टाचें होतें याचें वर्णन मागें दिलें आहे. एकेक पायरीसाठीं कुदळीनें अनेक आघात करावे लागत होते. पायरी तयार होईपर्यंत तो धापा टाकायला लागत होता. त्यामुळें, खोदलेल्या पायरीवर पाय ठेवण्यापूर्वी श्वासोच्छ्वास पुन्हा नेहमीसारखा मंद होण्याकरितां कांहीं वेळ थांबावें लागें. एके ठिकाणीं खडकाला धरून चढून जाण्याचा त्यानें दोन वेळ प्रयत्न केला. तो ज्या कपारीवर उभा होता ती अरुंद होती व त्यानें खडकाला कसेंबसें धरलें होतें. श्वासोच्छ्वास जोरानें केला तरी-

सुद्धां आपला तोल जाऊन मागे हिमाच्या ओहोळांत पडून, आपण कड्याखालीं घसरत जाऊं अशी त्याला भीति वाटली. म्हणून तो मागें फिरला व दुसऱ्या बाजूनें वर गेला. हिमाच्या ओहोळांतील हिम घट्ट होतें. त्यावरून पायऱ्या खोदीत, तो सफाईनें ओहोळ ओलांडून गेला. पुढील खडकांवरील हिम मात्र भुकटीसारखें भुरभुरीत होतें. हाताला पकड सांपडण्यासाठीं त्याला प्रथम खडकावरील हिम कुदळीनें किंवा हातानें बाजूला करावें लागत होतें. एका ठिकाणचा खडक मुरमासारखा ठिसूळ होता. तो क्षणभर विसावा घ्यायला थांबला तेवढ्यांत पायाखालचा खडक ढासळला. खडकाच्या भेगेंत आधींच अडकून ठेवलेली कुदळ त्यानें चटकन् पकडली म्हणून बरें !

त्याची प्रगति फार मंद होत होती. एका तासांत तो सारे पन्नास फूट चढला होता. त्यावर्षी पावसाळा लवकर येऊन हिम पडल्यानें तेथील उभे खडक फार निसरडे झाले होते. अकरा वाजण्याच्या सुमारास, हॅरिसवेजर व नॉर्टन ज्या ठिकाणीं जाऊन पोहोंचले होते, त्याच ठिकाणीं स्माइद पोचला होता. प्रत्येक पाउल टाकतांना जितकी काळजी घ्यावयास पाहिजे, तितकी काळजी, तो थकून गेलेला असल्यानें त्याच्याकडून घेतली जात नव्हती, हें त्याच्या ध्यानांत आलें. अपघात टाळायचा असेल तर शहाणपणा करून परत फिरलें पाहिजे, हें त्यानें ओळखलें, व शिखराकडे दृष्टी टाकून तो फिरला. त्याच्या धडपडीचा शिखरावर कांहीं परिणाम झाला नव्हता. पूर्वीप्रमाणेंच तें डौलांत उभें होतें.

सहाव्या तळावर परत येतांना स्माइदला एक विलक्षण भास होऊं लागला. तो एकटा चालत होता तरी आपल्याबरोबर कुणी सोबती आहे असें त्याला वाटूं लागलें. या भावनेनें, त्याला वाटणारी असहाय्यता नाहींशी झाली. आपण व आपला ( भासमान ) सोबती, दोरांनीं एकमेकाना बांधलेलो आहोंत, आणि आपण घसरलों तर आपला सोबती आपल्याला धरून ठेवील, असें त्याला वाटत होतें. इतकेंच नव्हे, तर एके ठिकाणीं

विश्रांति घेण्यासाठीं थांबल्यावर त्यानें खिशांतून छोटासा केक काढला व त्याचे दोन तुकडे करून, आपल्या सोबत्याला देण्यासाठीं एक तुकडा पुढें केला. बाजुला कुणीच नाहीं, हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. अतीव मानसिक व शारिरिक श्रमांमुळें मेंदू शिणल्यानें, व ऑक्सिजनचा पुरवठा पुरेसा पडत नसल्यानें माणसाची तर्कबुद्धि व विचारशक्ति कमी होते. या कारणामुळेंच स्माइदला दुसऱ्या व्यक्तीच्या अस्तित्वाचा भास झाला असेल. हा त्याचा भास सहाव्या तळावर पोचेपर्यंत सतत टिकला, एवढेंच नव्हे, तर सहाव्या तळावरील उबदार तंबूत शिरतांना त्याला जरी हायसें वाटलें, तरी पाठीराखा सोबती नाहींसा झाल्यानें त्याला एकाकी वाटूं लागलें.

स्माइद थकलेला असल्यामुळें त्यानें सहाव्या तळावरच त्या दिवशीं राहावें, व शिप्टननें खालीं जावें, असें त्यांनीं ठरविलें. त्या रात्रीं २७४०० फुटांवरील तंबूत स्माइद एकटाच झोपला. अतिश्रमांमुळें व शिखरावर चढून जाण्याचें मानसिक दडपण नाहींसें झाल्यानें, त्याला इतकी गाढ झोप लागली कीं, सायंकाळीं सहा वाजतां झोपण्याच्या पिशवींत त्यानें स्वतःला गुरफटून घेतले, तो सकाळीं सात वाजता तो जागा झाला. तंबूला लहानसें भोंक होतें. रात्रभर त्यांतून हिम आंत येऊन त्याच्या अंगावर ढीग झाला होता. सकाळीं खूप थंडींत त्यानें उतरायला सुरवात केली. त्या वेळेस हवा शांत होती. तो आस्ते आस्ते उतरत होता. एका ठिकाणीं दम खायला तो राहिला, तेवढ्यांत वायव्य दिशेकडून जोराची वावटळ येत असल्याचें त्यानें पाहिलें. काय होत आहे, तें कळायच्या आंत त्या वावटळींत तो सांपडून, त्याची पकड सुटायच्या बेताला आली होती. एकामागून एक वाऱ्याचे झोत येऊन झंझावात सुरू झाला. हाताची पकड घट्ट धरून तो कांहीं वेळ उभा राहिला, व थोड्या वेळानें कसाबसा त्या फरशीवजा दगडांवरून उतरून सपाट जागेवर आला. वादळ चालूच होतें. कांहीं कांहीं वेळा वारा इतका सोसाट्याचा येई कीं उडून जाऊं नये म्हणून त्याला हातांवर व गुडघ्यांवर चालावें

लागे. जरूर लागेल तेव्हां कुदळ खडकांत रोवून, तिचा आधार तो घेत होता. एव्हरेस्टनें पुन्हां उग्र स्वरूप धारण केलें होतें, आणि जणुं काय वर येण्याचें धारिष्ट केल्याबद्दल स्माइदची खोडकी जिरवायचें मनांत आणलें होतें.

वाऱ्याचा प्रतिकार करावा लागल्यामुळें तो जास्त थकत चालला होता. पांचव्या तळावरचे तंबू दिसूं लागल्यावर त्याला मोठा आनंद वाटला. त्यानें तनिशें यार्डावरून पाहिलें, तों, त्या तंबूंतून दोन माणसें बाहेर आलीं व तंबू सोडून ठेवूं लागली. स्माइदनें ओरडून त्यांना हांका मारिल्या. पण वाऱ्याच्या आवाजांत स्माइदचा आवाज तेथपर्यंत पोचला नाहीं, व ते दोघे पांचव्या तळावरून खालीं जाऊं लागले आणि लवकरच दिसेनासे झाले. स्माइदनें निराशेनें दांतओठ खाल्ले. पण करतो काय ? तेवढे तीनशें फूट उतरायलासुद्धां, त्याला तुफान वाऱ्यांत पायऱ्या खोदाव्या लागल्या. पांचव्या तळावरील घडी केलेला तंबू पाहून तो चरफडत पुढें जाऊं लागला. त्याला विश्रांतीची व गरम पेयाची जरूरी होती. खालीं गेल्यावर त्याला कळलें कीं, त्या घडी करून ठेविलेल्या तंबूखालीं त्याच्यासाठीं गरम चहानें भरलेला थर्मास ठेवण्यांत आला होता. तसाच पुढें उतरत तो नॉर्थकोलवरील तळावर गेला. तेथें मात्र त्याचें चांगलें स्वागत झालें. आंत जाऊन गरम चहा ढोसल्यावर त्याच्या अंगांत गरम रक्त पुन्हा वाहूं लागलें.

हळूंहळूं सर्वजण पायथ्याच्या तळावर परतले. वीस हजार फुटांवर थंडी व वारा यांचा प्रतिकार करीत, टिनच्या डब्यांतील अन्न खात, एक महिना-भर काढल्यानें ते सर्वजण कृश झाले होते. रुंद छाती व भरदार स्नायू असलेले ते गडी आतां सांपळ्यासारखे दिसत होते. खालच्या तळावर ताजें अन्न व सुसह्य हवा मिळाल्यावर त्यांना अगदीं घरीं आल्यासारखें वाटलें. हवा सुधारल्यास पुन्हां एकदां प्रयत्न करून पाहावा, अशा उद्देशानें त्यांनीं तेथें कांहीं दिवस काढले. मनुष्याचा उत्साह दुर्दम्य आहे. ते गिर्यारोहक, वरच्या तळावरून जिवापाड मेहनत करून, व वेळप्रसंगीं धोके पत्करून

पर्वतावर चढाया करून थकून गेल्यामुळें, सरपटत व खुरडत नुकतेंच खालीं आले होते. पायथ्याच्या तळावरील सुखसोयींचा उपभोग घेऊन एकदोन दिवस झाले नाहीं तोंच, पुन्हां वर जाऊन चढण्याचा प्रयत्न करण्याचा विचार त्यांनीं चालविला. या त्यांच्या स्वभावविशेषावरून अरेबियन नाइट्स-मधलि अनेक सफरी करणारा सिंदबाद याची आठवण येते. एखादी सफर करून तो परत आला कीं, त्याला फार दिवस घरी चैन पडायचें नाहीं. पुन्हां तो सफरीवर जायचा. सफरीवर त्याच्या हालअपेष्टा होऊं लागल्या, व जिवावर बेतायचा प्रसंग आला कीं, त्यानें मनाशी निर्धार करावा, "पुन्हां म्हणून सफरीवर जायचें नाहीं. घरीं बसून आरामांत दिवस काढायचें." पण कांहीं पानें उलटून वाचक पाहातो तों 'अनुकूल हवामान पाहून नाखुद्यानें हाकारलेल्या गलबतांत,' पुन्हां सिंदबादची स्वारी नव्या उत्साहानें हजर !

एव्हरेस्टवरील हवामान मात्र अनुकूल होण्याची चिन्हें दिसेनात. म्हणून, एव्हरेस्ट कमिटीच्या आज्ञेनुसार १९३३ चें पथक परत फिरलें. एव्हरेस्टनें त्यांना मागें परतून लावलें. पण त्या गिर्यारोहकांनीं आपल्या प्रयत्नाची शिकस्त केली होती. यापेक्षां आणखी ते काय करणार ? पावसाळ्यास लवकर सुरवात झाल्यानें पर्वताच्या शेवटच्या हजार फुटांवरील चढणीवर हिम पडलें होतें. त्यावरून जाणें कठीण व धोक्याचें झाल्यानें, व प्रतिकूल हवेमुळें चढाईचें कांहीं दिवस फुकट गेल्यानें, त्यांच्या पदरांत यश पडलें नाहीं. पण आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा करून त्यांनीं यश संपादन करण्याची आपली पात्रता सिद्ध करून दाखविली.

या मोहिमेनंतर गिर्यारोहकांनीं एव्हरेस्टला फार दिवस स्वस्थ बसूं दिलें नाहीं. सन १९३६ मध्यें एक मोठें व सुसज्ज पथक एव्हरेस्टवर पाठवायचें ठरलें. तत्पूर्वी म्हणजे सन १९३५ मध्यें शिप्टनच्या नेतृत्वाखालीं एक छोटें पथक पाहणी करण्यासाठीं एव्हरेस्टवर गेलें. या मोहिमेचा हेतु १९३६ च्या चढाईसाठीं नव्या गिर्यारोहकांची व नव्या साधनांची चांचणी

करणें हा होता. त्यांनीं एव्हरेस्टच्या आसमंतांतील कांहीं शिखरांजर यशस्वी चढाया केल्या, आणि बऱ्याचशा भूभागाची मोजणी केली. एव्हरेस्टवर ते नॉर्थकोलपर्यंत जाऊन आले. त्यांच्याजवळ पुरेशी सामुग्री असती तर शिखरावर जाण्याचा सुद्धां प्रयत्न त्यांनीं केला असता.

सन १९३६ च्या मोहिमेसाठीं खूप पैसा खर्च करून अद्यावत् व किंमती साधनसामुग्री जमा करण्यांत आली होती. परंतु मोठ्या तयारीनिशीं तिबेटांत गेलेल्या या पथकाला प्रतिकूल हवामानामुळें २३००० फुटांपलीकडे जातां आलें नाही. रटलजच्या नेतृत्वाखालीं नेहमींच्या क्रमानें, तळ बनवीत ओझीं वाहात व पायऱ्या खोदीत ते नॉर्थकोलपर्यंत गेले. परंतु त्या सालीं वादळें लवकर सुरू झाली. हिमाच्या वर्षावामुळें व वाऱ्याच्या जोरामुळें एव्हरेस्टचें शिखर गांठणें अशक्य झालें. गिर्यारोहक पुन: पुनः वर जाण्याचा प्रयत्न करीत; पण पुन: पुनः त्यांना परतावें लागे. अगदीं प्राणावर बेते-पर्यंत पुढें जायचें, मागें परतायचें नाहीं, अशा निश्चयानें ते पुढें जात. पण वादळापुढें त्यांना हार खावी लागे. अपघात होऊन दोघा गिर्यारोहकांचा जीव जाण्याची पाळी आली होती. पण त्यापैकीं एकाच्या प्रसंगावधाना-मुळें त्यांचें जीव वांचले. हवेंत थोडीशी उघ ड झाल्याचें पाहून हॅरिस व शिप्टन यांनीं एकमेकाला दोरीनें बांधून नॉर्थकोलवरून वरच्या तळावर जायला सुरवात केली. चढणीवरील हिमाचा थर गोठून त्याचें बर्फ झालें होतें. ते सुमारे पांचेश फूट गेले तोंच एकाएकी, ज्यावर ते उभे होते तो बर्फाचा लाबरुंद तुकडा, एखाद्या अजस्त्र हातोड्यानें फोडल्याप्रमाणें तुटून घसरूं लागला. ते दोघे निमिषार्धांत, बर्फाच्या लोंढ्यांत वाहूं लागले. तेवढ्यांत हॅरिसला जवळच बर्फाचा एक निश्चल भाग दिसला. क्षणाचाही विलंब न करितां त्यानें त्यावर उडी मारून आपली कुदळ खुपसली व तिच्यावर कमरेचा दोर गुंडाळला. आपल्या शरीराचा भार कुदळीवर देऊन, तो शिप्टनला वांचविण्यासाठीं तयार राहिला.

दोरीच्या दुसऱ्या टोकाला असलेला शिप्टन वाहात जात होता. पण दोर पुरा ताणल्यावर त्याला एकदम हिसका बसून तो थांबला. सुदैवानें दोरी तुटली नाहीं, किंवा कुदळही बर्फातून बाहेर निघाली नाहीं. दोरीच्या आधारानें शिप्टन हळूहळू वरती येऊं लागला, त्याचवेळेस तो बर्फाचा लोंढा कड्यावरून खालीं कोसळत होता.

एखाद्या शिखरावर चढाई करण्यासाठीं अफाट पैसा खर्च करून, अवजड पथक घेऊन जाणें, गिर्यारोहणाच्या तत्वाशीं विसंगत आहे, असें म्हणणाऱ्या गिर्यारोहकांचा एक गट होता. त्यांच्या मतें, कसेंहि करून एखाद्या मानवाला एव्हरेस्टच्या शिखरावर नेऊन उभे करण्यांत धन्यता न मानतां, आल्पस्‌मधील शिखरावरील चढायांप्रमाणें, एव्हरेस्टवर जाणाऱ्या पथकांनींही बेताची सामुग्री व मोजके भारवाहक घेऊन जावें. म्हणजे, प्रतिकूल हवामानामुळें किंवा इतर कारणामुळें यश आलें नाहीं, तर एकंदर जनतेचा अपेक्षाभंग होणार नाहीं, आणि आर्थिक नुकसान बेताचें राहील. सन १९३६ ची जंगी मोहीम अयशस्वी झाल्यामुळें असें सुटसुटीत पथक पाठविण्याची कल्पना बऱ्याच लोकांना पसंत पडली. सन १९३८ मध्यें टिलमनच्या नेतृत्वाखालीं सात गिर्यारोहकांचें एक पथक एव्हरेस्टवर गेलें. त्या पथकांत शिप्टन, स्माइद, व ओडेल हे अनुभवी गिर्यारोहक होते.

पूर्वीच्या पथकांपेक्षां बरेंच लवकर, म्हणजे तारीख ५ एप्रिललाच ते रॉंगबक येथें जाऊन पोहोंचलें. लवकर आल्यामुळें त्यांना एव्हरेस्टवरील थंडी फार जाणवली. थंडीची तीव्रता अद्याप कमी न झाल्यामुळें एव्हरेस्टच्या वरच्या भागावर जाणें इष्ट नव्हतें. थंडीची पर्वा न करितां त्यावेळेस कोणी वरच्या भागावर चढून गेला असतां, तर त्याच्यावर हिमदग्ध होण्याचा प्रसंग ओढवला असता. म्हणून उष्णतामान व हवा अनुकूल होईपर्यंत ते एव्हरेस्टजवळील रमणीय खर्ता खोऱ्यांत राहायला गेले. तेथें कांहीं दिवस काढल्यावर त्यांनीं पुन्हां वर जाण्यास सुरवात केली. पावसाळी हवा लवकर

सुरू झाल्यामुळें, नॉर्थकोलवर जाण्याच्या नेहमीच्या पूर्व रॅांगबक बर्फ-प्रवाहाकडील मार्गावरील हिमाची परिस्थिति बिघडून गेली होती. बर्फाच्या भिंतीवर अचानकपणें हिमप्रपात होण्याचा संभव उत्पन्न झाला होता. मुख्य रॅांगबक बर्फप्रवाहावरून पश्चिम बाजूनें नॉर्थ कोलवर जाणें शक्य आहे, असें त्या भागाची पाहणी करून सन १९३६ मधील कांहीं गिर्यारोहकांनीं ठरविलें होतें. नेहमीच्या मार्गावरून येजा करणें धोक्याचें झाल्यामुळें टिलमनच्या पथकांतील गिर्यारोहकांनी ही कल्पना प्रत्यक्ष अंमलांत आणून पाहिली, व ते पश्चिम बाजूनें नॉर्थ कोलवर गेले. सन १९२१ च्या पहिल्या पथकांतील मॅलरीनें पाहणी करून, त्या मार्गानें वर जाणें शक्य नाहीं, असें ठरविल्यानंतर सन १९३८ पर्यंत त्या बाजूनें कोणीच चढून गेले नव्हते. पश्चिम बाजूकडील ही चढण जास्त उभी आहे.

प्रातिकूल हवामान व हिमवर्षाव या अडचणींमुळें एकदोन वेळां असफल प्रयत्न केल्यानंतर ता. ८ जून रोजीं शिप्टन व स्माइद या जोडीनें २७२०० फुटांवर सहावा तळ बनविला. शेवटची चढाई करणें गिर्यारोह-कांना सोपें जावें म्हणून, सहावा तळ शक्य तितका वर बनविण्याचा भार-वाहकांचा निश्चय होता. उशीर झाला तर खालच्या तळावर परत जाणें दुरा-पास्त होईल, याची ते पर्वा करीत नव्हते. परंतु दुपारचा एक वाजला असल्यामुळें, तेथें थांबण्याचें गिर्यारोहकांनीं ठरविलें. पूर्वीच्या पथकांतील गिर्यारोहकांना, शेवटच्या तळावर ओझीं नेण्यासाठीं भारवाहकांची मन-धरणी करावी लागली होती. यावेळेस उलट, त्यांच्या उत्साहाला बांध घालावा लागला.

आदल्या दिवशीं पांचव्या तळावर जातांना दोन भारवाहकांची तब्येत बिघडली. ओझीं वाटेंतच ठेवून, ते खालीं परतले. त्या ओझ्यांत वर लागणारे आवश्यक तंबू होते. पण ते नेण्यासाठीं पांचव्या तळावरून परत-खालीं येण्यास कोणी तयार नव्हते. कारण चवथ्या तळावरून पांचव्या

तळावर ओझीं वाहून नेण्याच्या श्रमांमुळे सर्वजण अगदी थकून गेले होते. पण तशा परिस्थितींत, पासंग व नेन्सिंग हे दोघेजण सातशे फूट खालीं उतरून येऊन, तीं ओझीं पाठीवर घेऊन परत वर गेले. गिर्यारोहणासारख्या खडतर क्षेत्रांत प्रसंग पडेल तेव्हां, सामान्य माणसाच्या ताकदीबाहेरची कामें शेर्पा करूं शकतात, हें त्यांनीं पुन्हा एकदा सिद्ध करून दाखविलें.

त्या सालीं खूप हिमवर्षाव झाल्यामुळे पथकांतील एकाही गिर्यारोहकाला सहाव्या तळाच्या फारसें वर जातां आलें नाहीं. ज्यांनीं प्रयत्न केला, त्यांना त्या उंचीवर कमरेइतक्या खोल हिमांतून चढत जाणें अशक्य झालें.

जगांतील सर्वांत उंच ठिकाणीं उभे राहण्याची मनुष्याची महत्वाकांक्षा अद्याप सफळ झालेली नाहीं. एव्हरेस्ट अजून अजिंक्यच राहिलें आहे. अनेक प्रतिकूल गोष्टींशी झगडावें लागल्यामुळे, सहाव्या तळावर पोंचेपर्यंतच गिर्यारोहकांचें बळ निम्में होऊन जातें. तेथून पुढची प्रगति अनुकूल हवामान व हिमाची परिस्थिति यांवर अवलंबून असते. सहाव्या तळावर पोंचल्यावर थंडी व वाऱ्याची तीव्रता कमी असेल, आणि वरच्या खडकांवर भुकटीसारख्या हिमाचा अभाव असेल, तरच, पुढेंमार्गे एव्हरेस्टचें शिखर गांठणें शक्य होईल, असें तेथपर्यंत जाऊन आलेल्या गिर्यारोहकांचें म्हणणें आहे. एव्हरेस्ट शिखराच्या वाटेवरील असंख्य अडचणींची कल्पना आल्यावर एव्हरेस्टच्या माथ्यावर मनुष्यानें पाय ठेवणें अशक्यच आहे कीं काय असें वाटूं लागतें. खरें आहे! एव्हरेस्टसारख्या महान पर्वताशीं तुलना केली असतां किड्यासारखा दिसणारा मानवी गिर्यारोहक एव्हरेस्टला नमवूं शकेल काय? एव्हरेस्टच्या भात्यांतील भयंकर अस्त्रांचा मारा सहन करून शेवटचे हजार फूट चढून तो आपला विजयी ध्वज एव्हरेस्टवर उभा करूं शकेल काय? अशक्य वाटतें. पण साध्य झालेल्या कितीतरी गोष्टी प्रथम अशक्य वाटत नव्हत्या कां? चिकाटीनें अनेकवार प्रयत्न केल्यानेंच त्या साध्य झाल्या. लहान




एव्हरेस्टवरील विवक्षित स्थळें दाखविणारें छायाचित्र

शक्तीनें प्रचंड शक्तीशीं सामना दिल्याची कितीतरी उदाहरणें इतिहासांत आहेत. मराठ्यांच्या लहानलहान टोळयांनीं औरंगजेबाच्या प्रचंड सेनेवर आघात करून त्याला जेरीस आणलें; जेथून जिवंत परत येणें अशक्य वाटत होतें, अशा अंदमानच्या यमपुरींत वीर सावरकरांनीं आपलें लोकजागृतीचें कार्य चालू ठेवलें; महात्मा गांधी शस्त्राविना ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं झगडले; गेल्या जागतिक युद्धांत जर्मन विमानांनीं केलेल्या बॉंबवर्षावाखालीं ब्रिटिश लोकांनी आपला प्रतिकार चालू ठेविला. केवळ प्रतिस्पर्धी मोठा आहे म्हणून खचून न जातां, निकराचें प्रयत्न चालू ठेविल्यानें त्या सर्वांना अखेरीस यश आलें. एव्हरेस्टचें शिखर गांठण्याचे प्रयत्नही असेच चालू राहतील. त्यांत भाग घेऊं इच्छिणाऱ्या खंबीर व कुशल गिर्यारोहकांची वाण कधींच पडणार नाहीं. एव्हरेस्ट चढून जाईपर्यंत, कुणी सांगावें, हिंदुस्थानच्या एखाद्या सुपुत्रालाही या एव्हरेस्ट-यात्रेंत गिर्यारोहक म्हणून सामील होण्याचें भाग्य मिळेल !

जागतिक युद्धामुळें गेल्या दहा वर्षांत एव्हरेस्टवर एकही मोहीम गेली नाहीं. परंतु जगांत स्थिरस्थावर झाल्यास एक दोन वर्षांत एखादें सुसज्ज पथक एव्हरेस्टवर चढाई करण्यास येईल असा भरंवसा वाटतो. एव्हरेस्टवर चढाई करण्याच्या मार्गांत तिबेटकडून परवानगी मिळविण्याची एक मोठी धोंड आहे. परंतु आतांपर्यंतच्या झालेल्या चढायांना तिबेटनें परवानगी दिली एवढेंच नव्हे, तर स्थानिक अधिकाऱ्यांकरवीं सहकार्य केलें. पूर्वीच्या पथकांनीं आपल्या सौजन्यपूर्ण व सुशिस्त वागणुकीनें एव्हरेस्टच्या मार्गावरील तिबेटी जनतेचा स्नेह संपादन केला आहे. त्यामुळें यापुढील पथकांना परवानगी देण्यास तिबेट सरकार फारशी खळखळ करील, असें वाटत नाहीं. अंतिम यश मिळण्यापूर्वी कदाचित् अजून अनेक प्रयत्न करावें लागतील. पण आपल्या कर्तबगारीची पताका एव्हरेस्टवर फडकविल्याखेरीज मनुष्यांतील मनुष्यपण त्याला स्वस्थ बसूं देणार नाहीं.

## एव्हरेस्टवर उड्डाण : : ९

एव्हरेस्टवर जाण्याचें उच्च ध्येय गांठण्यासाठीं गिर्यारोहक पुन्हां पुन्हां येऊन जिवापाड श्रम करीत होते, त्याच सुमारास कांहीं धाडसी वैमानिकांच्या डोक्यांत एव्हरेस्टच्या शिखरावर विमानानें उड्डाण करून, तेथील भूभागाचें फोटो घ्यावेत अशी कल्पना आली. प्रथम जेव्हां ही कल्पना लोकांना सांगण्यात आली तेव्हां लोकांना ती अशक्य कोटींतील वाटली असल्यास नवल नाहीं. कारण, एव्हरेस्टवर विमान न्यायचें म्हणजे तीस हजार फुटांवर, ( समुद्र सपाटीपासून सहा मैलावर ) विमान न्यायची तयारी पाहिजे. याखेरीज तेथील विरळ हवा, तीव्र थंडी, झंझावात वगैरे अडचणींचा परिहार करण्याची साधनें विमानांत असली पाहिजेत. एव्हरेस्टवर उड्डाण करितांना कांहीं अज्ञात संकटेंही असण्याचा संभव होता. या कारणांमुळें एव्हरेस्टवर विमानांतून उड्डाण करण्याची कल्पना म्हणजे केवळ वैमानिकांचें मनोराज्य होतें.

बलूनमध्यें हलक्या वजनाची हवा भरून आकाशांत उड्डाण करण्याची कल्पना अठराव्या शतकांत निघाली. त्या कलेंत हळूहळू प्रगति होत जाऊन एकोणिसाव्या शतकांत, पाहिजे तशी वळवितां येणारी मोठ्या आकाराची हवाई जहाजें वापरण्यांत येऊं लागलीं. या हवाई जहाजांचें मुख्य तत्त्व

पोहोताना वापरण्यांत येणाऱ्या भोपळयासारखें होतें. बलूनमध्यें हलकी हवा भरलेली असल्यानें तें हवेंत आपोआप तरंगत असें. यंत्राची आवश्यकता फक्त इकडून तिकडे वळविण्यासाठीं होती. आधुनिक तऱ्हेच्या विमानांची प्रगति झाल्यावर बलून विमानें मागें पडली. एकतर ही हवाई जहाजें फार मोठीं व अवजड असत. त्यांच्या बांधणीला फार खर्च लागे. शिवाय, दुर्दैवानें, या हवाई जहाजांना फार अपघात झाले. ' आर एकशे-एक ' नांवाचें मोठें हवाई जहाज इंग्लंडहून हिंदुस्थानांत येत असतां वाटेंतच त्याला अपघात झाला. सन १८४३ मध्यें एका शास्त्रज्ञानें हवेपेक्षां जड असलेल्या विमानांतून यंत्रशक्तीच्या सहाय्यानें अल्पकाल उड्डाण केलें. त्यानंतर अशी आधुनिक प्रकारची विमानें उडविण्याच्या बाबतीत शास्त्रज्ञ प्रयोग करूं लागले. राईट बंधूंनी केलेला प्रयोग प्रसिद्ध आहे, सन १९०३ मध्यें या शास्त्रज्ञ बंधूंनीं पेट्रोलवर चालणारें विमान तयार करून त्यांत बसून ते कांहीं वेळ आकाशांत उडून आले. तेव्हांपासून मात्र, विमानविद्येंत अपेक्षेपेक्षां जास्त वेगानें प्रगति होऊं लागली. सन १९०९ मध्यें ब्लेरिअट नांवाचा वैमानिक विमानानें इंग्लिश खाडी ओलांडून गेला. पुढें महायुद्ध सुरू झाल्यावर विमानांचा युद्धांत उपयोग सुरू झाल्यानें त्यांत अनेक सुधारणा झाल्या. १९१९ मध्यें ॲल्कॉक व ब्राउन यांनीं अटलांटिक समुद्र ओलांडण्याचा विक्रम केला. १९२७ सालीं कॅप्टन लिंडबर्ग एकटा, विमानानें न्यूयार्कहून पॅरिसला ३३ तासांत गेला. अशा विमानोड्डाणांत अपघातही होत होते. बरेच वैमानिक व शास्त्रज्ञ प्राणास मुकले. परंतु निरनिराळे उच्चांक मोडण्याच्या इर्षेनें पुढें येणाऱ्या वैमानिकांची वाण केव्हांही पडली नाहीं. पुरुषांबरोबर धाडसी स्त्रियांनीहि विमानोड्डाणांत भाग घेतला. मिस ॲमि जॉन्सन या तरुणीनें आपलें विमान चालवीत इंग्लंड ते ऑस्ट्रेलिया प्रवास केला.

एकीकडे वैमानिक आकाशांत उंचीचे व वेगाचे उच्चांक स्थापित करण्याचा प्रयत्न करीत होते, तर खालीं, जमिनीवरील प्रयोगशाळेंत शास्त्रज्ञ, विमानांची बांधणी, इंजिनें, व इतर साधनें यांत सुधारणा करण्याचे प्रयोग करीत होते. या दोघांच्या मेहेनतीमुळें विमानविद्येंत अवघ्या पाव शतकांत खूप प्रगति झाली. लांबवर जाण्याच्या विक्रमाप्रमाणेंच, आकाशांत शक्य तितके उंच जाण्याचे प्रयोग वैमानिकांनी केले. सन १९३० मध्यें अमेरिकेच्या वैमानिक दलांतील लेफ्टनंट सोसेक यानें आकाशांत चाळीस हजार फुटांवर जाण्याचा विक्रम केला. त्यानंतर धाडसी वैमानिकांचें लक्ष साहजिकच जगांतील अत्युच्च शिखरांकडें वळलें. सन १९३२ मध्यें कांहीं ब्रिटिश वैमानिकांनीं एव्हरेस्टवर विमानांतून उड्डाण करण्याची योजना तयार केली.

साध्या मैदानावर खूप उंच उड्डाण करण्यापेक्षां एव्हरेस्टसारख्या डोंगराळ भागांत उड्डाण करणें कितीतरी अडचणींचें व धोक्याचें होतें. सखल पृष्ठभागांवर खूप उंचीवर उड्डाण करणें वेगळें, आणि हिमालयांतील उत्तुंग शिखरांवर उड्डाण करणें वेगळें. पर्वतावरून उड्डाण करण्यांत अनेक धोके असतात. पर्वताच्या रांगांतून हवेचें प्रवाह निरनिराळ्या दिशेनें व जोरानें वाहतात. कांहीं ठिकाणीं सूर्यकिरणानें खडक तापतात व खडकाजवळची तापलेली हवा वर जाऊं लागते. त्या ठिकाणीं थंड हवेचा झोत जोरानें येतो.अशा हवेच्या झोतांत विमान सापडलें तर एकदम खालीं ओढलें जाऊन पर्वताच्या बाजूवर किंवा दरींत कोसळून पडण्याची भीति असते. विमानावर हवेचे जोरात आघात होतात व त्यांचा प्रतिकार करितांना वैमानिकाचा विमानावरील ताबा सुटण्याचा संभव असतो. शिखरांजवळील झंझावातांत विमान चेपटून जाऊं नये, म्हणून, त्याचे सर्व भाग मजबूत बनवावे लागतात. एव्हरेस्टवर उड्डाण करायचें म्हणजे उन्हाळयाच्या दिवसांत उत्तर हिंदुस्थानांतील एका विमानतळावरून निघून, थोड्या तासांच्या अवकाशांत ३३००० फुटांवरील विरळ हवेंत, व शून्याखालीं

जवळजवळ शंभर अंश थंडी असलेल्या वातावरणांत जायचें! अशा उड्डाणास वापरण्यांत येणारें विमान व इतर उपकरणें उष्णतामान व हवेचा दाब यांतील तीव्र फरक सहन करतील अशा प्रकारें बनविलीं पाहिजेत. विमानाच्या बांधणींत किंवा आवश्यक उपकरणांत कांहीं कमजोरी राहिली तर एव्हरेस्टवरील उड्डाणावरून जिवंत परत येण्याची आशाच नको. कारण, हिमालयांतील दऱ्याखोऱ्यांत, अडचणीच्या प्रसंगीं विमान उतरविण्यास पुरेशी सपाट जागा आढळणार नाहीं.

एव्हरेस्टवरील सर्व अडचणी ध्यानांत घेऊन योग्य त्या प्रकारचीं विमानें बांधून घेण्याकरितां, व ऑक्सिजनची उपकरणें, कॅमेरे, विमानांतील हवामान गरम राहण्याची व्यवस्था, वगैरे सर्व साधनें नीट बनवून घेण्यासाठीं इंग्लंडमध्यें सन १९३२ मध्यें एक नियामक समिति नेमण्यांत आली. समितिपुढें मुख्य प्रश्न पैशाच्या तरतुदीचा होता. एव्हरेस्टवरील अशा अस्मानी मोहिमेला तीनचार लाख रुपये खर्च येणार होता. लेडी हॉस्टन नांवाच्या एका श्रीमंत बाईनें आर्थिक मदत देण्याचें कबूल केल्यानें समितीची विवंचना दूर झाली. या मदतीप्रीत्यर्थ या मोहिमेस लेडी हॉस्टन मोहीम असें नांव देण्यांत आलें. मोहिमेच्या व्यवस्थापकांपुढें दुसरी एक अडचण होती. हिंदुस्थानांतून निघून एव्हरेस्टवर उड्डाण करायचें, म्हणजे नेपाळवरून जायला हवें. नेपाळच्या एकंदर धोरणावरून अशा उड्डाणास नेपाळ परवानगी देईल किंवा नाहीं याविषयीं शंका होती. परंतु हिंदुस्थान सरकारनें जबाबदार अधिकारी पाठवून हा उपक्रम राजकीय आक्रमणाकरितां नसून, केवळ वैमानिक व भौगोलिक शास्त्रांत प्रगति करण्याकरितां आहे, असें नेपाळनरेशांना पटवून दिल्यानंतर नेपाळकडून परवानगी मिळाली.

विमानोड्डाणास परवानगी व पैशाचें पाठबळ मिळाल्यावर, इंग्लंडमध्यें जोराची तयारी सुरू झाली. गिर्यारोहकांच्या पथकांप्रमाणेंच सामानाची

जुळवाजुळव, भाग घेणाऱ्यांची कडक वैद्यकीय तपासणी वगैरे प्राथमिक कामें सुरू झाली. उड्डाणाकरितां खास दोन विमानें बांधण्यांत येऊन, इंग्लंडमध्येंच ३३००० फूट उंचीवर त्यांना उडवून, ती बरोबर काम देतात कीं नाहीं हें पाहाण्यांत आलें. हौस्टन मोहिमेंत प्रत्यक्ष भाग घेणारे वैमानिक व निरीक्षक यांनींही तेवढ्या उंचीवर विमानांत जाऊन, ठरलेली सर्व कामें करण्याचा सराव केला. विमानांतील उपकरणांची चांचणी घेण्यांत आली. प्रत्यक्ष उड्डाण करीत असतां आयत्या वेळेस काय काय अडचणी येतील व त्याला तोंड कसें द्यायचें, याचा विचार, उड्डाण करण्यापूर्वीच संपूर्णपणें करण्याची आवश्यकता होती. "तुम्हाला जो काय विचार करायचा असेल तो जमिनीवर असतांना करा. एकदां विमान उडूं लागलें, म्हणजे मग वैमानिकानें व निरीक्षकानें यंत्रासारखीं कामें केली पाहिजेत," असें या पथकाच्या नेत्याचें सांगणें होतें. एव्हरेस्टसारख्या उंच पर्वतावरील उड्डाणाविषयीं लोकांना कांहींच माहिती नव्हती. तेथें वातावरण कसें असेल, कोणत्या अडचणी येतील, याविषयीं मुद्दाम शंकाकुशंका काढून त्या तज्ज्ञांपुढें मांडून, त्यांसाठीं योग्य त्या योजना करण्यांत येत होत्या. वैमानिकांचे पोशाख, हातमोजे व पायमोजे एवढेंच नव्हे, तर धुक्यानें धूसर होऊं नये म्हणून गॉगल्स सुद्धां, विजेच्या सहाय्यानें गरम ठेवण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. वर गेल्यावर ऑक्सिजनचा पुरवठा मिळावा म्हणून वैमानिक व निरीक्षक यांच्या मुखवट्याला ऑक्सिजन नळ्या जोडलेल्या होत्या. पायानें चालत, हळूहळू २८००० फुटांपर्यंत चढून जाणाऱ्या गिर्यारोहकांचें कृत्रिम ऑक्सिजन शिवाय भागत होतें. पण अर्ध्याएक तासांत समुद्र सपाटीपासून ३३००० फुटांवरील विरळ हवेंत जाणारे वैमानिक कृत्रिम ऑक्सिजनशिवाय जिवंत राहिले नसते.

विजेच्या सहाय्यानें गरम राहणारा जाडजूड पोशाख चढवायला वैमानिकांना २० मिनिटे लागत. एकदां तो घालून आपल्या जागेवर बसले

कीं इकडे तिकडे हालणेंही मुष्किल होत होतें. शक्य तितक्या कमी वेळांत हा पोशाख घालून आपल्या जागेवर बसण्याचा सराव होण्यासाठीं, त्यांनीं ही क्रिया इंग्लंडमध्यें असतांना शेकडों वेळा करून पाहिली होती. नियामक समितीनें एव्हरेस्टच्या उंचीचाही विचार केला होता. सर्व्हे ऑफ इंडियानें दूरवरच्या डोंगरावरून मोजणी करून एव्हरेस्टची उंची २९१४१ फूट आहे असें ठरविलें होतें. परंतु हवामानाचा यंत्रावर परिणाम झाल्यानें किंवा मोजणींत चूक झाल्यानें, उंचींत थोडाफार फरक असण्याचा संभव होता. अजूनपर्यंत प्रत्यक्ष शिखरावर जाऊन एव्हरेस्टची उंची कोणी मोजून पाहिलेली नाहीं. उंचीच्या आकड्यांत चूक असण्याच्या शक्यतेमुळें सुरक्षिततेच्या दृष्टीनें ३३००० फुटांवरून एव्हरेस्टवर उड्डाण करावें असें समितीनें ठरविलें.

सन १९३३ च्या उन्हाळयांत एकीकडे रटलजच्या नेतृत्वाखालीं गिर्यारोहकांची मोहीम चालू होती, त्याचवेळेस वैमानिक व निरीक्षक बिहारमधील पूर्णिआजवळील लालबालू विमानतळावर अनुकूल हवेची वाट पाहात बसले होते. एव्हरेस्टवर उपयोगांत आणण्याच्या खास विमानांचे सुटे भाग करून ते बोटीनें इंग्लंडहून हिंदुस्थानांत आणण्यांत आलें होते.

तारीख ३ एप्रिल १९३३ हा दिवस उजाडला आहे. पूर्णिआ येथील वैमानिकांना अनुकूल हवामानाची वाट पहात बसण्याचा कंटाळा आला आहे. गेले दहा पंधरा दिवळ ते तळ ठोकून आहेत. एव्हरेस्टवर उड्डाण करण्याची सर्व तयारी झालेली आहे. रोज रात्रीं कलकत्त्याहून हवामानाचा अंदाज येतो. हवामान खात्यांतील एक अधिकारी श्री. गुप्ता यांची पूर्णिआ येथें पथकाला मदत करण्यासाठीं खास नेमणूक झाली आहे. दररोज रबरी फुगे आकाशांत सोडून ते वाऱ्याच्या वेगाची मोजणी करितात, व पथकांतील वैमानिकांना हवामानाची सविस्तर माहिती देतात. अखेर आज ता. ३ एप्रिल रोजीं हवामान अनुकूल आहे, असें सर्वांचें मत झालें. उंचीवर आकाश निरभ्र आहे कीं नाहीं हें पाहण्यासाठी पथकाचा नेता एअर कमोडोर फेलोज

हा पुसमॉथ हें छोटें विमान घेऊन सुर्योदयापूर्वीच निघून १७००० फूट वर गेलेला आहे. तो केव्हां खालीं येतो आणि उड्डाण करण्यास हुकूम देतो, असें वैमानिकांना झालें आहे. वैमानिकांची सारखी चुळबुळ चालू आहे. साहजिक आहे ! ज्यासाठीं त्यांनीं गेलें वर्षभर कसून तयारी केली, ती वेळ येऊन ठेपली आहे. एकीकडे नेता परत येण्याची वाट पहात, दुसरीकडे सर्व तयारी ठीक झाली आहे कीं नाहीं, याची पुन्हां पुन्हां चौकशी करीत ते वेळ घालवीत आहेत.

तेवढ्यांत नेत्याचें विमान खालीं येतें. फेलोज १७००० फुटांपर्यंत जाऊन परत आला आहे. १७०००फुटांवर जरी दाट धुकें आहे, तरी त्याच्या-वरती आकाश निरभ्र आहे, असें सांगून तो उड्डाण करण्याची परवानगी देतो. लगेच वैमानिकांची व निरीक्षकांची कपडे चढविण्याची धांदल सुरू होतें. निरीक्षकाचें काम साध्या व फिलमच्या कॅमेऱ्यानें फोटो घेण्याचें व वेळों-वेळीं उष्णतामान, उंची वगैरे पाहण्याचें असतें. विमान उडूं लागल्यावर कोणत्या उंचीवर काय काय गोष्टी करावयाच्या, याची यादी त्यांनीं करून घेतलेली आहे. कारण मागे सांगितल्याप्रमाणें, एकदां उड्डाणास सुरवात झाल्यावर विचार करण्यास फुरसत मिळणार नाहीं. वेळचेवेळीं जर प्रत्येक गोष्ट केली नाहीं, तर एवढा खटाटोप करून केलेलें हें उड्डाण फुकट जायचें. उदाहरणार्थ, धूळ जाऊं नये म्हणून कॅमेऱ्याच्या लेन्सेसवर झांकणें लावून ठेवलेली आहेत. ती काढून घ्यायचे निरीक्षक विसरला, तर अनेक फूट फिलम वाया जाईल एवढेंच नव्हे, तर एव्हरेस्टजवळील भूभागाचे सर्व्हे फोटो घेणें, हा जो या मोहि-मेचा उद्देश आहे तोच असफल होईल. अशी संधि पुन्हां येणार नाहीं.

वैमानिक व निरीक्षक आपापले पोशाख चढवीत आहेत. तोपर्यंत मदतनिसांनीं विमानें हँगारमधून बाहेर काढून, त्यांचीं इंजिनें चालू केलीं आहेत. विमानांतील सर्व साधनें व सामुग्री व्यवस्थित बसविली आहेत, कीं नाहीं, याची निघण्यापूर्वीं पुन्हां एकदा तपासणी होते. ऑक्सिजनची

उपकरणें, साधे कॅमेरे, चलत् चित्रपटाचे कॅमेरे, वस्तू गरम ठेवणारी विजेची उपकरणें, उष्णतामान व हवेचा दाब मोजणारी यंत्रें, सर्व ठीक बसविली आहेत ना ? त्या त्या गोष्टीकरितां जबाबदार असणारा कामगार " होय ", असें उत्तर देतो. सर्वांच्या मनांत खळबळ उडून राहिलेली आहे. या उड्डाणाकडे सर्व जगाचें लक्ष आहे. आपण आपली कामगिरी नीट बजावली आहे ना ? प्रत्येकजण मनाशी विचार करीत आहे. सर्वांना आपल्यावरील जबाबदारीची जाणीव आहे.

आतां निघायची वेळ झाली. जाडजूड पोषाखांत वैमानिकांना घाम येऊं लागला आहे. पण थोड्यांच वेळांत वर गेल्यावर ते थंडीने काकडूं लागतील, याची त्यांना कल्पना आहे. विमानांत चढून आपापल्या जागीं बसल्यावर ते निरोपदर्शक हात हलवितात. " यशस्वी व्हा, व सुरक्षित परत या." इंजिनच्या घरघरींत, मोठ्यानें ओरडून तळावरचे लोक त्यांना निरोप देत आहेत. खुणा केल्यावर, विमानाच्या चाकापाशीं लावलेलें ठोकळे बाजूला सारण्यांत आले, आणि...तीं पहा दोन्ही विमानें उडूं लागली. थोड्याच अवकाशांत तीं ठिपक्यांएवढीं बारीक दिसूं लागलीं व नंतर क्षितिजापलीकडे निघून गेली. आतां खालच्या लोकांचें काम म्हणजे ते सुखरूप परत यावेत अशी प्रार्थना करीत, आकाशाकडे डोळे लावून बसायचें.

दोन विमानांपैकीं पुढच्या विमानांत स्क्वाड्रनलीडर फ्लाइड्सडेल हा वैमानिक, व कर्नल ब्लॅकर हा निरीक्षक व छायाचित्रकार असें दोघेजण आहेत. मागच्या विमानांत फ्लाइट लेफ्टनंट मॅकिन्टायर हा वैमानिक व बॉनेट हा निरीक्षक असे दोघे आहेत. या निरीक्षकांचें मुख्य काम, एव्हरेस्टजवळील भूभागाचे उभे व तिरपे फोटो घेण्याचें आहे. असे फोटो एकत्र जुळविलें म्हणजे, त्या प्रदेशाचा नकाशा तयार करता येतो. दुर्गम अशा त्या प्रदेशांत अजूनपर्यंत कोणी गेलेलें नसल्यानें, अशा विहंगम छायाचित्रांची आवश्य-

कता आहे. दहा हजार फूट चढल्यानंतर आपल्या विमानांत सर्व ठीक चाललें आहे अशा अर्थी, दोघां वैमानिकांनीं एकमेकाला खूण करायची असें आधीं ठरलेलें आहे. त्याप्रमाणें, विमानें जवळ आणून, दोघे वैमानिक पूर्व संकेताप्रमाणें एकमेकाला खूण करितात. आतां विमान जोरांत न्यायला हरकत नाहीं. गॅस देऊन क्लाइड्सडेल विमान जोरांत वर चढवूं लागतो. दाट धुकें असल्यानें त्यांना जमीन दिसत नाहीं. त्यामुळें नक्की कोठें आहोंत, हें त्यांना कळत नाहीं. वीस हजार फूट वर गेल्यावर ते धुक्यांतून बाहेर पडतात. आतां त्यांना जो देखावा दिसतो, तो ते आजन्म विसरणें शक्य नाहीं. पिंजलेल्या कापसाच्या ढिगाऱ्यासारख्या त्या दाट धुक्याच्या थरावर, आतां उंच शिखरेंच तेवढीं दिसत आहेत. पन्नास मैल दूर असलेलें तें एव्हरेस्टचें उदात्त शिखर किती खुलून दिसत आहे ! त्याच्या शिखरापासून लांबचलांब हिमपताका फडफडत आहे. एव्हरेस्टच्या उजव्या बाजूला दुसरें भव्य शिखर मकालू, आणि पूर्व बाजूला कांचनजंगाच्या शिखराचा समूह यक्षनगरींतील एखाद्या किल्ल्याच्या तटबंदीसारखा दिसत आहे. डाव्या बाजूला एव्हरेस्टपासून कांहीं अंतरावर गौरीशंकराचें शिखर शुभ्र हिमाच्या आवरणानें तळपत आहे. दाट धुक्याच्यावर प्रथम एवढींच शिखरें दिसतात. दुसरें कांहीं दिसत नसल्यामुळें हीं शिखरें किती जवळ वाटत आहेत ? हा देखावा जणुं पृथ्वीवरचा नाहीं ! कुठल्यातरी दुसऱ्या ग्रहावरील हा देखावा आपल्याला दिसत आहे कीं काय, असा भास त्यांना होत आहे.

दोन्ही विमानें आणखी वर जातात. उंचीवरून आणखी दूरदूरचीं शिखरें व उपशिखरें दिसूं लागतात. हळूहळू एव्हरेस्ट व मकालू या पर्वतांची रांग जवळ येत आहे. निसर्गाच्या या अफाट साम्राज्यांत हीं दोन मनुष्यनिर्मित विमानें घरघर करीत चालली आहेत. कोणाचें कौतुक करावें ? एवढा प्रचंड देखावा निर्माण करणाऱ्या ईश्वराचें, कां आपल्या बुद्धीच्या

बळावर निसर्गाच्या या अफाट साम्राज्यांत शिरून आपली आयुधें वापरणाऱ्या मानवाचें !

हा अद्भुत चित्रपट पाहात बसण्यास निरीक्षकास फुरसत नाहीं. जसजसें एव्हरेस्ट जवळ येऊं लागलें आहे, तसतशी त्याला बरींच कामें उरकायचीं आहेत. खालचें दार उघडून कॅमेऱ्यानें फोटो घ्यायचे, प्लेट्स बदलायच्या, मधून मधून स्पिरिट लेव्हलकडे पाहायचें. निरीक्षक भराभर काम करीत आहे. विमानांतील वस्तू हळूहळू गार होत चालल्या आहेत.

इतक्यांत पुढचें विमान एकदम खालीं जातें. एव्हरेस्ट पर्वताच्या बिनवाऱ्याच्या बाजूनें विमान जात असतां, खालच्या दरीकडे वाहणाऱ्या वाऱ्याच्या झोतांत सांपडून विमान एकदम खालीं जाऊं लागतें. वैमानिकानें पेट्रोलचा भरपूर पुरवठा दिला तरी विमानाची अधोगति थांबत नाहीं. विमान वरती चढविण्याचा प्रयत्न वैमानिक करत आहे. एकदम झटक्यानें एखादी कळ दाबूनही उपयोग नाहीं. कारण हवेच्या जोरानें ती कळ बिघडली, तर, मग विमान एकदम खालचा बर्फप्रवाह गांठील. विमान खालीं जायला लागल्यापासून कांहीं सेकंदेच झालीं. पण केवढा वेळ झाल्यासारखें वाटतें. समोरील डोंगराचा कडा आतां अगदीं जवळ जवळ येत आहे. विमान आतां त्या एव्हरेस्टच्या दक्षिण बाजूवर आपटून कोसळणार असें क्षणोक्षणीं वाटत आहे. आतांपर्यंत विमान जवळजवळ दोन हजार फूट खालीं उतरलें आहे. इतक्यांत खालून एक हवेचा झोत येतो, आणि विमान वर चढूं लागतें. विमान हळूहळू वरती चढत आहे. पण समोरचें एव्हरेस्टचें शिखर अगदीं जवळजवळ येत आहे. विमान निसटून जाईल कां आपटेल ? विचार करायला वेळ नाहीं. तेवढ्यांत विमान शिखरावरून निसटून जातें. अगदीं थोडें अंतर राहिलें होतें. पण नशिबानें बचावलें ! सुस्कारा टाकून, निरीक्षक आपलें काम पुन्हा जोरानें चालू करतो. आतां विमान एव्हरेस्टवर चक्कर

घालीत असल्यानें, वेळ वाया न घालवितां निरीक्षक एकसारखें फोटो घेत आहे. एव्हरेस्टवरील हिमपताकेंत शिरल्याबरोबर, विमानाच्या काचांवर बर्फाच्या खड्यांचा वर्षाव होतो, व कांहीं वेळ जवळचें दिसत नाहीं. हिमांतून बाहेर निघून पुढें गेल्यावर, क्लाइडसडेल शिखरमाथ्यावर निरखून पाहतो. मॅलरी व अर्व्हिन् शिखरावर पोंचले असल्यास त्यांचीं प्रेतें किंवा त्यांनीं ठेवलेल्या दुसऱ्या कांहीं खाणाखुणा सांपडतील, अशी आशा त्याला वाटत होती. पण शिखरावर कांहीं दिसत नाहीं. जगांतील सर्वांत उंच शिखरावर असल्यानें त्यांना आजुबाजूचा तीनशे मैल लांबीचा प्रदेश दिसत आहे. असा देखावा पहायास मिळणें हें एक भाग्यच आहे. तें भाग्य धाडसी वीरांच्या वाट्याला आलें आहे, हेंही योग्यच आहे.

आतां गारठा वाढूं लागला. ऑक्सिजनचा सांठा कमी होत चालला. परत मुक्कामावर पोंचायला अजून किती वेळ लागेल कोण जाणे ! तेव्हां, ऑक्सिजन संपवून टाकणें योग्य नव्हे, असा विचार करून क्लाइडसडेल विमान वळवून परत फिरूं लागतो. एव्हरेस्टवर सुमारें पंधरा मिनिटें भ्रमण करून, तीं दोन्ही विमानें नेपाळांतील अरुण नदीच्या दिशेनें जाऊं लागतात, व पुन्हा १६० मैल उडून पुर्णिआच्या विमानतळावर उतरतात.

पूर्णिआहून ते सकाळीं साडेआठ वाजतां जे निघाले ते, एव्हरेस्टला चक्कर मारून साडेअकरा वाजतां परत पूर्णिआला पोहोंचले. हिमाच्छादित भव्य शिखरें असलेल्या त्या अमर्याद वातावरणांतून परत पूर्णिआला आपल्या ओळखीच्या लोकांत येऊन, जमिनीवर पाय ठेवल्यावर त्यांना हायसें वाटलें. पूर्णिआला ऊन तळपत होतें. उतरल्याबरोबर गरम कपडे काढून टाकून, विमानें कॅमेरे वगैरे कारागीरांच्या ताब्यांत देऊन, ते जवळच असलेल्या तळ्यांत पोहायला गेले. विजेनें गरम होणाऱ्या हातमोजांपैकीं एक फारच गरम झाल्यानें, एका वैमानिकाला चटका बसून फोड आला होता.

या उड्डाणांत दुसऱ्या विमानांतील दोघे मॅकिन्टायर व बॉनेट यांच्यावरही कठीण प्रसंग आले होते. विमान शिखराजवळ जात असतां निरीक्षक बॉनेट आपल्या कॅमेऱ्यांत फिल्मप्लेट घालण्याकरितां वांकला, तेव्हां त्याचा पाय ऑक्सिजन नळीवर पडला, आणि परत उठतांना त्या नळीवर जोराचा ताण पडल्यानें मुखवट्यापाशीं नळीला चीर पडली. ऑक्सिजन मिळेनासा झाल्यानें, अंगांतील शक्ती कमी होऊं लागल्यासारखें त्याला वाटूं लागलें. हातांतील कॅमेरा गळून पडला. ताबडतोब खालीं बसून त्यानें ऑक्सिजनच्या उपकरणाची तपासणी केली. ज्या ठिकाणीं चीर पडली होती तेथें हातरुमालानें गुंडाळलें. पण या मध्यंतरीच्या काळांत ऑक्सिजन न मिळाल्यानें तो मूर्च्छित होऊन विमानांत खालीं पडला. वैमानिक मॅकिन्टायर यानें एकदां मागें वळून, बॉनेटची ही धडपड पाहिली होती. पण तेवढ्यांत शिखर जवळ आल्यानें व शिखराचा फोटो काढायचा असल्यानें, नंतर कांहीं वेळ त्याला मागें पाहातां आलें नाहीं. शिखराला चक्कर मारून मागें पाहतो तों, बॉनेटची कांहीं हालचाल दिसेना. इकडे, मान खूप वळविल्यानें त्याच्या मुखवट्यांतील ऑक्सिजनची नळी निघून आली. त्यानें ती बसवायचा प्रयत्न केला. पण जाड हातमोजामुळें ती बसवितां येईना. तेव्हां, एका हातानें ती नळी नाकाशी धरून, दुसऱ्या हातानें तो विमान चालवूं लागला. उंची सोडून आठ हजार फुटांवर येईपर्यंत, सुमारें अर्धा तास त्याला ती कसरत करावी लागली. त्या काळांत बॉनेटला काय झालें असेल, या विचारानें त्याचें मन व्याकूळ झालें होतें. बॉनेट मरण पावला कीं काय, अशी भीति त्याला वाटत होती. म्हणून तो झपाट्यानें उंची सोडून खालीं येत होता. आठ हजार फुटांवर आल्यावर दाट हवेंतील नैसर्गिक ऑक्सिजन मिळाल्यानें बॉनेटला हुशारी आली, व तो हळूहळू उठून उभा राहिला. त्याला पाहून मॅकिन्टायरच्या जिवांत जीव आला.

त्या दोन्ही विमानांनीं एव्हरेस्टला प्रदक्षिणा घातली खरी, परंतु एका विवाक्षित व ज्ञात स्थळापासून एकामागून एक तिरपे फोटो घेण्याचा त्यांचा उद्देश मात्र सफल झाला नव्हता. खालच्या भूभागाचे फोटो धुक्यामुळे अस्पष्ट आले होते. पर्वताचे जे फोटो घेतले गेले, ते एकसारखे नव्हते. मधून मधून कांहीं प्रदेशाचे फोटो घ्यावयाचे राहून गेले होते. आणि वैमानिक व निरीक्षक यांच्यांत समजुतीचा घोटाळा झाल्यानें, एव्हरेस्टऐवजी मकालूचेच कांहीं फोटो घेण्यांत आले होते. ज्या उद्दिष्टासाठीं एवढा अवाढव्य खर्च व पूर्वतयारी केली होती तें साध्य झालेंच नव्हतें. त्याकरितां पुन्हां उड्डाण करण्याची आवश्यकता होती.

ता. ३ रोजीं एव्हरेस्टवर उड्डाण झालें. त्याच्या दुसऱ्या दिवशीं हवा चांगली होती. म्हणून त्या दिवशीं कांचनजंगा शिखरावर उड्डाण करून पहायचें मुख्य वैमानिक फेलोज यानें ठरविलें. कांचनजंगेवर जाण्यांत दोन उद्देश होते. एक, सर्व्हे कॅमेरे नीट काम देतात कीं नाहीं ते पहायचें दुसरें, या मोहिमेचा चलत्‌चित्रपट तयार करण्याकरितां पर्वतांच्या देखाव्यांची आणखी कांहीं चलत्‌चित्रें घ्यायची. या मोहिमेचा चलत्‌चित्रपट करण्याचे सर्व हक्क गॅमट ब्रिटिश फिल्म कंपनीनें घेतले होते. त्याचप्रमाणें, अधिकृत वार्ता प्रसिद्ध करण्याचें हक्क लंडन टाइम्स पत्रानें विकत घेतले होते. हे दोन्ही हक्क विकल्यानें मोहिमेला बरीच आर्थिक मदत प्राप्त झाली होती. टाइम्स पत्रानें आपला एक खास बातमीदार पथकाबरोबर पूर्णिआला पाठविला होता. पथकाच्या हालचालींची बातमी टाइम्स पत्रानें प्रसिद्ध करण्यापूर्वी दुसऱ्या कुणाला मिळूं नये, या विषयीं तो फार काळजी घेत होता. दुसऱ्या वर्तमानपत्राचा कोणी बातमीदार विमानतळावर येऊन चौकशी करूं लागला तर त्याला कांहीं सांगयचें नाहीं, अशी पथकांतील सभासदांना ताकीद होती.

ता. ४ रोजी पथकाचा नेता फेलोज व आणखी तिघेजण दोन विमानें घेऊन काचनजंगा शिखरावर जाऊन आले. तेथेंसुद्धां ढगाच्या पातळीवर

गेल्यावर अपूर्व देखाव्याची मेजवानी त्यांना मिळाली. पण ढग असल्यामुळें नकाशा बनविण्याच्या कामीं उपयोगी येतील, असें फोटो काढतां आले नाहींत. शिवाय, ऑक्सिजनचें मुखवटे तोंडावर नीट बसत नसल्यानें वैमानिकांना ऑक्सिजनचा पुरवठा व्यवस्थितपणें झाला नाहीं. या कारणामुळें त्यांना कमी उंचीवरून उडत यावें लागलें. ढगांमुळें भूपृष्ठावरील खुणेची स्थळें दिसत नसल्यानें, फेलोज रस्ता चुकून भलतीकडेच गेला, आणि त्याला शामपूर नांवाच्या छोट्या गांवांजवळील एका मैदानांत निरूपायास्तव उतरावें लागलें. सुदैवानें कांहीं अपघात न होता तो आपलें विमान घेऊन दुसऱ्या दिवशीं पूर्णिआला पोहोंचला. परंतु त्याच्या सुरक्षिततेची बातमी येईपर्यंत पथकांतील इतर लोकांना फार काळजी लागून राहिलेली होती.

या दोन्ही उड्डाणांची हकीगत इंग्लंडला जाऊन पोहोंचली होती. लंडनमधील समितीच्या सभासदांना व लेडी हौस्टन यांना पुन्हां एव्हरेस्टवर उड्डाण करणें धोक्याचें वाटूं लागलें. म्हणून त्यांनीं एव्हरेस्टवर जाऊन आल्याबद्दलच्या अभिनंदनपर तारेच्या मागोमाग, आणखी एक तार पाठवून, " केलेल्या कामगिरीवर संतुष्ट राहावें. पुन्हां प्रयत्न करूं नये," असें सुचविलें. परंतु पूर्णिआ येथील वैमानिकांना हा सल्ला पटण्यासारखा नव्हता. त्यांच्या मतें, चांगले सर्व्हे फोटो काढल्याशिवाय लोकांनीं मोहिमेस हरएक प्रकारें केलेल्या मदतीचें चीज होणार नव्हतें. म्हणून त्यांनीं दुसऱ्या उड्डाणाच्या तयारीस सुरवात केली. दुसरें उड्डाण करण्यास नेपाळकडून परवानगी मिळाल्याचें वृत्त लंडन टाइम्समध्यें प्रसिद्ध झाल्यावर इंग्लंडहून लेडी हौस्टन व इतर वजनदार व्यक्तींकडून तारावर तारा येऊं लागल्या. त्यांत पथकानें पुन्हा प्रयत्न न करितां परत यावें असें कळविण्यांत येत होतें. कांचनजंगेवरील उड्डाणांत वैमानिकांना जो त्रास झाला, त्यामुळें पुन्हां त्याच विमानांतून वैमानिकांनीं

एव्हरेस्टवर जाणें, फार धोक्याचें आहे असें इंग्लंडमध्यें सर्वांचें मत झालें. होते. पथकांतील वैमानिकांनीं तारा करून, वस्तुस्थिति समजावून सांगण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण त्याला नकारार्थीच उत्तर आलें. आतां पंचाइत आली ! पुन्हा एकदां प्रयत्न केल्याशिवाय, महत्प्रयासानें जमविलेला सर्व पसारा आवरूं नये, असें पूर्णिआवरील वैमानिक व निरीक्षक यांना वाटत होतें. त्यांनीं दुसरें उड्डाण करण्याचे बेत गुप्तपणे चालूं ठेवले. नियामक समितीचे हुकुम अमान्य करून एव्हरेस्टवर जाण्याचा जुगार खेळायचें त्यांनीं ठरविलें. उड्डाण यशस्वी होऊन, पाहिजे तसे फोटो मिळाले, तर त्या यशापुढें त्यांची बंडखोरी लोक विसरून जातील. उलट अयशस्वी झाले तर...... " जे काय भोगावे लागेल तें भोगूं. तेवढा धोका पत्करलाच पाहिजे, " असा विचार त्यांनीं विचार केला.

त्यांच्या सुदैवानें मुख्याधिकारी फेलोज हा आजारी पडला, व त्याला बिछान्यावरून हालतां येईना. ती संधि साधून त्यांनीं विमानतळावर तयारी चालू ठेविली. एके दिवशीं फेलोजच्या खोलींत जाऊन, त्यांनीं उंचीवर उड्डाण करण्याची परवानगी मागितली.

" कशाकरितां ? " फेलोजनें विचारलें.

" कांहीं नाहीं. पर्वतांच्या देखाव्याचें आणखी कांहीं फोटो हवे आहेत, अशी या फिल्म कंपनीवाल्याची मागणी आहे. "

" तेवढ्याच करितां जायचे असेल, व विमानतळापासून फार दूर जाणार नसाल तर मी परवानगी देतो. पण हें पहा...... " फेलोजचे पुढचे शब्द ऐकायला वैमानिक थांबलेच नव्हते. त्यांनीं खोलींतून काढता पाय घेतला, न जाणो फेलोज आणखी कांहीं अटी घालायचा.

त्यांनीं आपल्या कटांत फक्त निवडक लोकांनाच घेतलें. अनुकूल हवेची वाट पाहतां पाहतां आठदहा दिवस गेले. फेलोज बरा होऊन विमान-तळावर येऊं लागला, तर त्याला आपल्या संकल्पित उड्डाणाची बातमी लागून

तो तें थांबवील अशी भीति त्यांना वाटत होती. नियामक समितीच्या हुकमानें बांधला गेला असल्यानें, फेलोज दुसऱ्या उड्डाणास परवानगी देणें शक्य नव्हतें. म्हणून वैमानिकांनीं ता. १८ रोजीं पथकाच्या डॉक्टरला विनंती केली कीं, "कांहीं करा, पण आणखी एक दिवस फेलोजला बिछाना सोडून बाहेर येऊं देऊं नका."

अगदीं हवें तसें, अनुकूल हवामान मिळण्याची आशा दुरावत चालली होती, म्हणून आहे त्या स्थितींत शेवटचा प्रयत्न करण्यासाठीं, ता. १९ रोजीं सकाळीं ते विमान तळावर येऊन सज्ज झाले. पेट्रोल ऑक्सिजन वगैरे वस्तू त्यांनीं आदल्या रात्रींच भरून ठेविल्या होत्या. पथकाबरोबर असलेल्या टाइम्सच्या बातमीदाराला त्यांच्या गुप्त बेताचा सुगावा लागला होता. पण या छुप्या उड्डाणाचें वृत्त त्यानें आधीं प्रकट करूं नये, अशीं विनंति त्यांनीं केली होती. म्हणून, बातमीदारानें ही बातमी सांकेतिक भाषेंत लंडन टाइम्सला कळवुन, दुसरा संदेश येईपर्यंत ती छापू नका, असें कळविलें होतें. त्याला त्याच्या धंद्याच्या दृष्टीनें टाइम्सला ही बातमी कळविणें अवश्य होतें. दुसऱ्या एखाद्या वर्तमानपत्रांत या उड्डाणाची बातमी आधी प्रसिद्ध झाली असती, तर टाइम्सच्या संपादकाकडून त्याची चांगली कानउघाडणी होऊन विचारणा झाली असती.

दोन्ही विमानें तळावरून निघून गेल्यावर एअर कमोडोर फेलोजला बातमी समजली, व तो डॉक्टरच्या सल्ल्यास न जुमानतां विमानतळावर गेला. पेट्रोल व ऑक्सिजन यांचा मोठा पुरवठा घेऊन निघालेल्या त्या विमानांना जाऊन तास दीड तास झाल्यावर, ते कुठल्या आघाडीवर गेले असतील, याची त्याला पूर्ण कल्पना आली. पूर्वीप्रमाणेंच क्लाइड्सडेल व ब्लॅकर हे पुढल्या विमानांत होते. मागील विमानांत मॅकिन्टायर व फिशर हे दोघे होते. अठरा हजार फुटांपर्यंत ढग होते. ढगाच्या समु-

द्रांतून वर गेल्यावर त्यांना हिमालयांतील शिखरें दिसूं लागलीं. एव्हरेस्ट-पासून २० मैल अंतरावर पोहोंचल्यावर त्यांनी सर्व्हे कॅमेरे चालू केले. त्या त्या कॅमेऱ्याची झाकणें, विजेच्या योगानें दर पंधरा सेकंदांनीं आपोआप उघडून फोटो घेतले जात होते. एव्हरेस्टवर वारा खूप जोराचा होता. त्यामुळें एव्हरेस्टवरील हिमाची पताका लांबचलांब, म्हणजे जवळजवळ सहा मैल लांब फडकत होती. आगगाडीच्या इंजिनांतून निघणाऱ्या वाफेच्या फवाऱ्या-प्रमाणें ती दिसत होती. दूरदूरच्या पर्वताच्या रांगा त्यांना दिसत होत्या. पश्चिमेकडे काराकोरम, उत्तरेकडे कुएनलुन पर्वत, पूर्वेकडे कांचनजंगा पर्वत व ब्रह्मपुत्रा नदी. पृथ्वीच्या गच्चीवरच ते हिंडत होते. त्यांनीं शिखराच्या दक्षिण बाजूचे व जवळपासच्या दहाबारा मैलांच्या टापूचे उभे व तिरपे फोटो घेतले. पुढच्या विमानांतील दोघांना कांहीं त्रास झाला नाहीं पण मॅकिन्टायरच्या विमानाला मात्र एव्हरेस्टच्या हिमाच्या तुऱ्याशीं पोंचल्या-वर, वाऱ्याच्या दाबामुळें खालच्या बाजूनें मोठा दणका बसल्यासारखें झालें. मॅकिन्टायरला क्षणभर अशी भीति वाटली कीं, त्या धक्क्यानें विमानाचें पंख किंवा त्यांना बांधणाऱ्या तारा तुटून, विमान हेलकावे खायला लागणार. पण विमान इतकें मजबूत बनविलें गेले होतें कीं, त्या आघाताचा त्यावर कांहीं परिणाम झाला नाहीं.

विमानतळावर परत आल्यावर, मुख्याधिकारी फेलोज याच्याशीं वैमानिकांची गांठ झाली. दोन्हीं विमानें सुखरूपपणें परत आल्यानें त्याच्या नाखुषीचें कारण राहिलें नव्हतें. आतां प्रश्न एवढाच होता, कीं एवढें धाडस करून काढलेले फोटो कसे आले आहेत. त्यांनीं खूप फोटो घेतले होते. ते सर्व व्यवस्थित डेव्हलप करीपर्यंत रात्र झाली. त्या महत्त्वाच्या फिल्म्स घाईघाईनें डेव्हलप करून चालणार नव्हतें. अखेर, त्यांनीं काढलेले

फोटो उत्तम आल्याचें कळल्यावर सर्वांना समाधान वाटलें. लंडनला लगेच, विद्युत् संदेश पाठविण्यांत आले.

अशा रीतीनें धाडसी कामें अंगावर ओढवून घेऊन, ती यशस्वी होण्याकरितां अनेक महिने कसून मेहनत करून, शेवटीं वेळ आली तेव्हां आज्ञाभंगाचें पातक पत्करून, त्यांनीं आपल्या अंगावरची नैतिक जबाबदारी धडाडीनें पार पाडली. त्यांच्या धाडसी कृत्यानें आपण दिपून जातोच, पण ती कृत्यें करण्यापूर्वी त्या कामगिरीस लायक होण्यासाठीं, त्यांनीं अनेक महिने मेहनत केली, सर्व्हे फोटोग्राफी, भूगोल, वातावरणशास्त्र वगैरे अनेक उपयुक्त शास्त्रांचा अभ्यास केला, हेंही ध्यानांत घेतलें पाहिजे. प्रत्यक्ष एव्हरेस्टवर त्यांनीं एकदोन तासच घालविले. परंतु ते घालवितां यावें म्हणून त्यांनीं इंग्लंडमध्यें शेकडों तास पूर्वतयारींत घालविले होते. त्यामुळेंच ते या दिव्यांतून सुखरुपपणें पार पडले.

त्यांनीं काढलेले फोटो इंग्लंडमध्यें नीट जुळविण्यांत येऊन, त्यांचा नकाशा तयार करण्यांत आला. एव्हरेस्टच्या दक्षिण भागाचा नकाशा यापूर्वी तयार झालेला नव्हता, कारण तेथें मोजणी करण्यास जाणें कठीण होतें. या पथकानें काढलेल्या फोटोंवरून तयार झालेल्या नकाशामुळें, त्या भागांतील दऱ्याखोरीं, छोटीं शिखरें, पर्वतांच्या रांगा, बर्फप्रवाह, वगैरेंची माहिती उपलब्ध झाली. त्यांनीं काढलेल्या कांही फोटोंत १८००० फुटांवर एका जागीं त्रिकोणाकृति काळा ठिपका दिसतो. शास्त्रज्ञांच्या मतें, ऊन पाण्याच्या झऱ्यांनीं पोसलेलें तें एक लहानसें तळें असलें पाहिजे. कारण, त्याचें पाणी गोठलेलें नाहीं. पृथ्वीच्या पोटांतील उष्णतेमुळें तिच्या पृष्ठ भागावर घडामोडी होऊन हिमालय निर्माण झाला असा जो सिद्धान्त आहे, त्याला या गरम तलावाच्या अस्तित्वानें पुष्टि मिळते.

खूप उंचीवर उड्डाण करण्याच्या कलेंत उत्तरोत्तर जसजशी प्रगति होत जाईल, तसतशा एव्हरेस्टवर आणखी कांहीं स्वाऱ्या होतील. कदाचित्, विमानविद्येंत व विमानांतील सफरीच्या सुखसोयींत एवढी प्रगति होईल कीं, एव्हरेस्टवरून विमानानें प्रवास करणें, पुण्याहून मुंबईला डेक्कन क्वीननें जाण्यासारखें वाटेल. पण कांहीं झालें तरी, अज्ञात अशा अंतराळांत पहिलें उड्डाण करणाऱ्या या हौस्टन मोहिमेची प्रतिष्ठा कमी होणार नाहीं.

## एव्हरेस्टशीं एकट्यानें झुंज खेळणारा

## साहसी वीर कॅप्टन मॉरिस विल्सन : : १०

एखाद्या ध्येयाच्या प्राप्तीच्या विचारानें व महत्वाकांक्षेनें भारलेल्या मनुष्याच्या हातून केवढी अचाट कृत्यें होऊं शकतात, याचें कॅप्टन मॉरिस विल्सन हें उदाहरण होय. लोकांच्या उपहासाला न जुमानतां, एव्हरेस्टच्या २९,००० फूट उंचीच्या शिखरावर विमानानें व पायीं एकट्यानें जाण्याचा त्यानें जो साहसी प्रयत्न केला, त्याची कथा फारच परिणामकारक व विस्मय-कारक आहे. एव्हरेस्टवर जाणें आधीच कठीण, व तो ज्या मार्गानें जाणार होता, त्या मार्गानें तर अगदीच असाध्य होतें. अशा असाध्य ध्येयाचा त्यानें ध्यास घेतला, आणि ते साध्य करण्याचा प्रयत्नांत प्राणाहुति दिली. जगांतील लोकोत्तर व्यक्तींच्या यादींत जरी त्याचें नांव येऊं शकलें नाहीं, तरी निधड्या छातीच्या व आपलें ध्येय साध्य करण्याकरितां कुठल्याही संकटांची, हालांची व विरोधाची पर्वा न करणाऱ्या वीरांच्या यादींत त्याचें नांव अजरामर राहील.

सन १९३३ मध्यें लेडी हौस्टन मोहीमेंतील दोन विमानांनीं एव्ह-रेस्टवर भरारी मारून येण्याची कामगिरी केली. त्याच सुमारास, इंग्लंड-

मध्यें बातमी पसरली कीं, कॅप्टन मॉरिस विल्सन नांवाच्या एका गृहस्थानें, एका छोटया विमानानिशीं एव्हरेस्टच्या पायथ्यापर्यंत जाऊन व तेथून पुढें एकट्यानें एव्हरेस्टवर चढत जाण्याचा बेत केला आहे. ती बातमी ऐकल्या-वर लोकांनीं त्याला वेड्यांत काढलें. एव्हरेस्टवर मोहीम करावयाची म्हणजे केवढी तयारी करावी लागते, केवढी सामुग्री जमवावी लागते, कितीतरी गोष्टी सांभाळाव्या लागतात ! एव्हरेस्टवर जाणाऱ्या पथकांत कितीतरी कसलेले गिर्यारोहक, व कितीतरी अनुभवी भारवाहक असतात. एवढ्या बंदोबस्तानें जाऊन सुद्धा त्यांना जें साध्य झालें नाहीं तें हा एकांडा शिलेदार साध्य करूं पाहाणार ? कमाल आहे या गृहस्थाची ! कुणी म्हणाले, "याला आत्महत्याच करायची आहे, तर इथेंच इंग्लंडमध्यें कां नाहीं करीत ?" दुसरे म्हणाले, "सरकार त्याला बंदी कां करीत नाहीं ?" हौस्टन मोहिमेंतील विमानांत, विजेच्या सहाय्यानें हवामान गरम ठेवण्याची व्यवस्था होती. पेट्रोलचा भरपूर पुरवठा होता. या व इतर अनेक गोष्टींनीं तीं विमानें सज्ज होतीं. याउलट, मॉरिस विल्सनचें विमान अगदी साधें, शिकाऊ विमानासारखें होतें. तें विमान घेऊन हिमा-लयांत जाण्याची कल्पना हास्यास्पदच होती. "चक्रम मनुष्य आहे," असें समजून लोकांनीं त्याच्याकडे दुर्लक्ष करण्यास सुरवात केली. पण कॅप्टन विल्सननें आपली तयारी चालूं ठेवली.

विल्सनचें वय ३५ वर्षांचें होतें. तो एका कारखानदाराचा मुलगा होता. पहिल्या महायुद्धांत केलेल्या धाडशी कृत्याबद्दल त्याला मिलिटरी क्रॉस (शौर्याबद्दल मिळणारें सन्माननीय पदक) मिळालें होतें. त्याची वृत्ति मात्याच धाडसी होती. त्यामुळें स्वस्थ बसणें त्याला अशक्य होतें. वैमानिक-कला व गिर्यारोहण यांविषयीं त्याला कांहींच माहिती नव्हती. परंतु त्याच्या कणखर शरीरयष्टीच्या जोडीला, त्याच्याजवळ धैर्य व आत्मविश्वास

यांचा अमाप सांठा होता. हिंदुस्थानांतील योगी लोक योगविद्येच्या बळावर पदार्थविज्ञान शास्त्रांत उल्लेखिलेल्या क्रियांना रोखून धरून, वाटेल तशीं कृत्यें करूं शकतात, याचीं वर्णनें त्यानें वाचलीं होतीं, व योगशास्त्राचा अभ्यासही केला होता. योगी व संन्यासी मनःशक्तीच्या बळावर, खड्ड्यांत स्वतःला पुरून घेऊन कित्येक दिवस जिवंत राहूं शकतात; विस्तवावर चालू शकतात; हिमालयांतील तीव्र थंडींत अंगावर कपडा न घेतां वर्षानुवर्षे राहूं शकतात. त्यांच्या साधनांचा अवलंब करून योगबळ आत्मसात् केलें तर आपल्यालाही तें करतां येईल, असें विल्सनला वाटत होतें. शिवाय, एव्हरेस्टच्या मोहिमेच्या वर्णनाच्या पुस्तकांत स्माइद यानें आपल्या एका अनुभवाचें जें वर्णन केलें होतें, त्याचा विल्सनवर परिणाम झाला. १९३३ च्या मोहिमेंत स्माइद एकटाच २७००० फूट चढून गेल्यावर, त्याला आपल्या बरोबर कुणी तरी सांथी असल्याचा, व त्याचा आपल्याला आधार असल्याचा भास होत होता. या भावनेनें त्याला केवढा धीर आला! आपण घसरलों तर आपल्याला हा सोबती सावरेल, असें स्माइदला वाटत होतें. सोबतीचा हा आधार प्रत्यक्ष देवानें स्माइदला दिला होता, असा विल्सनचा विश्वास होता. आपणही हालअपेष्टा सोसून एव्हरेस्टवर गेलों, तर ईश्वर आपल्यालाही अशीच मदत करील, असें त्याला त्याचा 'आंतला आवाज' सांगत होता. एव्हरेस्टसारख्या दुर्लंघ्य शिखरावर चढून जाणें साध्या युरोपीय गिर्यारोहकाला साधणार नाहीं; तें योगसाधना केलेल्या व्यक्तीलाच साध्य होईल, असें त्याचें मत झालें होतें.

म्हणून त्यानें शरीरावर ताबा मिळविण्यासाठीं देहदंड सोसून योग-साधना करण्यास सुरवात केली. सातसात आठआठ दिवस कांहीं न खातां उपास करणें सुरुं केलें. हळूंहळूं दश दिवस उपास केल्यानंतरही त्याला अशक्त वाटेनासें झालें. ही तयारी झाल्यावर, त्यानें लंडन एरोक्लब-मध्यें विमानविद्या शिकण्यास सुरवात केली. थोड्याच दिवसांत त्याला

विमान चालविण्याचा परवाना मिळाला. शिकतांना त्याला एक अपघात झाला होता. एकदां, विमान उतरवितांना त्याचें विमान एकदम जोरानें खालीं घेऊन झाडांत आदळलें. झाडावरून, त्या मोडलेल्या विमानांतून विल्सननें रस्त्यावरून जाणाऱ्या एका मुलाला हांक मारिली. ती ऐकून त्या मुलाला आश्चर्यच वाटलें. त्या मुलानें विमानाच्या सांगाड्यांतून व झाडाच्या फांद्यांतून बाहेर पडण्यास विल्सनला मदत केली. एवढा अपघात होऊन-सुद्धां विल्सनला खरचटण्यापलीकडे कांहीं लागलें नव्हतें.

त्यानें एक विमान विकत घेतलें, व निघण्याची तयारी केली. त्याच्या या साहसी बेताचा सुगावा लागल्यावर, सरकारकडून त्याला विचारणा आली. पण आपल्याला ऑस्ट्रेलियाला जायचें आहे, अशी बतावणी करून तो १९३३ च्या मे महिन्यांत इंग्लंडहून स्वतःच्या विमानानें निघाला. तो निघाला तेव्हां फक्त चाळीस तास विमान चालविण्याचा त्याला अनुभव होता. कैरो येथें पोहोंचल्यावर त्याला कळलें कीं, इराणवरून उड्डाण करण्याची परवानगी त्याला देण्याबाबत तेथील अधिकाऱ्यांना कांहींच लिहून आलें नव्हतें. त्यामुळें तो बगदाद मार्गानें बाहेरिनला गेला. तेथल्या ब्रिटिश कॉन्सलनें पुढें प्रवास करण्याकरितां पेट्रोल देण्याचें नाकारलें. विल्सन असल्या अडच-णींना थोडाच भीक घालणार होता ! त्यानें ग्वाडरमार्गें पुढें कराचीस जाण्याचें स्वतांशीं ठरविलें, पण ब्रिटिश कॉन्सलला सांगितलें कीं, " मी बगदादला परत जात आहे, तरी त्याकारितां मला पेट्रोल द्या.' त्याप्रमाणें पेट्रोल देण्याचें ब्रिटिश कॉन्सलनें कबूल केलें, व पेट्रोलचा परवाना लिहून देण्याकारितां तो दुसऱ्या खोलींत गेला. तेवढ्यांत त्याच्या ऑफिसमधील नकाशाचें चित्र विल्सननें आपल्या कोटाच्या बाहीवर उतरवून घेतलें, कारण, त्याजजवळ त्या मार्गाचा नकाशा नव्हता.

बाहेरिनहून तो निघाला तेव्हां, अनुकूल हवामानांत ग्वाडरपर्यंत जेम-तेम पुरेल येवढें पेट्रोल त्याजजवळ होतें. कांहीं कारणानें प्रवासाचा वेळ

वाढला, तर पेट्रोल संपून विमान खालीं कोसळण्याची भीति होती. त्याला हिंदुस्थानला पोचायचें असल्यानें त्यानें तो धोका पत्करला. नऊ तास उड्डाण केल्यावर त्याच्या विमानाचें एंजिन एकदम घरघरूं लागलें. आतां आपण खालीं पडणार, असें त्याला वाटूं लागलें. तेवढ्यांत ग्वाडरचा विमानतळ आला, व सूर्यास्तापूर्वी दहाच मिनिटें तो सुखरूपपणें विमानतळावर उतरला. तेथून तो कराची व अलाहाबाद मार्गानें बिहारमधील पूर्णिआच्या विमानतळावर पोहोंचला. तेथें पोचल्याच्या दुसऱ्या दिवशीं, तेथील मॅजिस्ट्रेटनें त्याचें विमान जप्त करण्यांत आल्याचें त्याला सांगितलें. तें विमान एकवीस दिवसांनीं परत त्याच्या ताब्यांत देण्यांत आलें. दरम्यानच्या काळांत पावसाळ्यास सुरवात होऊन हिमालयांतील प्रदेशांत विमानोड्डाण करणें अशक्य झालें होतें. त्यामुळें, विमानानें एव्हरेस्टच्या पायथ्यापर्यंत जाण्याची कल्पना त्याला सोडून द्यावी लागली, आणि त्यानें लखनौला जाऊन आपलें विमान विकून टाकलें.

त्यानंतर, नेहमीच्या दार्जिलिंगच्या मार्गानें पायीं चालत एव्हरेस्टला जावें, असा विचार करून तो दार्जिलिंगला पोहोंचला. तेथें पोचल्याबरोबर, दार्जिलिंगच्या पुढें न जाण्याबद्दलचा हुकूम तेथील सरकारी अधिकाऱ्यानें विल्सनवर बजावला. अशा प्रकारें, ठिकठिकाणीं त्याच्या मार्गांत अडथळे येत होते. पण कसेंही कां होईना, एव्हरेस्टवर जायचें, हा एकच ध्यास विल्सननें घेतला होता. अगदीं तुटपुंजी सामुग्री घेऊन एकट्यानें एव्हरेस्टवर जाण्याचा आत्मघातकी व वेडा विचार सोडून देण्याची, त्याच्या मित्रांनीं व हितचिंतकांनी त्याला वारंवार विनंति केली. पण विल्सननें कुणाचेंही ऐकिलें नहीं. त्याचें म्हणणें असें, कीं कित्येक गोष्टी सकृद्दर्शनी अशाच असाध्य वाटतात. प्रथम पुढें जाणाऱ्या माणसाला अशीच भीति घालण्यांत येते. पण त्यानें तेथें जाण्याचें धाडस केलें कीं मागून जाणारे लोक तेथें बिनधोक जाऊं शकतात.

सरकारनें बंदी केल्यानें विल्सनला दार्जिलिंग येथें वर्षभर थांबावें लागलें.

पण आपलें ध्येय कसें साध्य करावें, याविषयीचें विचार त्याला क्षणभरही मोकळे सोडत नव्हते. त्यानें दार्जिलिंगमध्यें तद्देशीय लोकांच्या भाषेचा अभ्यास केला, आणि गुप्तपणें भारवाहकांशी करार केला. एके रात्रीं भारवाहकांच्यासारखे कपडे घालून, व तोंडाला माती फासून ही स्वारी हिंदुस्थानच्या सरहद्दीवरुन पुढें सटकली आणि सिक्कीम मार्गानें वाट चालूं लागली. त्यानें सोबत कांहीं निवडक भारवाहक घेतले होते. त्याच्याजवळ फारसे सामान नव्हतें. एक ऑक्सिजनचें सिलिंडर, उंची मोजण्याचें यंत्र, कॅमेरा, डायरी, थोडे कपडे व खाद्यपदार्थ एवढीच सामुग्री त्याच्याजवळ होती. सिक्कीममध्यें पकडले जाऊं नये म्हणून रात्रीच्यावेळी प्रवास करून, तो तिबेटमध्यें शिरला. तिबेटमध्यें शिरल्यावर त्यानें भारवाहकाचें कपडे बदलून आपला पाश्चात्य पोशाख घातला. कारण, तिबेटची राजधानी ल्हासा येथून तांतडीनें एखादा बंदी हुकूम येण्याची शक्यता कमी होती. शिवाय तो इतक्या जलद कूच करीत होता कीं मागून येऊन त्याला कोणी गांठणें शक्य नव्हतें.

रटलजच्या १९३३ च्या पथकाला जो प्रवास करण्यास ३५ दिवस लागले, तो २५ दिवसांत उरकून मॉरिस विल्सन १८ एप्रिल १९३४ रोजीं, एव्हरेस्टच्या पायथ्याच्या रॉगबक मठाशी जाऊन पोहोंचला. तेथें एकच दिवस मुक्काम करून, पायथ्याचा तळ, पहिला तळ, दुसरा तळ, याप्रमाणें तो वर चढूं लागला. त्याचें धाडस, काटकपणा, ध्येयनिष्ठा व साधी राहणी पाहून, त्याच्याबरोबरच्या भारवाहकांची त्याच्यावर भक्ति जडली. तो एक असाधारण पुरुष आहे असें त्यांना वाटूं लागलें. म्हणूनच केवळ, पुरेशी सामुग्री न घेतां एकटयानें एव्हरेस्टवर चढणें हास्यास्पद आहे, असें त्यांना वाटत होतें तरी सुद्धां, त्यांनी विल्सनबरोबर एव्हरेस्टवर जाण्याचें कबूल केलें. नॉर्थकोलवरील बर्फाच्या भिंतीच्या पायथ्याशीं पोहोंचल्यावर भारवाहकांना पूर्वीच्या १९३३ च्या मोहिमेची आठवण झाली. यापुढील भिंत चढणें किती कठीण आहे, याचा पूर्ण अनुभव त्यांना होता. एकमेकाला

दोर बांधून सुद्धां तेथें चढणें कठीण व धोक्याचें होतें. पण विल्सनजवळ दोरबीर कांहीं नव्हता. त्यामुळें त्याच्या तिघा भारवाहकांनीं पुढें जाण्याचें नाकारलें. विल्सननें खूप सांगून पाहिलें, परंतु भारवाहक ऐकेनात. उगीचच्या उगीच आपल्या प्राणावर कोण उदार होईल? एव्हरेस्टवर चढण्याच्या वेगाचे पूर्वीचे सर्व उच्चांक मोडून, ते २१००० फुटापर्यंत येऊन पोहोंचले होते. पण दोर न बांधतां बर्फाची ती उभी भिंत चढण्याची त्यांची तयारी नव्हती. परंतु विल्सन तेथें थोडाच थांबणार होता? ज्योतीवर झडप घालणाऱ्या एखाद्या पतंगाप्रमाणें, त्याची दृष्टी एव्हरेस्टच्या शिखराकडे होती. कांहीं अपघात झाला नाहीं, तर आपण शिखरावर पोचून चार पांच दिवसांत खालीं येऊं शकूं, असा त्याचा अंदाज होता. "माझी पंधरा दिवस वाट पहा. तेवढ्यांत मी परत आलो नाहीं, तर सामान घेऊन तुम्हीं हिंदुस्थानांत परत जा," त्यानें भारवाहकांस सांगितलें व तो पुढें निघाला.

ता. १७ मे रोजीं त्यानें एकट्यानें पुढें चढण्यास सुरवात केली. त्यावेळेस तेथील उष्णतामान शून्याच्या खालीं ५० अंश होतें. त्याच्या-बरोबर तीन पावाचे तुकडे, पॉरिजचे दोन डबे, एक छोटासा घडीचा तंबू, कॅमेरा व युनिअन जॅक, एवढें सामान होतें. शिखरावर पोहोंचल्यावर युनिअन जॅक तेथें रोवून त्याचा फोटो घेण्याचा त्याचा बेत होता. पुढें चढूं लागल्यावर, कांहीं वेळानें मागें वळून त्यानें हात हालविला व नंतर तो खडकाआड नाहींसा झाला.

भारवाहकांनीं एक आठवडा वाट पाहिली, एक आठवड्यानंतर तो जिवंत परत येण्याची शक्यता जवळजवळ नाहींशी झालेली होती. पण त्यांना विल्सनची असामान्य सहनशक्ति माहित होती. कदाचित् विल्सनला, १९३३ च्या मोहिमेंतील सोडून दिलेल्या सामानापैकीं कांहीं सांपडलें असेल व त्यामुळें तो सावकाश चढत असेल, असे विचार भारवाहकांच्या मनांत आले. दुसरा आठवडा निघून गेला. आतां परत जाण्यास ते मोकळें होतें.

पण तरीही आणखी दोन आठवडे त्यांनीं वाट पाहिली. शेवटीं, एक महि-नाभर वाट पाहिल्यावर, पावसाळ्याचे दिवस आल्यामुळें, विल्सनची आशा सोडून ते दार्जिलिंगला परतले.

पुढें दोन वर्षांनीं रिटलजच्या नेतृत्वाखालीं जें पथक एव्हरेस्टवर गेलें, त्यांतील गिर्यारोहकांना विल्सनचें थंडीनें गोठलेलें प्रेत २२००० फूट उंचीवर सांपडलें. त्याच्यापाशीं सांपडलेल्या दैनंदिनींत त्यानें अस्पष्ट असें शेवटपर्यंत लिहिलेलें होतें. गिर्यारोहकांनीं त्याचें शव तेथेंच बर्फांत पुरलें, व त्याची दैनंदिनी परत आणली. एव्हरेस्टवर एकट्यानें जाण्याचा, अशक्य दिसणाऱ्या गोष्टीचा, प्रयत्न केल्याबद्दल लोक विल्सनला वेडा ठरवतील. पण त्याचें धैर्य व ध्येयनिष्ठा हे गुण अलौकिक होते, यांत शंका नाहीं. कल्पना करा, तो जर शिखरावर पोंचून परत आला असता, तर त्याला केवढी कीर्ति मिळाली असती व जगभर त्याचा केवढा सन्मान झाला असता !

# कांचनजंगा : : ११

ब्रिटिश गिर्यारोहकांच्या एव्हरेस्टवरील मोहिमांचीं वर्णनें वाचून स्फूर्ति मिळाल्यामुळें कांहीं जर्मन गिर्यारोहकांनींही हिमालयाकडे मोर्चा वळविला. डॉ. पाउलबाउअर व प्रो. डायरेन फर्थ यांच्या नेतृत्वाखालीं सन १९२९ ते १९३१ च्या दरम्यान कांचनजंगा या पर्वतावर तीन मोहिमा झाल्या. या मोहिमा यशस्वी झाल्या नाहींत. परंतु गिर्यारोहकांचें धैर्य, चिकाटी, खंबीरपणा, पर्वताच्या कठीण बाजूवर हिमप्रपाताच्या माऱ्यांत चढून जाण्यांत त्यांनीं दाखविलेलें कौशल्य, हें सर्व गिर्यारोहणाच्या इतिहासांत अपूर्व होतें. कांचनजंगेवरील मोहिमेंत जर्मनांनीं दाखविलेल्या कौशल्याची व काटकपणाची जगांतील सर्व गिर्यारोहकांनीं वाखाणणी केली आहे.

दार्जिलिंगहून चाळीस मैल दूर असलेल्या पर्वतांतील पांच शिखरांच्या समूहाला ' कांचनजंगा ' अर्थात् पांच हिमागर असें म्हणतात. त्यांतील सर्वांत उंच शिखर २८१४६ फूट उंचीचें व हिमालयांतील तिसऱ्या श्रेणीचें आहे. या भव्य शिखराचा देखावा दार्जिलिंगहून उत्तम दिसतो. दार्जि-लिंगच्या टायगर हिलवरून पाहिलें असतां, दाट जंगलांनीं भरलेल्या कांचन-जंगेच्या पायथ्याच्या दऱ्या दिसतात. मान वर करून दऱ्यांच्या वरतीं पाहूं लागलें म्हणजे झाडी हळूहळू कमी होत गेलेली दिसते. आणखी वर पाहिलें

म्हणजे खुरट्या गवतांनीं आच्छादिलेले डोंगर दिसतात. त्याच्याहीवर नजर टाकली कीं, हिमाच्छादित भूभाग दिसूं लागतो. ज्यांचें रूपांतर पुढें खळ-खळणाऱ्या ओढ्यांत होतें, असे बर्फप्रवाह, त्या बर्फप्रवाहांच्या आजूबाजूलीं उंच गेलेले कडे, आणि अशा कड्यांच्यावरती पांढऱ्या शुभ्र व उंच सुळक्यांत प्रामुख्यानें दिसणाऱ्या कांचनजंगेच्या शिखराकडे नजर वळलीं, कीं तेथें कांहीं वेळ खिळूनच राहतें. आकाशाला भिडून स्वर्गांत डोकावून पाहणाऱ्या अशा शिखरावर मनुष्यानें चढून जाणें कल्पनेनेंही अशक्य वाटतें. पण अशी कल्पना केवळ मनांत न बाळगतां ती प्रत्यक्षांत आणण्यासाठीं पाउल बाउअरच्या नेतृत्वाखालीं सन १९२९ मध्यें कुशल व अनुभवी जर्मन गिर्यारोहक हिंदुस्थानांत आले. कांचनजंगेशी सामना करायचा, म्हणजे, कठीण सुळके व कणे यावरून खडकांच्या भेगांचा आधार घेत चढत जाणें, हिमप्रपातामुळें कोसळणाऱ्या शिलावर्षावांतून मार्ग काढणें, शरीर बधिर करून टाकणाऱ्या हिमवादळांत तग धरून राहणें, या सर्व गोष्टीला तयार राहिलें पाहिजे, याची गिर्यारोहकांना कल्पना होती. एव्हरेस्टपेक्षां जवळ जवळ एक हजार फूट उंची कमी असली तरी आरोहण करण्यास कांचनजंगा एव्हरेस्टपेक्षां कठीण आहे. कांचनजंगेची तटबंदी एव्हरेस्टपेक्षां जास्त अभेद्य, व आयुधें जास्त भयंकर आहेत. कांचनजंगा पर्वताचे कणे चाकूच्या पात्याप्रमाणें नोकदार आहेत. पर्वताच्या वरच्या पृष्ठभागावर बर्फाचा थर आहे. त्या थरांतील बर्फाचे तुकडे मधूनमधून तुटून खालीं कोसळतात. खालीं असलेल्या बर्फप्रवाहावर आपटल्यावर त्यांचे हजारों तुकडे होतात. त्या आवाजानें खालच्या दऱ्या दुमदुमून जातात. अशा या रौद्र स्वरूप पर्वतानें १९०५ सालीं एक स्विस गिर्यारोहक व चार भारवाहक यांचा बळी घेतला. सन १९२९ मध्यें डॉक्टर फार्मर नांवाच्या गिर्यारोहकानें एक स्वतंत्र प्रयत्न केला, पण तोही शोकांतिक झाला. भार-वाहकांना मागे थांबण्यास सांगून, छायाचित्रें घेण्यासाठीं तो एकटाच पुढें

गेला, आणि धुक्यांत कायमचा नाहींसा झाला. अपुऱ्या तयारीनिशीं आल्या-मुळें कांचनजंगासारख्या प्रबळ प्रतिस्पर्ध्याशीं गांठ पडल्यावर या गिर्यारोह-कांना अपघाती मृत्यू आले. पण पाउल बाउअरची मोहीम मोठ्या तयारीनें चालून आली होती. त्याच्याबरोबर सतरा शेर्पा व आठ भुतिया भारवाहक होते. त्यांपैकीं कांहींजण एव्हरेस्टचे 'वाघ' होते. या भारवाहकांना साधे व लांब खिळे असलेले बूट, गॉगल्स, बर्फकुदळी व दोर वगैरे सर्व साधनें देऊन, ती कशी वापरावीं, व उभ्या चढणींत कुदळीचा, दोराचा आणि खड-काचा आधार कसा घ्यावा याचें सशास्त्र शिक्षण देण्यांत आलें होतें.

पावसाळयांत हिमालयांत गिर्यारोहण करण्याचें गिर्यारोहक बहुधा टाळतात. पण पाउल बाउअरनें पावसाळयांतच कांचनजंगेवर चढून जाण्याचें ठरविलें. त्याच्यामतें, हिमालयांत एरवी वाहणारे थंड वारे पाव-साळयांत नसतात. त्यामुळें धुक्याचा त्रास झाला, तरी थंडी व वारा सुसह्य असतात. सिक्कीममधील जंगलांतून वाट काढीत, पाउल बाउअरचें पथक कांचनजंगाच्या पायथ्याच्या झेमू बर्फ प्रवाहावर येऊन पोहोंचलें. कांहीं दिवस पाहणी व मार्ग शोधन केल्यावर, ईशान्य बाजूनें हल्ला करण्याचें त्यांनीं ठरविलें. पण कांचनजंगावर चढून जाणें सोपें नव्हतें. साठ अंशाचा कोन असलेल्या व गुळगुळीत बर्फानें मढविलेल्या अशा पाउण मैल लांब चढणीवर, तुफान वाऱ्याचा मारा चालू असतां चढून जाणें किती कठीण असेल याची कल्पनाच करावी. तशा स्थितींत ते दोन वेळां चढून गेले, पण दोन्ही वेळेस वर हिमवादळ सुरुं झाल्यामुळें त्यांना परतावें लागलें. तरीही त्यांनीं आपले प्रयत्न तसेच चालू ठेविले. मोठे परिश्रम करून कण्यावर पोहोंचल्यावर त्यांना पुढें जें दृश्य दिसलें, तें पाहून एखादी कम-कुवत टोळी मागेंच फिरली असती. खडकाच्या आणि बर्फाच्या मनोऱ्यांतून व त्यांना चिकटलेल्या बर्फाच्या मोठया तुकड्यांतून त्यांना वाट काढायची होती. या गर्दीतून वाट बनविणें अनेक आठवड्याचें व कष्टाचें काम होतें.

पण त्यांनीं कमर असून कामास सुरवात केली. कांहीं ठिकाणीं त्यांनीं पुढें जाण्यासाठीं वाटेंतील बर्फ फोडून काढलें, तर दुसऱ्या कांहीं ठिकाणीं बर्फांतून बोगदे करून वाट बनविली. अशा कठीण मार्गावरून मारवाह-कांनीं ओझीं वाहून नेलीं. एवढे अचाट श्रम केल्याचें उदाहरण गिर्यारोहणाच्या इतिहासांत दुसरें नाहीं. २२००० फुटांवर त्यांनीं जो दहावा तळ बनविला, तो म्हणजे बर्फांत पोखरून तयार केलेली एक गुहाच होती. गुहेंत जाण्यासाठीं एक लहानसें प्रवेशद्वार ठेवलें होतें. त्यांतून थंडगार वारे आंत येत होते. पण अशा कठोर वातावरणाची त्यांना संवय झाली होती.

चोवीस हजार फुटांवर गेल्यावर, त्याच्यापुढचा पृष्ठभाग चढून जाण्यास फारसा कठीण नसल्याचें त्यांना दिसून आलें, व शिखरावर पोंचण्याची त्यांची आशा बळावत चालली. पण कांचनजंगानें आतां दुसरें एक अस्त्र त्यांच्यावर उगारलें. आकाश काळयाकुट्ट ढगांनीं भरून गेलें आणि हिमवर्षावास जोरानें सुरवात झाली. त्या तळावर ते दोन दिवस अडकून राहिले. जवळचें अन्न संपून गेलें, व पुढें जाण्याला अनुकूल हवामान मिळेना. अशा परिस्थितींत त्यांनीं माघार घेण्याचें ठरविलें. हिमवर्षाव चालूच होता, व थंडी तीव्र होती. त्यामुळें आठ दिवसाच्या कष्टमय चालीनंतर, ते कसेबसे पायथ्याच्या तळाशीं आले.

दुसऱ्या वर्षीं प्रोफेसर डायरेन फर्थ याच्या नेतृत्वाखालीं कांहीं निवडक युरोपीय गिर्यारोहकांनीं कांचनजंगावर चढण्याचा प्रयत्न केला. प्रख्यात इंग्लिश गिर्यारोहक फ्रँक स्माइद हा त्या पथकांत होता. वायव्य दिशेकडील डोंगरांच्या कण्यावरून कांचनजंगेवर हल्ला करण्याचें त्यांनीं ठरविलें. पण त्या मार्गानें शिखरावर जाणें अशक्य आहे, हें त्यांना अनुभवान्ति कळून आलें. त्या मार्गावर असलेले कळसासारखे खडकांचे सुळके कमजोर व अस्थिर होते. जरा जोरानें हालचाल केली कीं ते हालत. वरच्या बाजूला

तंबू ठोकण्यासाठीं पुरेशी सपाट जागा नव्हती. तसेंच डोंगराचा आडोसा नसल्यामुळें त्या मार्गावर तुफान वारा वाहत होता. एके दिवशीं रात्रीं अचानकपणें मोठें हिमवादळ झालें. बोगद्यांतून जाणाऱ्या आगगाडीप्रमाणें वादळाचा आवाज मोठ्यानें होत होता. तंबू फाटून व उडून जाण्याची भीति क्षणोक्षणीं वाटत होती. रात्रभर थैमान घातल्यावर सकाळीं वारा शांत झाला.

कांचनजंगा पर्वताची घडण इतकी कठीण आहे कीं, अनुभवी गिर्यारोहकांनीं आपल्या कौशल्याची व मेहनतीची कमाल मर्यादा गांठली तरी सुद्धां त्यांना कांचनजंगावरून परत फिरावें लागलें. “ कांचनजंगावर चढून जाण्याचा प्रयत्न करणाऱ्याला आशावादी म्हटले पाहिजे,” असें पाउल बाऊअरनें लिहून ठेविलें आहे. पण तो स्वतःच आशावादी होता. कारण १९२९ च्या खडतर अनुभवानंतरही, दोन वर्षांनीं पुन्हा एकवार कांचनजंगावर चढाई करण्यासाठीं तो एक पथक घेऊन आला. त्यांनीं पहिल्या मोहिमेंत बनविलेले मार्ग नाहीसे झाले होते. पण पर्वताच्या घडणीची माहिती झालेली असल्यानें, त्यांनीं जोरांत कामास सुरवात केली. सूर्याच्या उष्णतेमुळें दुपारीं बर्फ वितळून बर्फाचे मोठे खडे व दगडगोटे डोंगराच्या वरच्या बाजूवरून खालीं कोसळून येत. म्हणून ते पहाटे उठून सकाळी दहा वाजेपर्यंतच काम करीत. त्यावेळेंस सुद्धा मधून मधून मोठमोठे दगड गडगडत येऊन, खालच्या दरींत आपटून, त्यांच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होत. लढाईंत शत्रूच्या तोफखान्याकडून येणाऱ्या गोळ्यांच्या वर्षावाखाली काम करणाऱ्या सैनिकाप्रमाणें त्यांची अवस्था होती. पण बाउअरच्या मतें, अशा परिस्थितींत डोकें शांत ठेवून, कोसळणाऱ्या दगडांच्या आवाजाकडे लक्ष देऊन, ते कुठल्या बाजूला पडणार याचा तर्क करून, योग्य ती हालचाल केली म्हणजें, अशा शीलावर्षावांतूनही स्वतःला निभावून नेतां येतें. अर्थात् युद्धांतील सैनिकाप्रमाणें नशिबाचीही साथ पाहिजे.

दगडांच्या मार्यांतून पायर्‍या खोदीत वर गेल्यावर, त्यांच्यापुढें मोठमोठे सुळके आड आले होते. त्यांतील बर्फ कुदळीनें फोडून, त्यांनीं मार्ग काढण्यास सुरवात केली. पण इतका वेळ त्यांना सोबत करणार्‍या नशिबानें आतां दगा दिला. शॅलर नांवाचा एक प्रसिद्ध व अनुभवी गिर्यारोहक व त्याच्या मागें पासंग नांवाचा एक भारवाहक असे दोघे कमरेला दोर बांधून, बर्फाच्या एका उंचवट्याच्या बाजूनें मार्ग काढण्याकरितां पुढें गेले. त्यांच्या कमरेला बांधलेल्या दोराचें टोक दुसर्‍या एका भारवाहकाजवळ होतें, व त्यानें तें खडकाच्या एका टोकावर व्यवस्थित गुंडाळून हातांत धरलें होतें. तेवढ्यांत, कांहीं एक सूचना न मिळतां, पासंग हिमाच्या ओहोळांतून घसरतांना दिसला. त्याच्या हिसक्यामुळें शॅलरचा तोल जाऊन, तोही त्याच्या मागोमाग घसरून पडला. उभ्या असलेल्या भारवाहकानें प्रसंगवधान राखून खडकावरची दोरी दुहेरी केली. पण ते दोघे जोरांत आदळल्यामुळें त्यांच्या वजनाचा ताण सहन न होऊन दोरी तुटली, आणि भीतियुक्त किंकाळ्या फोडून, ते दोघे क्षणार्धांत खालीं कोसळून दिसेनासे झाले. तें दृश्य पाहून इतर गिर्यारोहकांना व भारवाहकांना धक्का बसला. पण पाउल बाउअरनें त्यांच्या अंगांत पुन्हा अवसान आणून, वर जाण्याचें काम चालू ठेविलें.

दहाबारा दिवस मेहेनत करून, ते २५६०० फुटांपर्यंत जाऊन पोहोचले. पण तेथें त्यांची प्रगति खुंटली. त्यांच्यापुढच्या उभ्या चढणीवर भुकटीसारखें दीड फूट खोलीचें हिम पसरलें होते. त्या हिमांत पाय ठरत नव्हता. हिमप्रपाताची फार भीति होती. त्यापुढें जाणें म्हणजे जीव संकटांत घालणें, हें त्यांना कळून चुकलें. म्हणून त्यांनीं तेथून माघार घेतली. इतक्या तयारीनें येऊन, चाळीस दिवस परिश्रम करून, प्रत्येक फूट मोठ्या मेहनतीनें व कौशल्यानें चढत जाऊन, अखेर निराशाच त्यांच्या पदरीं आली. त्यांना यश मिळालें नाहीं. पण आपल्या शक्तीची, काटकपणाची, व कौशल्याची कमाल केल्याचें समाधान त्यांना मिळालें.

जर्मन गिर्यारोहकांच्या प्रोत्साहनानें व उदाहरणानें, भारवाहकांनींही कांचन-जंगावर अजब कामगिरी केली. पाउल बाउअरच्या पथकाचें उदाहरण डोळ्यापुढें ठेवून, कांचनजंगावर कबजा करण्याची महत्त्वाकांक्षा मनांत बाळगून, गिर्यारोहकांची आणखी पथकें यापुढें चढाई करण्यास येतील. परंतु गिर्यारोहणाच्या कलेंत आमूलाग्र प्रगति झाल्याशिवाय, कांचनजंगाच्या माथ्यावर मनुष्याचा पाय पडणें शक्य दिसत नाहीं.



# नंदादेवी : : १२

नंदादेवीचें शिखर हिमालयाच्या मध्यभागीं गढवाल विभागांत आहे. त्याची उंची २५६४५ फूट असून, तें हिंदुस्तानांतील अत्युच्च शिखर आहे. एरिक शिप्टननें एक लहानशी टोळी घेऊन या शिखराच्या परिसरांत भूमिशोधन करण्याकरितां पांच महिने जें भ्रमण केलें, त्याची, त्यानें वर्णिलेली हकिगत चित्तवेधक आहे. नंदादेवीच्या पायथ्याच्या प्रदेशांत, जेथें कोणत्याही मनुष्यानें पाय ठेवला नव्हता, तेथें धाडसानें मार्ग काढून शिप्टन, आणि टिलमन यांनीं मार्गशोधन व पाहणी केली. त्यांचा उद्देश इतर मोहिमांप्रमाणें शिखर चढून जाण्याचा नव्हता. ज्या प्रदेशांत, जवळपासच्या भागांतील धनगरांचासुद्धां अद्यापपर्यंत शिरकाव झाला नव्हता, व जेथील सृष्टि-सौंदर्य अजून माणसाच्या नजरेस पडलें नव्हतें, अशा प्रदेशांत मनमुराद हिंडावें, दऱ्याखोरीं पालथीं घालावी, व साधल्यास छोटी शिखरें चढून जावी असा त्यांचा हेतु होता.

नंदादेवीच्या चारी बाजूला उंच व कठीण पर्वतांची रांग आहे. या या पर्वतांनीं वेष्टिलेल्या भागाला नंदादेवीचा गाभारा असें नांव युरोपीय गिर्यारोहकांनीं दिलें आहे. ज्या पर्वतांच्या भिंतींनीं हा गाभारा बनलेला आहे, त्यांची उंची सतरा हजार फुटांपेक्षां कोठेही कमी नाहीं. नंदादेवीच्या

पायथ्याशीं उगम पावणारीं जी एकच नदी आहे, तिचें नांव ऋषिगंगा. तिचा प्रवाह, या पर्वतांच्या रांगेमधील एका चिंचोळ्या दरींतून बाहेर येतो. त्या दरींतील ऋषिगंगेच्या पात्राच्या बाजूचेकडे हजारों फूट उभेच्या उभे गेलेले आहेत. त्यामुळें नंदादेवीच्या गाभाऱ्यांत जाण्यास, ऋषिगंगेच्या पात्रांतून सहजासहजीं मार्ग मिळत नाहीं. सन १८८३ मध्यें ग्रॅहम नांवाच्या गिर्यारोहकानें ऋषिगंगेच्या घळींतून नंदादेवीच्या गाभाऱ्यांत जाण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. त्यानंतरच्या पन्नास वर्षांच्या काळांत लॉंगस्टाफ, जनरल ब्रूस, रटलज, सॉमरव्हेल वगैरे नामवंत गिर्यारोहकांनीं निरनिराळ्या बाजूंनीं या गाभाऱ्यांत प्रवेश करण्याचा प्रयत्न केला. पण नंदादेवीची तटबंदी अभेद्य असल्यानें त्या कुणाला यश आलें नाहीं, व सन १९३४ पर्यंत नंदादेवीच्या पायथ्याच्या भूभागाचें दर्शन एकाही माणसाला घडलें नाहीं. नंदादेवीचें डौलदार शुभ्र शिखर, दूरवरून अनेक गिर्यारोहकांना दिसत होतें. परंतु त्याच्या पायथ्यापर्यंत जाण्याची वाट न सांपडल्यानें, नंदादेवी अजिंक्य आहे असें सर्वांना वाटत होतें.

१९३४ च्या उन्हाळ्यांत एरिक शिप्टन व टिलमन ही हौशी गिर्यारोहकांची जोडी हिंदुस्थानांत आली. १९३३ च्या एव्हरेस्ट मोहिमेंतील दुभाषा कर्मा पॉल यास त्यांनीं आधीं कळवून, तीन दमदार व विश्वासू भारवाहक निवडून त्यांना कलकत्त्यास पाठविण्यास सांगितलें होतें. १९३३ च्या मोहिमेंतील दोन ‘वाघ’ अंग्थार्की आणि पासंग, व तिसरा एक शेर्पा कुसंग, असे तिघे भारवाहक त्यांना येऊन मिळाले. या तिघा भारवाहकांनीं त्या गिर्यारोहकांच्याबरोबर रानावनांत, व उन्हापावसांत, पायपिटी करून, शेवटपर्यंत त्यांची इमानानें नोकरी केली. गिर्यारोहकांबरोबर अनेक महिने प्रवास केल्यानें त्या भारवाहकांमध्येंही भूमिशोधनाची आवड पुढें निर्माण झाली. जेथें गिर्यारोहक कंटाळून व निराश होऊन जात, तेथें हे भारवाहक बर्फांत व जंगलांत पुढें जाऊन, वाट शोधून काढीत. त्यांनीं

केवळ भारवाहकांचेंच काम न करितां, गिर्यारोहक, सोबती, स्वैपाकी, हुजऱ्या, दुभाषा अशा अनेक भूमिका करून, गिर्यारोहकांना सहाय्य केलें. एरिक शिप्टननें शेर्पा भारवाहकांविषयीं म्हटलें आहे, "या इमानी साथीदारांच्या मदतीनेंच, एव्हरेस्टच्या शिखरावर चढून जाण्याची गिर्यारोहकांना आशा वाटते. त्यांच्या मदतीखेरीज एव्हरेस्टचें शिखर गांठणें कदापि शक्य होणार नाहीं."

विंचवाचें बिऱ्हाड पाठीवर, या म्हणीप्रमाणें त्यांच्याजवळ जें कांहीं सामान होतें, तें त्यांच्या पाठीवरील पिशव्यांत होतें. सामान वाहून नेण्याकरितां त्यांनीं खेचरें घेतली नव्हती. तसेंच प्रत्येकाचें सामानही अगदीं बेताचें ठेवलें होतें. जास्त सामान व लवाजमा घेतल्यानें पथकाची प्रगति मंद होते, आणि आयत्या वेळेस बेत बदलून, पाहिजे तशा हालचाली करतां येत नाहींत, म्हणून त्यांनीं पाठीवर नेतां येईल तेवढें सामान नेऊन, अगदीं सुटसुटीत प्रवास करण्याचें ठरविलें होतें. टिनमधील खाद्यपेयें बरोबर घेतल्यानें वजन वाढतें, म्हणून तीं न घेतां, त्यांनीं त्या प्रदेशांत मिळतील तीं खाद्यधान्यें व फळभाजा खाऊन दिवस काढले. ते सर्वजण आळीपाळीनें स्वैपाक करीत. त्यांचे व भारवाहकांचें खाणें एकच होतें. फक्त फरक एवढाच होता, कीं गिर्यारोहक आपल्या अन्नांत तिखट घालून देत नसत. कारण पाश्चिमात्यांचें व मिरच्यांचें अगदी वावडें आहे.

अल्मोरा जिल्ह्यांतील राणीखेत या थंड हवेच्या ठिकाणाहून दिनांक ९ मे रोजीं निघून, हिमालयाच्या शोभिवंत खोऱ्यांतून वाट चालीत, ते दहा दिवसांनीं जोशीमठला जाऊन पोहोंचले. बद्रीनाथला जाणाऱ्या यात्रेकरूंच्या रस्त्यावर असलेलें जोशीमठ हें गांव प्रसिद्ध आहे. उन्हाळ्यांत जेव्हां हिंदुस्थानांतून हजारो यात्रेकरू, गंगोत्री, जम्नोत्री, बद्रीनाथ अशा हिमालयांतील पवित्र क्षेत्रीं जातात, तेव्हां या गांवांत खूप गर्दी असते. विक्रीचा 'सीझन' असल्यामुळें दुकानदारांची गडबड उडालेली असते. तरणे, म्हातारे, श्रीमंत

व गरीब, अशा सर्व तऱ्हेच्या यात्रेकरूंच्या गर्दीत, एका भिक्षापात्राच्या आधारावर केदारनाथापासून कन्याकुमारीपर्यंत प्रवास करणारे गोसावीही असतात. जोशीमठ येथें शिप्टन व टिलमन यांनीं पुढच्या प्रवासाकरितां आटा व सातू खरीदले, व ते वाहून नेण्याकरितां कांहीं आणखी भारवाहक बरोबर घेतले.

जोशीमठहून सकाळीं निघून, ते ढवळी नदीच्या खोऱ्यांतून जाऊं लागले. पहाटे थोडा पाऊस पडला होता. पावसानें धुऊन गेलेल्या हवेंत, देवदार वृक्षांचा सुगंध दरवळत होता. हिमशिखरांच्या मागून, उगवत्या सूर्याचे किरण जसजसे वर येऊं लागले तसतसे दाट वृक्षानें भरलेल्या त्या दरीत उजाडूं लागलें. जणूं काय, इतका वेळ झोपलेली उषाराणी अरुणाची चाहूल लागून, डोळे किलकिले करून पाहूं लागली. झाडांवर व गवतावर दवाच्या थेंबानीं नक्षी काढली होती. पक्षी सुमधुर आवाज काढून वाटसरूंचें स्वागत करीत होतें. अशा सुप्रभातीं, हिमालयांतील रमणीय प्रदेशांतून चालतांना त्या सर्वांच्या चित्तवृत्ति उल्हसित झाल्या होत्या व पाठीवरची ओझी हलकी वाटत होती. पण थोड्याच अवकाशांत तें आल्हाददायक खोरें मागे टाकून, ते सहा हजार फूट उंचीचा लता नांवाचा डोंगर चढूं लागले. वाट नसलेल्या त्या डोंगरावर काट्याकुट्यांतून व खडकांतून मार्ग काढीत शिखर माथ्यावर जाऊन, त्यांनीं पुढें असलेल्या ऋषिगंगेच्या खोऱ्याची पाहणी केली, व आपला पुढला मार्ग निश्चित केला. सूर्यास्ताच्या आंत खालीं उतरून, ढवळी नदीच्या स्वच्छ पाण्यांत स्नान करून त्यांनीं श्रमपरिहार केला.

वाटेंत त्यांना डोंगरांच्या माथ्यावर वसलेली छोटी छोटी खेडीं लागत होतीं. हिमालयांतील अशा छोट्या खेड्यांतील लोकांचें जीवन अगदी स्वावलंबी असतें. खेड्याच्याजवळच डोंगराच्या उतरणीवर पायऱ्यासारखीं चिंचोळीं शेतें असतात. त्यांत पिकविलेलें धान्य ते वर्षभर पुरवून खातात. खेड्यांतील मुलें उन्हाळ्याच्या दिवसांत मेंढरांना उंचीवरच्या प्रदेशांत

चारण्यासाठीं नेतात. मेंढरांच्या लोकरीचा धागा बनविण्याचें काम पुरुष लोक करितात, व त्यांच्या बायका हातमागावर त्या लोकरीच्या धाग्याचें कापड विणतात. मधून मधून, फेरीवाले व्यापारी खेड्यावर येतात. त्यांच्याकडून धान्याच्या मोबदल्यांत सुया, साबण, तंबाखू, गुळ वगैरे जिनसा ते विकत घेतात. त्यांचा एवढाच संबंध बाह्य जगाशीं येतो.

लवकरच शिप्टनचें छोटें पथक ऋषिगंगेच्या घळीपाशीं येऊन पोहोंचलें. तेथें नदीच्या दोन्ही बाजूस, आठ हजार फूट उंचीचे भिंतीसारखे कडे होते. खालून नदी दिसत नव्हती, पण नदीचा खळखळाट मोठ्यानें ऐकूं येत होता. नदीच्या उत्तर बाजूनें चालत जाऊन ते रमणी नाला व ऋषिगंगा यांच्या संगमापाशीं व घळीच्या पायथ्याशीं जाऊन पोहोंचले. तेथें त्यांनीं तळ ठोकला, व तीन शेर्पा भारवाहकांखेरीज बाकीच्या भारवाहकांना पगार देऊन परत पाठवून दिले. तळापासून त्या उंच घळीचा देखावा भयानक दिसत होता. काळ्याभिन्न खडकांचे सुळके उंचवर गेले होते. नदीच्या पात्रांत वरून पडलेले मोठमोठे दगड होते. झाडांचे ओंडके आडवेतिडवे पसरले होते. पात्राच्या आजूबाजूला कुठे मोकळी जागा दिसत नव्हती. परंतु, घळींतून मार्ग काढायचा शक्य तितका प्रयत्न करायचा, अशा निश्चयानें ते आलें असल्यानें, त्यांनीं वाट शोधून काढण्याच्या कामास सुरवात केली. टिलमन व एक भारवाहक नदीच्या एका किनाऱ्यानें, आणि शिप्टन व दुसरा एक भारवाहक दुसऱ्या किनाऱ्यानें, नंदादेवीच्या तटबंदींत कोठें खिंडार दिसतें कां, तें पाहण्याकरितां निघाले. त्यांना कित्येक ठिकाणीं खडकाच्या पुढें आलेल्या अरुंद पट्टीवरून चालत जाण्याची कसरत करावी लागली. खडकांत उगवणाऱ्या झुडपाला आधारासाठीं धरावें, तों कधीकधी ते उपटून हातांत येई. खालीं त्यांना झेलण्यासाठीं घळीचा जबडा पसरलेला होता. एखाद्या वाटेनें कांहीं वेळ पुढें जावें, पण पुढें खडक आडवा आल्यानें ती वाट सोडून देऊन, पुन्हां दुसऱ्या बाजूनें जाण्याचा प्रयत्न करावा, असें

त्यांना बरेच वेळा करावें लागलें. त्यांच्याजवळ एक महिन्याचा शिधा होता. तो असल्या कठीण वाटेवरून एका खेपेस नेता येणें शक्य नव्हतें. म्हणून, एका मुक्कामाहून दुसऱ्या मुक्कामावर सामान वाहून नेण्याकरितां त्यांना अनेक खेपा कराव्या लागल्या. पण त्याचा एक फायदा झाला. त्यांची वाट त्यांच्या चांगली लक्षांत राहिली. त्यामुळें नंदादेवीहून परत येतांना त्यांना कांहीं त्रास झाला नाहीं. जातांना वाट शोधण्यासाठीं त्यांना जेथें अर्धा अर्धा दिवस लागला, तें अंतर परत येतांना ते एकदोन तासांत चालून आले.

वाट शोधण्याचें त्यांचें काम कांहीं दिवस चालू होतें. अखेर त्या घळींतून वाट मिळण्याची आशा जवळजवळ नाहींशी झाली होती. तेवढ्यांत टिलमनला एक छोटीशी खिंड आढळली. तेथून ओझीं वाहून नेणें धोक्याचें व कष्टाचें होतें. पण त्यांनीं खडकांत मेखा रोवून, भारवाहकांना हातानें धरण्यासाठीं दोर बांधला. त्या मार्गानें ते पुढें गेले. पण पुन्हा त्यांची प्रगति खुंटली, म्हणून नदीच्या दुसऱ्या तीरावरून जाता येते कां, ते पाहायचें त्यांनीं ठरविलें. मधून मधून हिमवर्षाव होत होता. गोळा केलेली ओली लाकडें खडकाच्या आडोशाला कशीबशी पेटवून त्यांनीं शेकोटी केली व ऊब घेतली. नदी ओलांडून जाणें म्हणजे संकटच होतें, कारण पाण्याला फार वेग होता. बर्फप्रवाहापासून उगम पावलेलें तें पाणी अतिशय थंड होतें. कमरेला दोर बांधून, शिप्टन पाण्यांत उतरून बर्फकुदळीनें पाण्याची खोली चांचपत पुढें जाऊं लागला. हळूहळू पाणी त्याच्या कमरेपर्यंत आलें. पाण्याचा वेग इतका होता कीं, त्यानें पाय उचलला कीं तो एकदम प्रवाहाच्या दिशेनें ढकलला जाई. म्हणून पाय न उचलितां, तो तसाच खुरडत जाऊं लागला. प्रवाहाबरोबर वाहणारे खडेगोटे त्याच्या उघड्या पायांवर मारा करीत होते. पण थंडीमुळें पाय बधिर झाल्यानें त्या खड्यांचा मारा कळेनासा झाला. शक्य तितक्या लवकर पैलतीरावर जाऊन, त्यानें कमरेचा दोर झाडाला बांधला. खड्यांच्या माऱ्यामुळें त्याचे पाय रक्तबंबाळ झाले

होते. त्याच्यामागून दोराला धरून पाण्यांतून एकेक, दोनदोन खेपा करून सर्वांनीं ओझीं पैलतीरावर नेलीं. एका भारवाहकाची उंची कमी असल्यानें तो छातीपर्यंत पाण्यांत बुडून, वाहून जायच्या पंथाला आला होता. पण दोरावरची त्याची पकड मजबूत असल्यामुळें व जवळच्यानें आयत्या वेळेस धरल्यामुळें तो वांचला.

नदी ओलांडल्यावर त्यांनीं खडकांची कसून पाहणी केली. पण त्या बाजूनें मार्ग न सांपडल्यामुळें, पुन्हा उत्तरेकडील तीरावर जायचें त्यांनीं ठरविलें. नदीच्या पात्रांतून जाण्याचें टाळण्याकरितां त्यांनीं अर्धा दिवस खपून, नदीच्या पात्रांतील मोठ्या दगडावर झाडांचे ओंडके टाकून एक कच्चा पूल तयार केला, व त्यावरून ते पलीकडे गेले. तिकडे गेल्यावर त्यांच्या प्रयत्नास यश येऊन त्यांना मार्ग सांपडला, आणि त्या साडेतीन मैल लांबीच्या घळींतून बाहेर पडून, ते नंदादेवीच्या गाभाऱ्यांत शिरले. या यशानें त्यांना अर्थातच मोठा आनंद झाला, व नंदादेवीच्या खोऱ्यांत ते दुप्पट उत्साहानें काम करूं लागले.

यापुढील तीन आठवडे, त्यांनीं नंदादेवीच्या पायथ्याच्या खोऱ्यांतील बर्फप्रवाह, पर्वतांच्या रांगा, वगैरे शोधण्यांत आणि कागदावर त्यांची आंखणी व मांडणी करून, नकाशावर त्यांना स्थान देण्यांत खर्च केले. रोज पहाटे चारपांच वाजतां कडक थंडींत उठून ते बाहेर पडत, व दुपारच्या सुमारास हिमाचें वादळ सुरू होण्यापूर्वी मुक्कामावर परत येत. त्यांच्यापूर्वी तेथें कोणीही गेलेले नसल्यानें सर्व नवेंच होतें, व भूशोधनाला भरपूर वाव होता. जागोजागीं निर्मळ पाण्यांनीं भरलेले जलाशय, व त्यांत दिसणारीं हिमशिखरांचीं प्रतिबिंबें, गवताचीं कुरणें, लहान धबधबे वगैरे दृश्यें पाहून त्यांच्या डोळ्यांचें पारणें फिटलें. त्यांना रानटी मेंढरांचे कळप भेटले. त्या मेंढरांनीं मनुष्यप्राणी कधींही पाहिलेला नसल्यामुळें, ती न भिता टक लावून गिर्यारोहकांच्याकडे बघत, आणि नंतर लांबलांब उड्या मारीत

कडेपठारावरून दिसेनाशीं होत. शिप्टन व त्याचे साथीदार यांनीं खोऱ्यांच्या उत्तर भागांत मनमुराद हिंडून पाहणी केली. बरोबरीचा शिधा संपत आल्यानें व पावसाळ्यास सुरवात झाल्यानें, ते ऋषिगंगेच्या घळींतून परत फिरले. परत येतांना त्यांना पावसाचा मार खावा लागला. मनुष्यवस्ती सोडून जवळजवळ एक महिना झाल्यामुळें प्रत्येकाचा अवतार, वाढलेली दाढी, थंडीवाऱ्यानें सोलवटलेलें अंग, व फाटके कपडे असा झाला होता. ऋषिगंगेच्या घळींतून बाहेर पडल्यावर, त्यांना तेथें जवळच वस्तीला असलेल्या धनगरांनीं जेव्हां प्रथम पाहिले, तेव्हां 'ही कोण भुतें आहेत कीं काय ?' असें वाटून ते दूर पळाले.

गिर्यारोहकांनीं, त्यानंतरचे दोन महिने, बद्रीनाथ, गंगोत्री, व केदारनाथ या पवित्र स्थळांमधील पहाडांतून प्रवास करण्यांत घालविले. त्या ठिकाणीं पावसाचा जोर नसेल, अशी त्यांची कल्पना होती. पण ती चुकीची ठरली. निर्जन अशा प्रदेशांतून परत मनुष्यवस्तींत येईपर्यंत, त्यांना कित्येक दिवसरात्रीं पावसाच्या माऱ्यांत उघड्यावर काढाव्या लागल्या. बद्रीनाथजवळच्या प्रदेशांत एका खिंडींत खूप बर्फ असल्यामुळें त्यांना पुढें जातां येईना. म्हणून दिशा बदलून ते दुसरीकडे गेले. जंगलांतून व काट्यांतून मार्ग काढीत, नद्या ओलांडीत, पावसानें भिजलेल्या कपड्यांत कुडकुडत, ते अखेर केदारनाथ रस्त्यावरील एका खेड्यापाशीं आले. त्यांच्या भ्रमणांत त्यांची अस्वलाशी गांठ पडली होती. जवळचा शिधा संपल्यानें त्यांना कांहीं दिवस बांबूचे कोंब व कंदमुळें खाऊन अर्धपोटी राहावें लागलें होतें. या त्यांच्या हालअपेष्टांत, तिघे शेर्पा भारवाहक त्यांना एकनिष्ठ राहिले, एवढेंच नव्हे तर मार्ग शोधण्यांत, नदीवर पूल बनविण्यांत व इतर हरेक गोष्टींत त्यांनींही गिर्यारोहकांच्या बरोबरीनें भाग घेतला.

सप्टेंबरच्या सुरवातीला, नवी शिधासामुग्री घेऊन पुन्हां त्यांनीं ऋषिगंगेच्या मार्गानें नंदादेवीच्या खोऱ्यांत प्रवेश केला. वर्षाऋतूंत

पावसाची झोड झाली होती, तरी सुदैवानें त्यांच्या वाटेवर कांहीं पडझड झाली नव्हती. त्यांना आतां वाट नीट माहीत असल्यामुळें, ते ऋषिगंगेच्या दरींतून लवकर पार झाले. यावेळेस त्यांनीं नंदादेवीच्या खोऱ्यांतील दक्षिण भागाचें संशोधन केलें. हवा चांगली असल्यानें, मोजणी करण्याचें काम त्यांना उत्तम रितीनें करतां आलें. शिप्टननें अंग्थार्की व कुसंग यांच्यासह मैकतोली नांवाच्या २२३२० फूट उंचीच्या शिखरावर चढाई केली. त्यांना शिखरावर फार वेळ थांबता आलें नाहीं; कारण तेथील वारा एव्हरेस्टप्रमाणें, अतिशय थंड व झोंबणारा होता. डोंगरमाथ्यावरून त्यांना कामेट, बद्रीनाथ, द्रोणागिरी वगैरे परिचित शिखरें तर दिसलीच; परंतु नेपाळमधील अपरिचित शिखरसमूहांनींही त्यांचें लक्ष वेधलें.

शिप्टन-टिलमनच्या या भ्रमणानंतर दोन वर्षांनीं म्हणजे सन १९३६ च्या ऑगस्ट महिन्यांत, ब्रिटिश व अमेरिकन गिर्यारोहकांचें एक पथक, नंदादेवीवर मोहीम करण्यासाठीं आलें. त्यांत शिप्टन, टिलमन, व ओडेल होते. त्यांनीं शेर्पा भारवाहकांच्या जोडीला जवळच्या खेड्यांतून कांहीं भारवाहक घेतले होते. ऋषिगंगेच्या अलीकडील रमणी नदीला खूप पाणी आलें होतें. त्यांच्याबरोबरील कांहीं भारवाहकांना, नदीपार करणें धोक्याचें वाटल्यानें, त्यांनीं तेथूनच पोबारा केला. शेर्पा व भुतिया जातीचे भारवाहक मात्र कुठल्याही अडचणीला न जुमानता त्यांच्याबरोबर पुढें गेले. नंदादेवीच्या पायथ्याशीं गेल्यावर, शिरस्त्याप्रमाणें एकामागून एक तळ बनवीत ते वर गेले. त्यांना हिमवादळाचा खूप त्रास झाला. कांहीं शेर्पा भारवाहक आजारी पडल्यामुळें, गिर्यारोहकांनीं एकदोन ठिकाणीं स्वतः ओझीं वाहून नेलीं. अखेर, सात आठवड्यांच्या परिश्रमानंतर त्यांना शिखरावर पोंचण्यांत यश मिळालें. त्याला आतां बारा वर्षे झालेलीं आहेत, पण ज्यावर माणसानें कबजा केलेला आहे, असें सर्वांत उंच शिखर अजूनही नंदादेवीचेंच आहे.

## नंगापर्वताशीं झगडणारे शूर पण दुर्दैवी जर्मन गिर्यारोहक : : १३

जर्मन लोकांना काश्मीरमधील २६६०० फूट उंचीच्या नंगापर्वत शिखराबद्दल सदैव आपलेपणा वाटेल. कारण, त्या पर्वतावर सन १९३४ व सन १९३७ मध्यें ज्या जर्मन मोहिमा झाल्या, त्यांतील कांहीं शूर जर्मन गिर्यारोहक तेथें पंचमहाभूतांशी झगडतां झगडतां हिमतीर्थी पडलेले आहेत. नंगापर्वताची उंची एव्हरेस्टपेक्षां साधारणपणें तीन हजार फूट कमी असली, तरी त्याची घडण भव्य आहे. त्याच्या बाजूचे कडे उभे असल्यामुळें चढण कठीण आहे. शिवाय या पर्वतावर हिमप्रपात वारंवार होत असतात. अशा प्रबळ शत्रूशीं सामना खेळण्यासाठीं, सन १९३४ मध्यें मेर्कल नांवाच्या एका पटाइत गिर्यारोहकाच्या नेतृत्वाखालीं एक जर्मन पथक हिंदुस्थानांत आलें. साधनसामुग्री व निवडक भारवाहक बरोबर घेऊन, ते श्रीनगरहून निघून नंगापर्वताच्या पायथ्याशी जाऊन पोहोंचले. राखिओत नांवाचा बर्फप्रवाह तुडवीत जाऊन, त्यांनीं १२००० फुटांवर पायऱ्याचा तळ बनविला. तळ बनविण्यांत व सामान लावण्यांत दिवसभर खूप दगदग होत होती, तरीही ते उत्साही होते. सूर्योदयाच्या सुमारास, तेजानें तळपत असलेल्या

नंगापर्वताचें चित्तवेधक दृश्य दिसूं लागे. तें पाहून त्यांचीं अंतःकरणें जास्तच उल्हसित होत. असें दृश्य पाहायला मिळाल्याबद्दल ते स्वतःला भाग्यवान समजत होते.

या पथकांत पुढील गिर्यारोहक होते. आशेन ब्रेन्नर, बेकटोल्ड, ड्रेक्सेल, स्नायडर, वेल्त्सेनबाख, वीलांड, आणि नेता मेर्कल. या खेरीज बर्नार्ड नांवाचा एक डॉक्टर व मुल्लरिट्टर हा छायाचित्रकार, हेही या पथकांत सामील होते. एका तळावरून दुसऱ्या तळावर संदेश पाठविण्यासाठीं बिनतारी संदेश वाहकाची सोय त्यांच्याजवळ होती. परंतु त्या यंत्रानें बरोबर काम दिलें नाहीं. जूनच्या सुरवातीस त्यांनीं चढाईला सुरवात केली. वाटेत हिमांतील खड्डयांचे अडथळे फार येत होते. कांहीं खड्डयांची खोली शंभरदोनशे फूट होती. शक्य असेल तेथें ते खड्डा टाकून जात. नाहीं तेथें, त्या खड्डयांवर हिम पडल्यामुळें जे पूल बनत, त्यावरून जावें लागे. हे हिमाचे पूल माणसाच्या वजनानें ढासळण्याची फार भीति असते. अशा वेळेस एक मनुष्य कमरेला दोर बांधून पुढें जातो. पूल ढासळून तो खड्डयांत पडला, तर त्याला काढतां यावे म्हणून बाकीचे दोरी घट्ट ताणून धरतात.

तिसऱ्या तळावर असतांना ड्रेक्सेलची प्रकृति बिघडली, म्हणून त्याला खालीं नेण्यांत आलें. त्याची प्रकृति क्षीण झाली होती, तरी त्याचा उत्साह दांडगा होता. "लवकरच मी वर येऊन चवथ्या तळावर तुम्हाला भेटेन," जातांजातां त्यानें आपल्या सोबत्यांना आश्वासन दिलें. परंतु त्याची प्रकृति जास्तच बिघडत गेली, व तो तापानें बेभान झाला. बेकटोल्डनें हातांत हिम घेऊन त्याच्या कपाळावर घासलें. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. डॉक्टर बर्नार्ड खालच्या तळाहून वर आला. ड्रेक्सेलला पाहिल्याबरोबरच त्यानें सांगितलें, "त्याला न्युमोनिया झाला आहे व त्याची अवस्था फार खराब झाली आहे." ताबडतोब ऑक्सिजनची व्यवस्था करण्यांत आली. पण त्याचा उपयोग न होतां, संध्याकाळच्या सुमारास ड्रेक्सेलनें

जगाला रामराम ठोकला. वरच्या तळावर जासूद पाठवून, ही बातमी कळविण्यांत आली. सर्वजण पायथ्याच्या तळावर आले. तळाजवळील एका लहानशा टेकडीवर त्याला मूठमाती देण्यांत आली. त्यावर दीपमाळे सारखे दगड रचून, एक क्रॉस ठेवण्यांत आला. मृतवीराच्या ध्येयनिष्ठा, शौर्य इत्यादि गुणांची प्रशंसा करून, "त्याच्या उदाहरणानें आपणांस सदैव स्फूर्ति मिळो" अशी आशा मेर्कलनें व्यक्त केली. डेत्सेलच्या मृत्यूनें ते एका खंद्या गिर्यारोहकाला मुकले एवढेंच नव्हे, तर त्यांच्या चढाईतील एक मौल्यवान दिवस फुकट गेला. शेवटच्या चढाईला एक दिवस उशीर झाल्यानें, यशाचें पारडें वर जाऊन, त्यांच्यावर केवढें अनर्थ ओढवले, तें आपणास पुढें दिसून येईलच.

ता. २५ जूनला सर्वजण चवथ्या तळावर जाऊन पोहोचले. हा तळ मुख्य शिखराच्या मार्गावरील राखिओत नांवाच्या उपशिखराच्या पायथ्याशी होता. हिमालयाच्या एकंदर कीर्तीच्या मानानें हवामान अद्यापपर्यंत बरें होतें. पण दुसऱ्या दिवशीं घनदाट धुक्यामुळें त्यांना पुढील तळावर जातां आलें नाहीं. पुढचा मार्ग कठीण होता. भारवाहकांना ओझीं घेऊन चढणें शक्य व्हावें म्हणून, खडकांत पोलादी मेखा ठोकून त्यांना दोर बांधणें अवश्य होतें. बर्फांत पायऱ्या खणण्याचीही आवश्यकता होती.

"जेवढें झेपेल त्यापेक्षां जास्त ताण देऊं नका," डॉक्टर बर्नार्डनें त्यांना बजाविलें, "आणि कितीही पुढें गेलांत, तरी परत येण्याकरितां शक्ति राखून ठेवा." पण गिर्यारोहकांची दृष्टि व ध्यान नंगा पर्वताच्या शिखराकडे लागल्यामुळें या उपदेशाकडे त्यांचें दुर्लक्ष झालें. राखिओतवर चढून जायला त्यांना कित्येक दिवस लागले. हाताच्या बोटांनीं खडबडीत खडक पकडून, पायऱ्या खोदीत, मेखा ठोकीत, ते हळू हळू चढत होते. त्या सर्वांमध्यें वेलत्सेनबाख कमालीचें श्रम करीत होता. हात गारठून जाण्याची पर्वा न करितां, हातमोजे काढून, तो खोदण्याचें काम एकसारखें करीत होता. सहांशें

फूट उंचीच्या कड्यावरून दोराच्या कठड्यानें चढून, ते सर्वजण २३३०० फुटांवरील सातव्या तळावर जाऊन पोहोंचले. तेथें थंडी मी म्हणत होती. सूर्य ढगाआड गेला होता, व खालच्या दऱ्यांतून धुकें वर येत होतें. पण थोड्याच अवकाशांत ढग बाजूला होऊन स्वच्छ ऊन पडलें. त्यांचें लक्ष शिखराकडे आणि वाटेंतील सिल्व्हर सॅडल्च्या पठाराकडे गेलें. त्यापुढील सरळ व दिसायला सोपी अशी चढण पाहून, ते खुष झाले, आणि शिखरावर जाण्याची त्यांची आशा बळावली. त्या ठिकाणाहून त्यांना मौंट गॉडविन् ऑस्टेन ( K 2 ) या शिखराचा देखावा उत्तम दिसत होता. तो पाहण्यांत ते थकवा व थंडी कांहीं काळ विसरून गेले.

दुसऱ्या दिवशीं वीलांड व वेल्त्सेनबाख यांनीं पायऱ्या खोदण्याचें काम पुन्हा चालू केलें. खालीं गुळगुळीत बर्फ व दोन्ही बाजूला, पाहिल्यास डोळे फिरतील असें खोल जाणारे कंड, अशा कण्यावरून त्यांची वाट होती. ते सर्व कसलेले गिर्यारोहक असल्यामुळें, असल्या भीतिदायक कण्यावरून जायला त्यांना गंमतच वाटली असती. परंतु विरळ हवेंत पायऱ्या खोदण्याचें श्रम एकसारखें करावें लागल्यानें, ते थकून जात होते. सूर्याच्या प्रखर किरणांमुळें पाठ भाजून निघत होती. दिवसभर मेहेनत केल्यावर, त्यांनीं तळावर येऊन विश्रांति घेण्याचा प्रयत्न केला. पण तीव्र थंडीमुळें त्यांना पुरेशी झोंप मिळाली नाहीं. सकाळीं दोन भारवाहक फार आजारी असल्याचें दिसून आलें.

" कुणीतरी त्यांना नीट सांभाळून खालीं नेलें पाहिजे, " मेर्कल म्हणाला, " नाहींतर ते सुखरूप पोचायचे नाहींत. त्यांच्यांत अगदींच त्राण नाहीं. "

गिर्यारोहक एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले. आतां भारवाहकांबरोबर खालीं जाणें, म्हणजे शिखरावर चढाई करण्याची संधि गमावण्यासारखें होतें. इतक्या परिश्रमानंतर जवळ आलेली ही संधि दवडूं नये, असें

प्रत्येकाला साहजिकच वाटत होतें. त्या ठिकाणाहून वर असलेलें सिल्व्हर सॅडल्चें पठार अगदी जवळ दिसत होतें. अखेर, कुणीतरी पुढें व्हायला पाहिजे, असा विचार करून बेकटोल्डनें भारवाहकांबरोबर जाण्याचें कबूल केलें. सर्वांशीं हस्तांदोलन करून, तो खालीं जाऊं लागला. मनांतील निराशा दाबून टाकून त्यानें त्यांना यश चिंतिलें. त्याला काय कल्पना कीं, त्याला खाली धाडण्यांत मृत्यूच्या जबड्यांतून त्याला वांचविण्याचा दैवाचा हेतु होता !

क्षीण झाल्यामुळें जिवाला कंटाळलेल्या त्या दोघा भारवाहकांना घेऊन, बेकटोल्ड उतरत होता. मधून मधून ओरडून, तो त्या दोघांना उत्तेजन व सूचना देत होता. मेखांना बांधलेल्या दोरांना धरून उतरतांना एक भारवाहक घसरला. परंतु दुसऱ्यानें त्याला ताबडतोब धरल्यामुळें तो वांचला. या प्रसंगाने ते दोघे अधिकच गलितधैर्य झाले. त्यांना खालच्या तळाबर नेण्याची जबाबदारी बेकटोल्डची होती. आपला स्वतःचा थकवा बिसरून तो त्यांना जवळ जवळ ढकलीत नेत होता.

‘ आतां नाहीं पुढें जाता येत ’, असें म्हणत एक भारवाहक खालीं बसला.

‘ ऊठ उभा राहा, ’ बेकटोल्डनें सांगितलें.

‘ मला उठवत नाहीं ’ तो पुटपुटला. उत्तर द्यायलासुद्धा त्याच्या अंगांत बळ नव्हतें.

‘ आतां अगदीं थोडें राहिलें. ऊठ. ऐकलस कां ? ’ बेकटोल्डनें जोर करून त्याला उचलून उभे केले. तेव्हां तो हळूहळू पावलें टाकूं लागला.

एका मिनिटानंतर दुसऱ्या भारवाहकानें बैठक मारिली. पण बेकटोल्टनें दोन शब्द सांगितल्यावर त्यानेंही अंगांत बळ आणून उठून पाऊल टाकिलें. असें करीत करीत ते एकदाचें चवथ्या तळावर जाऊन पोहों-चले. बेकटोल्डनें बर्नार्ड व मुल्लरिट्टर यांना हांका मारिल्या.

“ कायरे फ्रिझ् ! ” मुल्लरिट्टरनें बाहेर येऊन विचारलें.

" या भारवाहकांना सांभाळ. मी ठीक आहे. "

त्या दोघांनीं भारवाहकांना घाईघाईनें तंबूत नेलें. खालीं आडवे झाल्याबरोबर त्यांना गुंगी आली. त्यानंतर ते एक दोन दिवस बेशुद्ध होते. त्यांचे हात पाय गारठून हिमदग्ध होऊं नयेत, म्हणून गिर्यारोहक एकसारखें हिमानें चोळत होते.

तंबूतील उबदार हवेंत बसून गरम पेय प्यायल्यानंतर बेकटोल्डला हुशारी आली. " वरचे गिर्यारोहक आज सिल्व्हर सॅडल् वर गेले असतील. उद्यां ते शिखरावर जातील. हवा अगदीं पाहिजे तशी आहे, " त्यानें बर्नार्ड व मुल्लरिट्टर यांस माहिती दिली.

पण मनुष्य ठरवितो एक, आणि दैवाच्या मनांत दुसरेंच असतें. " हवा अगदीं पाहिजे तशी आहे, " असें बेकटोल्डनें म्हटलें होतें, तें खरें होतें. पण ते त्या दिवसापुरतेंच खरें होतें. वरचे गिर्यारोहक मोठ्या खुशीत सिल्व्हर सॅडल्वर चढून गेले होते. थोडा वेळ विश्रांति घ्यावी असा विचार करून, आडोशाला बसून, त्यांनीं सिगरेट्स पेटविल्या. अचानकपणें, अगदीं कल्पना नसताना, शांत दिसणाऱ्या निळ्या आकाशांत जोराचें वादळ सुरू झालें. वादळाचा जोर वाढूं लागल्यानें तेथेंच मुक्काम करायचें ठरवून, त्यांनीं घाईघाईनें २४६०० फुटांवर तंबू उभारिले. रात्रभर वाऱ्याचा धुमाकूळ चालू होता. मध्यरात्रीं, एक तंबू वाऱ्याच्या जोरानें उखडून निघाला. जवळ जवळ तासभर परिश्रम करून त्यांनीं तो परत उभा केला. सकाळीं वादळ शांत होईल, आणि अखेरची चढाई करून नंगापर्वतावर आपण जर्मनीचें स्वास्तिक चिन्हांकित निशाण लावूं, अशी आशा त्यांना वाटत होती. म्हणून त्यांनीं पाठीवर नेण्याच्या पिशव्या व इतर सामान जय्यत तयार ठेवलें होतें. पण दुसऱ्या दिवशींही वादळाचें रौद्रस्वरूप कमी झालें नाहीं. वाऱ्याबरोबर हिमाचे लोट उधळत होते. त्यामुळें खग्रास सूर्यग्रहण असल्यासारखा अंधार झाला होता. त्या वादळांत स्वैपाक करणें अत्यंत

कठीण झालें. कूकर्स काम देईनात. कसेंबसें शिजविलेलें अर्धकच्चें अन्न त्यांनीं बळेंच तोंडांत कोंबले व हिमानें तोंडें ओलीं केली.

त्यानंतरच्या दिवशीं म्हणजे जुलैच्या आठ तारखेलाही वादळाचें थैमान चालूंच राहिलें. हवेचा एकंदर रागरंग, व गिर्यारोहक आणि भारवाहक यांच्या तब्येती ध्यानांत घेऊन, शिखरावर जाण्याचा विचार सोडून देऊन, खालीं परत फिरण्याचा निर्णय मेर्कलनें घेतला. आणखी एकदोन दिवस असाच टिकाव धरून, शिखरावर जाण्याची संधि मिळत असल्यास सोडूं नये, असें एकदोघा गिर्यारोहकांना वाटत होतें. परंतु भारवाहकांच्या अवस्थेकडे लक्ष देऊन, सर्वांनीं मेर्कलचें म्हणणें खुषीनें मान्य केलें.

तुफान वाऱ्यांत आठव्या तळावरील तंबू उखडून, त्यांच्या घड्या करून व आवश्यक सामान बरोबर घेऊन, पराभूत सैन्याप्रमाणें त्या सर्वांनीं खालीं उतरण्यास सुरवात केली. रशियाच्या स्वारीहून माघार घेऊन येणाऱ्या नेपोलिअनच्या सैन्याचें जसें हाल झालें, तसेंच या पथकाचें झालें. वर जाताना ते मनानें व शरीरानें दमदार होते. परंतु अनेक दिवसांच्या श्रमांमुळें, व उंचीवर दिवस काढल्यानें, परत येतांना ते शरीरानें थकून गेलें होतें. ध्येय साध्य न झाल्यानें, मनाचा हुरूपही कमी झाला होता. आतां त्याच्यापुढें एकच ध्येय होतें. शक्य तितक्या लवकर खालचा तळ गांठायचा. परंतु तेंच त्यांना जमलें नाहीं. इतक्या वर येण्याची धिटाई केल्याबद्दल त्यांना पूरेपूर शासन करायचें, नंगा पर्वतानें ठरविलें होतें !

आशेन ब्रेन्नर व स्नायडर तिघा भारवाहकांना घेऊन पुढें निघाले. मेर्कल, वेल्त्सेनबाख व वीलांड, राहिलेल्या भारवाहकांना घेऊन मागून येत होते. वादळ चालूंच होतें. हिम उधळत असल्यानें, दहा गजापलीकडचें दिसत नव्हतें. त्यामुळें कित्येक वेळां वाट चुकून भलतीकडे गेल्यानें, त्यांना परत येऊन दुसऱ्या मार्गानें जावें लागत होतें. निदान भारवाहकांना तरी वाट शोधण्यांत होणारी पायपिटी करावी लागूं नये म्हणून, आशेन ब्रेन्नर व

स्नायडर यांनीं त्यांना, व भारवाहकांना ज्या दोरांनीं बांधले होते, तो सोडून टाकला. दोर सोडल्यावर त्यांनीं भारवाहकांना बजाविलें, "आमच्या मागोमाग चला. नाहींतर धुक्यांत वाट चुकून भलतीकडेच जाल. आम्ही जरा दिसनासे झालों कीं, तावडतोब ओरडून हांका मारा. समजलात ?"

"होय साहेब."

"चला तर एकामागून एक."

ते सर्व पुढें चालूं लागले. सहावा व पांचवा तळ टाकून ते पुढें आले. आशेन ब्रेन्नरनें सहज मागे वळून पाहिले व तो ओरडला, "भारवाहक कुठें आहेत ?"

"कांहीं वेळांपूर्वीच मी त्यांना पाहिले होते. एवढ्यांत भलतीकडे गेले कीं काय ?"

"ओऽऽय्. ओऽऽय्," ते ओरडले. पण कांहीं उत्तर आलें नाहीं. "त्यांना शोधून काढणें आतां या हवेंत शक्य नाहीं," आशेन ब्रेन्नर म्हणाला, "कदाचित् मागून येणारी मेर्कलची टोळी त्यांना गांठेल."

ते पुढें चालूं लागले. चढाई सुरूं केल्यापासून त्यांनीं दाढया केल्या नव्हत्या. त्यांच्या वाढलेल्या दाढ्यांना झुंबरासारखें हिम चिकटलें होतें. बुटाला हिम चिकटत आहे; प्रत्येक पाऊल मोठा जोर करून उचलून टाकावें लागत आहे; श्वासोच्छ्वास जोरानें होत आहे; मधून मधून दम खाण्याकरितां कुदळीच्या आधारानें उभे राहिले असतां, वाऱ्याचा मारा चुकविण्यासाठीं मान खालीं घालावी लागत आहे. जास्त वेळ थांबून उपयोग नाहीं; पुढें गेलेंच पाहिजे. त्यांची हालचाल आतां यंत्राप्रमाणें होत आहे. शरीरें लाकडाच्या ओंडक्यासारखी झालीं आहेत. त्यावर कशाचाही परिणाम भासत नाहीं. आहे. ते एकमेकांशीं बोलत नाहींत. अंगांत उरलेली सर्व शक्ति, एकेक पाऊल टाकण्याकरितां वापरली पाहिजे. एकमेकांच्या हालचाली व मनांतील विचार बोलल्याशिवाय त्यांना अचूक कळत आहेत.

सायंकाळीं सातच्या सुमारास, ते दोघे चौथ्या तळावर जाऊन पोहों-चले. आंत गेल्याबरोबर त्यांनीं धरणीवर अंग टाकलें. "हा घ्या गरम चहा", बेकडोल्ड म्हणाला.

" काय, गरम चहा ? अहाहा ! यावेळेस चहा मला अमृतासमान आहे. तूं अगदीं देवदूत आहेस बघ, फ्रिझ् ", स्नायडर म्हणाला.

" आम्ही शिखर न गांठताच परतलों, " आशेन ब्रेन्नर म्हणाला.

" अगदीं थोडें राहिलें होतें. पण नंगापर्वतानें वायवास्त्र सोडून आम्हाला तेथून एक इंचही पुढें जाऊं दिलें नाहीं ", स्नायडरनें खुलासा केला.

" बाकीच्यांची काय हालहवाल आहे ? " मुल्लरिट्टरनें विचारिलें.

" ते मागून येत आहेत. आतां येतीलच इतक्यांत. वीलांडचें लक्षण मात्र ठीक दिसत नाहीं. "

मागून येणाऱ्या लोकांसाठीं त्यांनीं आणखी चहा बनविला. पण कोणीही आलें नाहीं. चहा थंड झाला. मिनिटें गेलीं. तास झाले. संध्या-प्रकाश लोपून अंधार झाला. त्यांनीं तंबूच्या बाहेर डोकी काढून हांका मारिल्या. पण त्या हांका, त्यांच्याशिवाय कोणाला ऐकूं गेल्या नाहींत.

मागून येणाऱ्या गिर्यारोहकांपैकीं कोणीही परत आलें नाहीं. पांच भारवाहक कसेंबसें चवथ्या तळावर येऊन पोहोंचले. बाकीचे तिघे, अंगांतील त्राण नाहींसें झाल्यामुळें, उतरत असतानांच मरण पावले. न परतलेल्या गिर्या-रोहकांची काय गत झाली, तें भारवाहकांकडून मिळालेल्या त्रोटक माहितीवरून समजतें.

मागून येणाऱ्या टोळींतील गिर्यारोहकांची प्रकृति खराब झाल्यानें त्यांना सिल्व्हरसॅडल् पठारावरून उतरायला वेळ लागला. वीलांडची तब्येत फार बिघडली होती. त्याला सांभाळून घेऊन जायचें, म्हणजे हळूहळू चालल्याशिवाय इलाज नव्हता. मेर्कलची प्रकृति उत्तम होती, म्हणून तो

झरझर उतरून जाऊं शकला असता. पण सोबत्यांना मागें टाकून स्वत: पुढें जाणें त्याला योग्य वाटत नव्हतें. खऱ्या नेत्याप्रमाणें, त्यानें पथकांतील शेवटच्या माणसांबरोबर येण्याचें ठरविलें, आणि हें उदात्त कर्तव्य अखेरपर्यंत पाळलें. सातव्या तळावर जाण्यापूर्वीच अंधार पडला. त्यामुळें त्यांना २३००० फुटांवर रात्रीं उघड्यावर मुक्काम करावा लागला. त्यांची ती रात्र कशी गेली असेल, याची कल्पनाच करावी. त्यांतून, त्यांच्याजवळ पुरेशा झोपण्याच्या पिशव्या नव्हत्या; एक कमी होती. बिचाऱ्या वेल्त्सेनबाखनें पिशवीशिवाय झोपण्याचें पत्करिलें. गोठलेल्या हिमाची उशी करून, तो ताडपत्रीवर झोपला. त्या रात्रीं, थंडीनें काकडून एक भारवाहक मेला, आणि मेर्कलचा उजवा हात व वीलांडचे दोन्ही हात हिमदग्ध झाले.

पहाट झाल्यावर ते कसेबसे उठले. जड झालेल्या शरीरांत हालचाल आणण्याचे प्रयत्न करून, ते चालूं लागले. सातवा तळ दिसूं लागला. तेथें कांहींतरी खायला प्यायला मिळेल, अशी आशा त्यांना वाटूं लागली. पण तळाच्या सहा गज अलीकडेच, वीलांड हिमांत खालीं बसला. तो पुन्हा कधींही उठला नाहीं. आजारपण, श्रम, थंडी व उपासमार यांच्याशी प्रतिकार करण्याचें त्राण त्याच्याजवळ उरलें नव्हतें. मेर्कल व वेल्त्सेनबाख सातव्या तळावर पोहोंचले. चार भारवाहक पुढें उतरून चालूं लागले. पण वादळाच्या जोरामुळें ते सहावा तळ गाठूं शकले नाहींत, आणि त्यांना बर्फांत गुहा खोदून, त्यांत रात्र काढावी लागली.

पुढें एक दोन दिवस वादळ चालूंच राहिलें. वरच्या तळावरील लोकांना मदत देण्याकरितां चवथ्या तळावरील गिर्यारोहक वर येण्याचा प्रयत्न करीत होते. पण हिम कमरेइतकें खोल असल्यानें, त्यांचे प्रयत्न निष्फळ झाले. ता. १२ मे रोजीं आशेन ब्रेन्नर, स्नायडर व मुल्लरिट्टर हे तिघे, चवथ्या तळाहून निघून मोठ्या परिश्रमानंतर पांचव्या तळापर्यंत जाऊन पोहोंचले.

तेवढें अंतर चालायला त्यांना सहा तास लागले. वादळानें पुन्हा जोर केल्यानें त्यांना आणखी वर जातां आलें नाहीं.

त्या रात्रीं सातव्या तळावर, वेलत्सेनबाखला निद्रिस्त स्थितींतच मृत्यू आला. आतां गिर्यारोहकांपैकीं एकटा मेर्कल उरला होता. त्याच्याबरोबर ' गेले ' व ' अंग्त्सेरिंग ' या नांवाचे दोन भारवाहक सातव्यां तळावर होते. थंडी व उपासमार यांनीं ते सर्वजण बेजार झाले होते. त्यांची प्रतिकारशक्ति असामान्य होती, म्हणूनच ते अद्यापपर्यंत टिकाव धरून राहिले होते. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मेर्कल त्या दोघा भारवाहकांच्या आधारानें सहाव्या तळावर जाण्यासाठीं खुरडत उतरूं लागला. पण, क्षीण झाल्यामुळें त्याला पुढें जावबेना. त्यानें वाटेंतच बर्फाची गुहा करून त्यांत मुक्काम करण्याचें ठरविलें. त्याच्या-बरोबरच्या दोघा भारवाहकांची तब्येत इतकी खराब नव्हती; दोघांच्याही अंगात पुढें जाण्याची शक्ति होती. पण भारवाहक ' गेले ' यानें, आपल्यापेक्षां लहान असलेल्या अंग्त्सेरिंगला पुढें चालावयास सांगून, स्वतः आपल्या धन्याबरोबर तेथेंच राहावयाचें ठरविलें. धन्य त्याची ! खालीं उतरून स्वतःचे प्राण वांचविण्याची संधि असतांही, धन्याशी एकनिष्ठ राहण्यासाठीं त्यानें जो संपूर्ण स्वार्थत्याग दाखविला, त्यामुळें त्याचें नांव गिर्यारोहणाच्या इतिहासांत अजरामर राहील.

अंग्त्सेरिंग एकटा पुढें चालूं लागला. तशा तुफान वादळांत, स्वतः मार्ग काढीत तो चवथ्या तळावर जाऊन पोहोंचला. चवथ्या तळावरील गिर्यारोहकांची एकसारखी तगमग चालू होती. वरच्या तळांवरील गिर्या-रोहक संकटांत सांपडले आहेत, व त्यांना मदतीची अत्यंत जरूरी आहे, हें माहित असतांही त्यांना कांहीं करतां येईना. त्यांनीं वर जाण्याचे पराकाष्ठेचे प्रयत्न केले. पण नव्यानें पडणाऱ्या हिमांत ते कमरेइतके बुडत असल्यामुळें त्यांना वरती जाणें अशक्य झालें. निष्ठुर दैव आपल्या सोबत्यांना वांच-

विण्यासाठीं आपणांस जाऊं देत नाहीं, या विचारानें त्यांच्या अंतःकरणाला केवढ्या यातना झाल्या असतील !

त्या दिवशीं सायंकाळीं वादळाचा जोर कमी झाला, आणि पर्वतावर शांतता पसरली. चवथ्या तळावरील लोक एकमेकांकडे पहात अजूनही वरच्यापैकीं कुणी खालीं येईल, अशी आशा करीत बसले होते. तेवढ्यांत मुल्लरिट्टरनें बाहेर आवाज ऐकला, म्हणून सर्वजण बाहेर धांवले. त्यांना आवाज ऐकूं येत होता, पण शब्द कळत नव्हते. ते संध्याप्रकाशांत डोळे ताणून वर बघूं लागले.

" ते पहा वरतून कुणीतरी येत आहे, " बेकग्रोल्डनें दूरवर बोट दाखवून म्हटलें.

" छे तो तर खडक आहे. "

" नाहीं, खडक नाहीं. कुणीतरी हात हालवीत आहे. "

त्यांनीं दुर्बिणींतून पाहिलें. " कोण आहे, मेर्कल् कां गेले ? " परंतु कोण आहे, तें त्यांना ओळखतां आलें नाहीं. तेवढ्यांत ती आकृति दिसेनाशी झाली. त्यानंतर कांहीं आवाज आला नाहीं. नंगापर्वतावर अंधार आणि शांतता पसरली.

वादळ तसेंच चालूं राहिलें. त्यामुळें, वर जाण्याचा विचार सोडून द्यावा लागला. जुलैच्या अखेरीस तंबू आवरून, आपले चार सोबती व सहा इमानी भारवाहक यांची आठवण करीत, ते परत फिरले. नंगापर्वताच्या 'गांवीही' नव्हते. धुक्याचें उपरणें पांघरून तो संभावितपणे उभा होता.

१९३४ सालच्या या कटु अनुभवानंतरही, जर्मनांनीं नंगापर्वताचा नाद सोडला नाहीं. सन १९३७ मध्यें पाऊल बाउअरनें नंगा पर्वतावर चढाई करण्यासाठीं दुसरें एक पथक धाडण्याची तयारी केली. एखाद्या कार्यांत अपयश आलें, सर्वस्वाहुति करावी लागली, तरी सुद्धां, त्यानें

खचून न जातां, पुन्हां आव्हान देऊं आखाड्यांत उभें राहण्याची ही जी वृत्ति आहे, ती खरोखरच आपल्याला दिपवून टाकते. दुर्दैवानें, याही मोहिमेंत मोठा अनर्थ घडला, आणि पथकांतील एक गिर्यारोहक व कांहीं भारवाहक, जे खालच्या तळावर होते, त्यांच्याशिवाय सर्वजण प्राणास मुकले. शिखरावर चढाई चालू असतां, प्रचंड हिमप्रपात होऊन, वरच्या तळावरील तंबूत झोपलेलें सर्वजण [ सात गिर्यारोहक व नऊ भारवाहक ] अनेक फूट बर्फाखालीं गाडले गेले. गिर्यारोहणाच्या इतिहासांतील हा सर्वांत मोठा अपघात होय, असें म्हणतात. अपघातानंतर कांहीं दिवसांनीं, पंधरा फूट उंचीच्या बर्फाच्या ढिगाऱ्यांतून त्या गिर्यारोहकांचीं प्रेतें उकरून काढण्यांत आलीं, तेव्हां त्यांनीं लिहिलेल्या दैनंदिन्या मिळाल्या. त्यांतील लिखाणाच्या आधारावर, पाउल बाउअरनें या मोहिमेच्या हकिगतीचें पुस्तक लिहिलें. या मोहिमेचें नेतृत्व कार्ल वीनकडे होतें. या पथकांत हार्टमन हेप, गोट्टनर वगैरे गिर्यारोहक होते. जर्मन लोक जहाल देशभक्त आहेत, हें प्रसिद्धच आहे. नंगापर्वत किंवा तत्सम कठीण पर्वतावर चढून अचाट कामें करून दाखविण्यांत, “ आम्हीं जर्मन काय प्रतीचें लोक आहोंत व आम्हीं काय करूं शकतों, ” हें जगाला दाखवावें असें त्यांना वाटतें. जर्मन गिर्यारोहक ‘ मारूं किंवा मरूं ’ अशा निष्ठेनें पर्वतावर तुटून पडतात, हें १९३४ च्या जर्मन मोहिमेच्या हकिगतीवरून आपल्याला दिसून आलेंच आहे हार्टमनची एकंदर परिस्थिति या मोहिमेंत त्यानें भाग घेऊं नये अशी होती. पूर्वी एकदां गिर्यारोहण करीत असतां त्याच्या दोन्ही पायाचीं बोटें हिमदग्ध झाल्यामुळें कापून टाकलेलीं होतीं. त्याचें आवडीचें शास्त्रीय संशोधन चालूं होतें. तें सोडून या मोहिमेंत त्याला भाग घ्यायला लावणारी अशी कोणची प्रेरक शक्ति होती ? श्रीनगरहून निघाल्याच्या दिवशीं, त्यानें आपल्या दैनंदिनींत एका जर्मन कवीच्या पुढील ओळी उद्धृत करून, या प्रश्नाचें उत्तर दिलें होतें.

Let cold and pain do what they will,
One binding oath I will fulfil
Which burns like firebrands,
Through sword and heart and hands—
Whate'er Fate may decree,
Germany, I stand by thee !

१९३४ च्या पथकांपैकीं पीटर मुल्लरिट्टर हा एकटाच या पथकांत होता. नंगापर्वतावरील त्याच्या अनुभवाचा व माहितीचा या पथकास चांगला उपयोग झाला. त्यांच्याबरोबर बारा अनुभवी शेर्पा भारवाहक होते. काश्मीरच्या निसर्गरमणीय खोऱ्यांतून वाट चालत, बंडीपुरा, पशावारी, बुरझिलखिंड, अॅस्टर व बुंजी या मार्गानें ते नंगापर्वताच्या पायथ्याशीं जाऊन पोहोंचले. बुंजी येथें त्यांनीं बाल्टिस्थानांतील बाल्टी नांवाचे कांहीं लोक भारवाहक म्हणून घेतले.

त्यांनीं ता. २२ मेला चढाईला सुरवात केली. त्या दिवशीं ते १९३४ च्या पायथ्याच्या तळावर जाऊन पोहोंचले. जवळच्या टाटो नांवाच्या खेड्यांतील एक मुसलमान मौलवी त्यांना तेथें येऊन भेटला. नंगापर्वतावर एक मोठा राक्षस राहात असल्याचें त्यानें सांगितलें. त्या राक्षसाच्या अंगांत एवढी शक्ति होती कीं, कानाची पाळी हलवून तो वादळ निर्माण करूं शकत होता. तथापि पथकावर राक्षसानें कृपादृष्टि ठेवावी, यासाठीं अल्ला-जवळ आपण प्रार्थना करूं, असें आश्वासन त्या मौलवीनें दिलें. दुसऱ्या तळावर पोचल्यावरच त्यांना हिमप्रपाताची चुणुक मिळाली. ते सर्वजण सामान खोलून व्यवस्थित ठेवीत होते. तेवढ्यांत, वरतून कांहींतरी तुटल्याचा व आपटल्याचा मोठा आवाज आला. थोड्या सेकंदांतच, ते उभे होते त्या दिशेनें एक बर्फाचा लोट वहात आला. एका फटकाऱ्यांत माणसें, तंबू व सामान जमीनदोस्त झालें. पण बर्फ वाहण्याचें लगेच थांबलें, व बर्फाच्या

ढिगामधून सर्वजण धडपडत उठले. त्या प्रसंगाची सर्वांना गंमत वाटली, आणि एकमेकांची चेष्टा करून, ते हसूं लागले. भारवाहकसुद्धां हसण्यांत सामील झाले. या बर्फाच्या लोंढ्यामुळें, दोन तंबू वाहून गेले होते, तंबूच्या कांहीं काठ्या तुटल्या होत्या, व सर्व सामान अस्ताव्यस्त झालें होतें. अर्ध्या तासांत त्यांनीं पुन्हा आवरासावर करून तंबू उभारले.

मे अखेरपर्यंत त्यांनीं वर जाण्याचे अनेक प्रयत्न केले, पण हिम एकसारखें पडत असल्यानें, व हवा प्रतिकूल असल्यानें, त्यांना तिसऱ्या तळापर्यंत जातां आलें नाहीं. थोडी विश्रांति घेण्यासाठीं सर्वजण पायथ्याच्या तळावर परत आले. संध्याकाळीं त्यांनीं सर्पण जमवून मोठी शेकोटी केली, व तिच्याशीं बसून, गिर्यारोहकांनीं, आणि भारवाहकांनीं आपापल्या भाषेंत गाणी म्हटलीं. एक दोन दिवसांच्या विश्रांतीनंतर त्यांनीं पुन्हां वर चढण्यास सुरवात केली. लुफ्ट नांवाच्या गिर्यारोहकानें पायथ्याच्या तळावरच राहून, वर शिधासामुग्री पाठविण्याचा बंदोबस्त करावा, असें ठरलें. दैवाची त्याच्यावर मर्जी होती, असें दिसतें, कारण, पायथ्यापाशीं राहिल्यानें, पथकावर ओढवलेल्या अनर्थापासून तो वांचला.

ताज्या दमाचे भारवाहक व शिधा घेऊन, त्यानें एका आठवड्यानंतर चवथ्या तळावर जावें असा आदेश त्याला मिळाला होता.

हवा हळूहळू अनिश्चित् होऊं लागली होती. पहाटे दूरवरची शिखरें स्वच्छ दिसत. पण थोड्या अवकाशांतच ढगांमुळें कांहीं दिसेनासें होई. खालच्या तळांवरसुद्धां खूप हिम पडत होतें. जेव्हां संधि मिळेल तेव्हां जवळच्या टेकडीवर जाऊन, लुफ्ट टेलेस्कोपच्या सहाय्यानें वरच्या तळांवरील हालचाल पाही. भुसभुशीत हिमांतून चढून जाणें, गिर्यारोहक व भारवाहक यांना किती कठीण होत होतें हें त्याला दिसत होतें.

मोहिमेची यापुढील हकीगत हार्टमन, वीन, फेफ्फर वगैरेंच्या, त्यांच्या मृत्यूनंतर मिळालेल्या दैनंदिन्यांवरूनच कळतें. वरच्या तळावरील थंडी

वाढत होती. ता. १० जूनला पारा शून्याखालीं वीस अंश गेला होता. तीव्र थंडी व हिमवर्षाव यामुळें त्यांची प्रगति खुंटली होती. ता. १२ जून रोजीं, कसेंही करून पांचव्या तळावर जायचेच, असें ॲडि गुंथर व इतर दोघे यांनीं ठरविलें. भुसभुशीत हिमांत पाय आपटून वाट बनवायचें काम श्रमाचें होतें. म्हणून त्यांनीं "तीस पावलांची" पद्धत अंमलात आणली. पुढें असणाऱ्यानें तीस पावलें चालून गेल्यावर, बाजूला हिमांत पडायचें व रांगेच्या शेवटून चालू लागायचें. त्याच्या मागच्या माणसानें तीस पावलें टाकल्यावर तसेंच करायचें. म्हणजे, सर्वांना सारखे श्रम होतात. ता. १२ जून रोजीं फेफरनें आपल्या रोजनिशींत लिहिलें, "आजचा दिवस निराशांनीं भरलेला होता. पण आज आमच्याकडून प्रयत्नांची शिकस्त झाली. आम्ही आमच्या शक्तीचा प्रत्येक औंस उपयोगांत आणला. अशा कठीण दिवशींच, आमच्या अंगांतील सुप्तबळ उपयोगांत येतें, आम्हाला आमच्या शक्तीच्या मर्यादा समजून येतात, आणि यश मिळविण्याचा निश्चय दुणावतो."

ता. १३ जून रोजीं रविवार होता. त्या दिवशीं चवथ्या तळावर वीनच्या हुकुमाप्रमाणें सर्वांनीं विश्रांति घेतली. हिमाचें वादळ चालूं राहिल्यानें त्यांना बाहेर पडतां आलें नाहीं. त्यादिवशींच्या दैनंदिनींत, "हवा सुधारून आम्ही शिखरावर पोहोंचूं, अशी अजूनही आम्हाला दृढ आशा आहे," असें एका गिर्यारोहकानें लिहिलें होतें. या पथकाला मदत करण्यास लेफ्टेनंट स्मार्ट नांवाच्या एका ब्रिटिश अधिकाऱ्याची नेमणूक झाली होती. तो चवथ्या तळापर्यंत गेला होता. ता. १४ जून रोजीं, थकलेल्या बाल्टी भारवाहकांना घेऊन तो खालच्या तळावर गेला. चवथ्या तळावरील जर्मन गिर्यारोहकांचा निरोप घेतांना, हे सर्वजण आतां आपल्याला पुन्हां जिवंत दिसणार नाहींत, अशी कल्पनासुद्धां त्याला आली नसेल.

ता. १४ जून ,या दिवसाची हकिगत सर्वांनीं आपापल्या दैनंदिनींत लिहून ठेविली होती. दैनंदिनी लिहिण्याचा तो त्यांचा शेवटचा दिवस. त्या रात्रींच सर्वांनीं नंगापर्वतावर हिमसमाधि घेतली. दैनंदिनी लिहिल्यापासून केवळ कांहीं तासानंतर घडलेल्या या घटनेच्या पार्श्वभूमींत, ता. १४ जूनच्या दैनंदिनींतील त्यांचें लिखाण अत्यंत हृदयस्पर्शी वाटतें. एका गिर्यारोहकानें लिहिलें होतें, "दुपारी हवा ठीक होती असा हा पहिलाच दिवस. धुकें नाहींसें होऊन वरच्या शिखराचा उत्तम देखावा दिसूं लागला. चवथ्या तळावर प्रथमच आज आम्ही उन्हांत बसलों. आमचा उत्साह साहजिकच वाढला आहे. आतां हवा सुधारेल असा रंग दिसत आहे. उद्या पांचवा तळ बनविला जाईल. त्यानंतर शिखरावरील शेवटची चढाई होईल, आणि बहुतेक हार्टमनूच्या वाढदिवशीं म्हणजे ता. २२ जूनला, आम्ही नंगापर्वताचा कबजा करूं. दूरवरील पर्वतांच्या रांगांच्यामागे सूर्य अस्तास जातांना, जो मनोहर देखावा दिसत होता, तो पाहाण्यांत मी व गुंथर गर्क झालों होतों. निसर्गाचें हें वैभव पाहायला मिळत आहे, त्याबद्दल माझें अंतःकरण कृतज्ञतेनें भरून गेलें आहे. अंधार पडूं लागल्यावर, मी तंबूंत येऊन दैनंदिनी लिहायला बसलों आहे."

पूर्वी ठरल्याप्रमाणें, ता. १८ जून रोजीं, नुकतींच आलेलीं पत्रें व अन्न घेऊन, लुफ्ट भारवाहकांसमवेत खालच्या तळाहून वर चवथ्या तळाकडे जात होता. भारवाहक मंद गतीनें चालले होते. पण मित्रांची गांठ लवकर पडावी, व त्यांना आलेलीं पत्रें लवकर नेऊन द्यावीत म्हणून लुफ्ट एकटा जोरांत पुढें गेला. त्याची दृष्टी वर लागली होती. राखिओत शिखराजवळ पांचवा तळ, किंवा पावलानें हिमांत बनलेला मार्ग, कुठें दिसतो कां, हें तो डोळ्यांना ताण देऊन पाहात होता. आतां थोड्याच वेळांत आपले सोबती भेटतील, असें त्याला वाटत होतें. अत्योत्कंठित वृत्तीनें, धांपा टाकीत तो चवथ्या तळाच्या जागेवर जाऊन पोहोंचला. पण तेथें

त्याला काय दिसलें ? सर्वत्र सामसुम ! तळावरील वस्तीच्या खाणाखुणा कोठे दिसनात. त्यानें चोहोबाजूला वळून पाहिलें. हळूहळू तेथें घडलेली दुःखदायक घटना त्याच्या ध्यानांत आली. तो ज्या ठिकाणीं उभा होता त्या ठिकाणीं, मोठा हिमप्रपात होऊन, जवळ जवळ पंधरा एकर जागा बर्फाच्या ढिगानें व्यापून टाकली होती. त्याखालीं सबंध तळ गाडला गेला होता. लुफ्टबरोबर वरती येण्यास निघालेले भारवाहक थोड्याच वेळांत तेथें येऊन पोहोंचले. चवथ्या तळाची जागा तीच होती, असें त्यांनीं सांगितलें. तळाच्या खाणाखुणा मिळण्याकरितां, त्यांनीं आजूबाजूला पाहण्यास सुरवात केली. कांहीं फूट उतरून गेल्यावर, त्यांना बर्फाच्या लोढ्यांच्या पृष्ठभागावरून वाहून आलेले कांहीं डबे व तीन मोकळया पिशव्या आढळल्या. त्यांनीं बर्फ उकरायला सुरवात केली, पण तें घट्ट व चिवट होतें. तीन तास मेहेनत केल्यावर, बर्फकुदळीनें ते सर्व बर्फ उकरून काढणें त्यांच्याच्यानें शक्य नाहीं, हें त्यांना कळून चुकलें. बर्फाखालींच गिर्यारोहक व भारवाहक गाडले गेले होते, याबद्दल संशय नव्हता. ज्या अर्थी पांचवा तळ बनविला गेलेला नव्हता, त्या अर्थी ता. १४ जूनच्या रात्रींच हा प्रकार घडला असला पाहिजे, असा अंदाज करीत. दुःखित अंतःकरणानें लुफ्ट खालीं परतला.

नंगापर्वतावरील जर्मन गिर्यारोहक चवथ्या तळावर पोहोंचून शिखरावर चढण्याच्या तयारीत होते, असें जेव्हां जर्मनींतील या मोहिमेच्या प्रेरकांना आधींच्या संदेशावरून कळलें होतें, तेव्हां गिर्यारोहकांच्या यशाबद्दल त्यांना खूप आशा वाटूं लागली होती. पण तेवढ्यांत रेडियोवर पुढील बातमी ऐकून त्यांना धक्काच बसला. “ गिलगिटच्या ब्रिटिश एजंटकडून रॉयटरला अशी खबर आली आहे कीं, जर्मन पथकाला हिमप्रपातानें गांठलें आणि सात गिर्यारोहक व नऊ भारवाहक त्याखालीं सांपडले. ”

अपघात ता. १४ जूनच्या रात्रीं घडला. ही बातमी ता. २० जून रोजीं जर्मनींत पोहोंचली. तेथें त्यांचा विश्वासच बसेना. सबंध पथकच्या पथक हिमप्रपाताखालीं सांपडलें ! असें कसें होईल ? म्युनिचमधील जर्मन हिमालयन मंडळाकडें तारा व टेलिफोन यांचा, एकसारखा मारा होऊं लागला. जर्मनींतून व सर्व जगांतून लोक त्यांच्याकडे या बातमीच्या खरे-पणाबद्दल पृच्छा करूं लागले. शेवटीं दिल्लीच्या परराष्ट्रचिटणिसाकडून व श्रीनगरच्या जर्मन वकिलातीकडून जेव्हां या बातमीला दुजोरा मिळाला, तेव्हां त्याबद्दल कुणालाहि संशय राहिला नाहीं. या अपघाताच्या वार्तेनें सबंध जर्मन देश हादरून गेला. सर्व देशांतील गिर्यारोहणप्रेमी हळहळले.

ज्यांनीं ही मोहीम करण्यास प्रेरणा व मदत केली होती त्या, पाउल बाउअरसारख्या जर्मनांना, नंगापर्वतावर अपघाताच्या ठिकाणीं जाऊन होईल ती मदत करणें–कोणी जिवंत सांपडण्याची आशा नव्हती, पण निदान त्यांच्या मृत देहांचा योग्य तो संस्कार करणें, हें आपलें कर्तव्य आहे, असें वाटूं लागलें. या विचाराला सगळीकडून पुष्टि मिळाली, व लोक आपापल्यापरीनें मदत करूं लागले. पाऊल बाउअर व बेकटोल्ड यांना जर्मनीहून ताबडतोब निघतां यावें म्हणून, दोघां उतारूंनीं, डच विमानांतील आपल्याकरितां रिझर्व्ह केलेल्या जागा, आपण मागें राहून त्यांना दिल्या. पाउल बाउअर व बेकटोल्ड ता. २६ जूनला कराचीला पोहोंचले. त्यांचा तिसरा साथीदार क्रॉस मागून इंग्लिश विमानानें येत होता. कराचीहून ते आगगाडीनें लाहो-रला गेले. तेथें क्रॉसची वाट पाहण्यांत, त्यांचे तीन दिवस फुकट गेले. नंगापर्वतापासून ६० मैल दूर असलेल्या गिलगिट या लष्करी ठाण्यापर्यंत त्यांना जलद पोंचविण्यासाठीं, हिंदुस्थान सरकारनें रॉयल एअर फोर्सचें एक विमान दिलें. लाहोरहून विमानानें निघून, रिसालपूर येथें ते कांहीं वेळ थांबले. तेथून पुढें हिमालयांतील सिंधू नदीच्या चिंचोळ्या घळींतून त्यांचे विमान जाऊं लागलें. सिंधूच्या पात्राच्या दहा हजार फुटांवरून त्यांचें

विमान जात होतें. ती दरी इतकी चिंचोळी होती कीं, विमानाच्या बाहेर हात काढला तर डोंगराला लागेल कीं काय, असें वाटत होतें. गिलगिटला पोहोंचल्यावर तेथून, ते घोड्यावर स्वार होऊन ताबडतोब निघाले, व दोन दिवसांत म्हणजे जुलैच्या आठ तारखेला नंगापर्वताच्या पायथ्याशीं जाऊन पोहोंचले. तेथें त्यांना लुफ्टनें सर्व हकीगत सांगितली. खालच्या तळावर राहिल्यानें जे भारवाहक वांचले होते, त्यांचीही गांठ पडली. त्यांच्या मीलनाच्या आनंदावर नुकत्याच झालेल्या अपघाताची छाया होती.

पाउल बाऊअर तेथें पोचण्यापूर्वी, लुफ्ट व स्मार्ट यांनीं उरलेल्या कांहीं भारवाहकांना घेऊन, वर जाण्याचे एकदोन प्रयत्न केले होते. पण अपुरी साधनें, भीतिग्रस्त भारवाहक, व हिमाची प्रतिकूल परिस्थिति वगैरे कारणांनीं त्यांना दुसऱ्या तळापर्यंतसुद्धां पोचता आलें नाहीं. पाऊल बाउअर आल्यावर त्याच्या मार्गदर्शकत्वाखालीं त्यांनीं पुन्हां चढण्यास सुरवात केली. अपघाताच्या ठिकाणीं बर्फ खणून काढण्यासाठीं त्यांनीं मोठ्या आकाराच्या व तीक्ष्ण कुदळी बरोबर घेतल्या होत्या. परिश्रमपूर्वक ते वर गेले. ज्या ठिकाणीं हिमप्रपातामुळें बर्फ पसरलें होतें, तेथें, त्यांनी थोड्या थोड्या अंतरावर खणायला सुरवात केली. एका ठिकाणीं कांहीं सांपडलें नाहीं, तर ती जागा सोडून दुसऱ्या जागेवर खणावें, असा क्रम त्यांनीं चालू ठेवला. अखेरीस त्यांना एका ठिकाणीं, एक कुदळ व कांहीं सिगरेट्स सांपडल्या. त्या ठिकाणाच्या जवळच कुठेतरी तंबू असणार. आणखी कांहीं वेळ खणल्यावर त्यांना गिर्यारोहकांची मृतशरीरें सांपडली. ते दिवंगत गिर्यारोहक आपापल्या झोपण्याच्या पिशव्यांत शांतपणें झोपलेले दिसत होते. हार्टमनच्या मनगटावरील घड्याळांत साडेबारा वाजले होते. ते घड्याळ धक्क्यानें व थंडीनें बंद पडलें असलें पाहिजे. कारण, पाउल बाउअरनें तें उचलून स्वतःच्या खिशांत ठेवल्यावर, तें आपोआप चालूं लागलें. या सर्व खुणांवरून असें दिसतें कीं, ता. १४ जून रोजीं रात्रीं, सर्वजण झोपले असतांना, साडे-

बारा वाजतां हिमप्रपात होऊन तळावर हिम व बर्फ वाहून आलें असलें पाहिजे. मृत गिर्यारोहक व भारवाहक यापैकीं कुणाच्याही चेहेऱ्यावर घाबरले असल्याची छटा नव्हती. जगण्यासाठीं धडपड केली असल्यासारखें कुणीही दिसत नव्हतें. निद्रादेवीनें त्यांना परस्पर यमराजाच्या स्वाधीन केलें होतें. २०,००० फूट उंचीवरील चिवट बर्फात, दहाबारा फूट खोल खणून, त्यांचीं प्रेतें बाहेर काढणें फार श्रमाचें होतें. पाउल बाउअर आणि साथीदार फक्त पांच गिर्यारोहकांचीं प्रेतें बाहेर काढूं शकले. तेथेंच एका ठिकाणीं सर्वांना पुरण्यांत आले. भारवाहकांची प्रेतें जेथें आहेत तेथेंच राहूं द्यावीत, अशी इच्छा त्यांचा म्होरक्या सरदार नुरसंग यानें प्रदर्शित केली होती, म्हणून त्यांना हलविण्यांत आलें नाहीं. कॅमेरे, थर्मामीटर वगैरे नाजुक यंत्रें, आणि गिर्यारोहकांच्या दैनंदिन्या वगैरे महत्त्वाच्या चिजा शोधून काढून, बरोबर घेण्यांत आल्या.

आतां सर्वजण थकून गेले होते. पुन्हा वादळ होण्याची चिन्हें दिसत होती. त्यांचे स्वतःचे जीव धोक्यांत घालायचे नसतील तर, त्यांनीं तावडतोब पायथ्याच्या तळावर जाणें भाग होतें. त्यांना अपेक्षेपेक्षां उशीर झाला होता. खालच्या तळावरील बेकटोल्ड आदि साथीदार, हे अजून कां परत आलें नाहींत याची चिंता करीत होते. ते वरच्या लोकांना शोधायला निघणार होते, त्याच सुमारास पाउल बाउअर आणि इतर मंडळी खालीं जाऊन पोहोंचले.

त्या दिवशीं सर्वजण एकत्र बसून, आपल्या दिवंगत मित्रांच्या आठवणी काढीत बोलत होते. त्या निवडक, तेजस्वी, व सुचरित तरुण गिर्यारोहकांच्या मृत्यूनें सर्वांना, विशेषत: जर्मन लोकांना फार वाईट वाटलें. पण या घटनेमुळें ते हताश झाले नाहींत. जर्मन लोकांची विचारसरणी कशी होती, हे पाउल बाउरनें लिहिलेल्या पुस्तकांत दिसून येतें. तो म्हणतो,

“ दुःखाबरोबरच, अभिमान, आनंद आणि विश्वास हे भावही आमच्या मनांत उचंबळून आले आहेत. त्या वीरांच्या तडफदार, व धाडसी हालचाली, कल्पनेनें डोळयापुढें आणल्या म्हणजे मनाला आनंद वाटतो. ढगांच्याही पलीकडे असणारें ध्येय गांठण्याकरितां, एकजुटीनें, इतके कसोशीचे प्रयत्न करणारे, धैर्यवान् व निश्चयी वीर आमच्या देशांत आहेत, याचा अभिमान वाटतो, व त्याबरोबरच भविष्यकालाबद्दल विश्वास उत्पन्न होतो. इतिहासाच्या सुरवातीपासून, आपल्या देशांतील हजारो वीरांनी प्राण दिले. पण त्यामुळें तो हतवीर्य झाला काय ? छे ! उलट, त्यांच्या प्राणाहुतीनें जर्मन लोकांमध्यें नवें चैतन्य व नवी शक्ति निर्माण झाली. नंगापर्वतावरील मृतवीरांच्या प्रेरणेनें दुसऱ्यांच्या अंगांत तेज संचरेल, व जर्मनीच्या जिवंतपणाची ज्योत हातीं घेऊन ते पुढें जातील.”

## उपसंहार

हिमालयांत अनेक हिमावृत शिखरें असल्यामुळें गिर्यारोहकांना आपल्या कौशल्याची, काटकपणाची व सहनशीलतेची परीक्षा पाहण्यास तेथें भरपूर वाव आहे. युरोपांतील आल्पस्‌मधील बहुतेक सर्व शिखरांवर माणसाची पायधूळ झडली आहे. तशी गोष्ट हिमालयाची नाहीं. त्रिशूळ, कामेट आणि नंदादेवी अशी कांहीं उपशिखरें, निष्णात गिर्यारोहकांच्या पथकांनीं काबीज केलेली आहेत. पण ज्यांवर अजून कबजा व्हावयाचा आहे, अशी कितीतरी शिखरें आहेत. एव्हरेस्ट, कांचनजंगा आणि नंगापर्वत या मोठ्या शिखरांवर अनेक प्रयत्न झाले, आणि अजूनही होतील. त्या शिखरांवर जाण्याचे प्रयत्न दीर्घ अनुभव असलेल्या गिर्यारोहकांनींच करावेत. इतरांना आपली शक्ति अजमाविण्यास हिमालयांतील दुसरीं शिखरें आहेत. मकालू, धवलगिरी, चोमोलांझो गौरीशंकर, पुमोरी इत्यादि अनेक डौलदार शिखरें गिर्यारोहकांस आव्हान करीत आहेत.

आपल्या देशास स्वातंत्र्यप्राप्ति होण्यापूर्वी धाडसी, महत्वाकांक्षी व देशप्रेमी तरुणांच्यापुढें, स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं होणाऱ्या चळवळींत उडी घेणें, हें एकच मोठें ध्येय होतें. आतां तसें राहिलें नाहीं. अशा तरूण हिंदी वीरांना आतां आपली कर्तबगारी दाखविण्यास नवी दालनें, व नवी क्षेत्रें मिळाली

पाहिजेत. पाश्चिमात्य देशांतील तरुण आपल्या शौर्यानें, कौशल्यानें, व मेहे-नतीनें जीं क्षेत्रें गाजवूं शकतात, त्या क्षेत्रांत आतां हिंदी तरूणांनीं चमकलें पाहिजे. हिंदी तरूणांत अशी महत्वाकांक्षा वाढत आहे, यांत शंका नाहीं. कोणी क्रिकेटमध्यें, कोणी हॉकी, टेनिस, सायक्लिंग किंवा पोहणें, अशा कांहीं खेळांत कौशल्य दाखवून, जागतिक सामन्यांत प्राविण्य मिळवूं इच्छि-तात. कोणी विमानविद्या, संशोधन इत्यादि गोष्टींत पुढें येऊं पाहतात. गिर्यारोहणाची कला शिकून पाश्चात्यांप्रमाणें निसर्गाशीं झुंज करण्याची स्फूर्तीही कोणास होईल. मुंबईच्या एका हौशी मंडळानें या उपक्रमास सुरवात केलीच आहे. त्या मंडळांतील कांहीं लोक, सिक्कीमधील कांचनजंगेच्या पायथ्याच्या खोऱ्यांत भ्रमण करून, नुकतेंच परत आले आहेत.

हिंदी तरूणांना गिर्यारोहणाच्या कलेत प्रगति करण्याची इच्छा झाल्यास, त्यासाठीं लागणारें क्षेत्र हिमालयाच्या रूपानें हिंदुस्थानाच्या आवारांतच असलें, तरी, या कलेचें सशास्त्र शिक्षण, त्यांना प्रथम पाश्चिमात्य गिर्यारोहकांच्या हाताखालीं आल्पस्‌मध्यें किंवा हिमालयांत घ्यावें लागेल. नुसत्या पुस्तकी वाचनानें जरूर तें शिक्षण मिळणार नाहीं. त्यासाठीं अनुभविक वाटाड्यांबरोबर कमरेला दोर बांधून, प्रत्यक्ष डोंगरावर जाऊन, गिर्यारोहणाचें कसब शिकावें लागेल. असे कांहीं तरुण गिर्यारोहणाची कला शिकून आले, तर गिर्यारोहकांची मंडळें स्थापून ते या कलेचा प्रसार करूं शकतील. हिंदी तरुण गिर्यारोहणाच्या कलेंत साधारण तरबेज झाल्यावर, युरोपियन, विशेषतः ब्रिटिश गिर्यारोहकांच्या बरोबरीनें काम करण्यास एक अडचण येईल असें वाटतें. अनेक वर्षे हिंदी लोकांना, अडाणी व मागास-लेले समजण्यांत आल्यामुळें, त्यापैकीं कांहींनीं तरबेज होऊन, आपल्या बरोबरीनें काम करूं लागणें, ब्रिटिशांना सहन होणार नाहीं. हिंदी तोफ-खान्यांत अधिकारी असतांना, आणि ब्रिटिश सैन्याधिकाऱ्यांच्याबरोबर काम करतांना, प्रस्तुत लेखकाला हाच अनुभव आला. हिंदी शिपायाचें ते

जितकें कौतुक करीत तितकें, हिंदी अधिकाऱ्याचें कौतुक करण्याचें दूरच राहो, पण त्याला सहकार्य देण्यांतही अंगचोरपणा करीत. तद्वतच असें वाटतें कीं, शेर्पा, व भुतिया या जातींतील कांहीं हिंदी लोक, जोपर्यंत केवळ भारवाहकांचेंच काम करीत आहेत, तोपर्यंत, ब्रिटिश गिर्यारोहक त्यांची तोंड भरून स्तुति, व कंटाळा येईपर्यंत पाठ थोपटतील. परंतु हिंदी तरुण गिर्यारोहक म्हणून त्यांच्याबरोबर जाण्याची महत्वाकांक्षा धरूं लागले, तर आपला सहकार्याचा हात ते मागे घेतील अशी भीति वाटते. तथापि, ता. पंधरा ऑगस्ट १९४७ नंतर हिंदुस्थानचें पारतंत्र्य नष्ट झाल्यामुळें, पाश्चिमात्यांचा, व विशेषतः ब्रिटिशांचा हिंदी लोकांशीं वागतांना दिसून येणारा श्रेष्ठत्वगंड कमी झाला असेल, अशी आशा करण्यास हरकत नाहीं. तसें झालें असल्यास ही अडचण उरणार नाहीं. याउलट, हिंदी तरुणांनीं केवळ ब्रिटिशांचे दोष दाखविण्यांत फारसा वेळ खर्च न करितां, आपल्या गुणानें, मेहेनतीनें, व निष्ठेनें ही कला आत्मसात् करण्याचें काम चालूं ठेविलें, तर कांहीं वर्षांत पाश्चात्यांच्या बरोबरीनें काम करण्याची पात्रता त्यांच्या अंगांत येईल, याची खात्री वाटते. हिंदी तरुणांनीं आपल्या कृतीनें पाश्चात्य लोकांतील श्रेष्ठत्वगंड एकदा नाहींसा केला, म्हणजे आपल्या सजातीय सहकाऱ्यांना ते जसें औदार्य व मित्रत्व दाखवितात, तसेंच हिंदी गिर्यारोहकांनाही दाखवितील, आणि आज जशीं जर्मन, अमेरिकन व ब्रिटिश गिर्यारोहकांचीं संमिश्र पथकें, उंच पर्वतांवर चढाया करितांना दिसतात, तशींच पाश्चिमात्य व हिंदी गिर्यारोहकांचीं संमिश्र पथकें हिमालयांतील शिखरांवर गिर्यारोहणाची हौस भागवून घेताना दिसून येतील. याला अजून बरींच वर्षे लागतील, हें खरें आहे, पण तें चित्र कल्पनेनें डोळयापुढें आणण्यासारखें आहे.

उंच शिखरांवर होणाऱ्या चढाईत भाग घेण्यास गिर्यारोहणाच्या कलेचें सशास्त्र शिक्षण, व प्रदीर्घ अनुभव हीं दोन्ही हवींतच. परंतु त्या-

बरोबर ध्येयनिष्ठा, प्रामाणिक वृत्ति, धैर्य, सहनशीलता, औदार्य, शिस्त, आज्ञाधारकपणा, इत्यादि गुण गिर्यारोहकांच्या अंगांत असणें आवश्यक आहे. वेळ आल्यास संपूर्ण त्यागाची तयारी त्यानें केली पाहिजे. या गुणांबरोबरच, गंभीरपणाचा अतिरेक होऊं नये म्हणून, साध्या प्रसंगांतही विनोद व आनंद अनुभविण्याची वृत्ति त्याजपाशी हवी. नाहींतर, मोहिमेंतील खडतर दिवसांत मनावर फाजील ताण पडून त्याची कार्यक्षमता कमी होईल. गिर्यारोहण करण्यास आलेल्या पाश्चात्य गिर्यारोहकांत यांतील बहुतेक गुण आढळून येत असल्यामुळें, शेर्पा, भुतिया इत्यादि जातींच्या भारवाहकांचा 'साहेबांवर' विश्वास व निष्ठा असते. भारवाहकांनीं त्यांच्याशी एकनिष्ठ राहून, व जिवापाड श्रम करून त्यांना अमोल मदत केलेली आहे. पगाराच्या रूपानें मिळणाऱ्या मोबदल्यापेक्षां जास्त कामगिरी त्यांनीं आपणहून केलेली आहे. आपल्यालाही या भारवाहकांचें संपूर्ण सहकार्य हवें असेल, तर वर सांगितलेल्या गुणांची जोपासना करून त्यांची निष्ठा संपादन करावी लागेल.

या गुणांची खरी परीक्षा कठीण प्रसंग आला, किंवा प्राणावर बेतलीं म्हणजेच होते. मोहिमेचें यश दूरावण्याची पर्वा न करितां, आपले प्राण धोक्यांत घालून, नॉर्टननें सॉमरव्हेल व मॅलरी यांना बरोबर घेऊन, वर अडकून पडलेल्या चौघा भारवाहकांना खालच्या तळावर सुखरूप आणलें. आपण पथकाचे नेते आहोंत ही गोष्ट ध्यानांत ठेवून, सर्वांच्या मागून खालीं उतरत असतां मेर्कलला वाटेंतच मृत्यूनें गांठलें. या व अशा ठळक उदाहरणांमुळें ब्रिटिश व जर्मन पथकांची कीर्ति उज्वल राहिली आहे. पुढेंमागें हिंदी गिर्यारोहकांच्या पथकानें एखाद्या पर्वतावर चढाई केली, आणि या गुणांचा अभावामुळें एखादा गिर्यारोहक प्रसंगास योग्य असा वागला नाहीं, तर आपल्या देशाची फार अपकीर्ति होईल. कारण, अशा मोहिमांवर जगांतील सर्व प्रमुख देशांचें लक्ष असतें.

असें कांहीं होण्यापेक्षां, उंच शिखरावर हिंदी पथक न गेलेलेंच बरें, असें सुचवावेसें वाटतें. हा इशारा देण्याचें कारण, मागे एक हिंदी क्रिकेट संघ विलायतेस गेला असतां, खेळाडूंच्या आपसांतील बेबनावामुळें आणि शिस्तीच्या अभावामुळें, संघाला कमीपणा आला होता. तो डाग क्रिकेटच्या बाबतींत खपून गेला. परंतु गिर्यारोहणासारख्या क्षेत्रांत तो सहजासहजी खपणार नाहीं. याचा अर्थ असा नव्हे कीं, हिंदी संघ कुठेही गेला तरी आपल्या अवगुणांचें प्रदर्शन करील. असें मुळींच नाहीं. आपण कोणचेही सत्कृत्य वा दुष्कृत्य केलें, तर तें अखिल जगाच्या नजरेस येईल, म्हणून जबाबदारीनें वागणें जरूर आहे, याची जाणीव हिंदी जनतेत वाढत आहे. आपल्या देशाच्या ध्वजाला कलंक लागूं न देण्याची खबरदारी घेणें, हें आपलें कर्तव्य आहे, याची जागृति लोकांत स्वातंत्र्य प्राप्तीनंतर दिवसेंदिवस तीव्रपणें होत आहे. त्यामुळें, आपल्या हातून जगाच्या दृष्टीनें नामुष्कीचें कृत्य होऊं न देण्याची काळजी कुठल्याही क्षेत्रांत काम करणारे हिंदी तरुण घेतीलच. तरीसुद्धां, गिर्यारोहणाच्या क्षेत्रांत प्रवेश करूं इच्छिणाऱ्यांना त्यांच्यावरील जबाबदारीची , व त्यांच्याकडून कोणची अपेक्षा आहे याची जाणीव, वेळेवरच करून दिलेली बरी.

## परिशिष्ट ‘अ’

### हिमालयांतील कांहीं शिखरें व त्यांची उंची

| शिखराचें नांव | उंची-फूट |
|---|---|
| एव्हरेस्ट | २९१४५ |
| के टू ( K. 2 ) | २८२५० |
| कांचनजंगा | २८१४६ |
| मकालू | २७७९० |
| धवलगिरी | २६७९५ |
| नंगापर्वत | २६६२० |
| नंदादेवी | २५६४५ |
| चोमोलांझो | २५६४० |
| कामेट | २५४४७ |
| चामलांग | २४०१२ |
| गौरीशंकर | २३४४० |
| पुमोरी | २३१९० |

## परिशिष्ट 'ब'

### संदर्भ ग्रंथ


| | ग्रंथाचें नांव | लेखक |
|---|---|---|
| 1 | AT GRIPS WITH EVEREST | STANLEY SNAITH |
| 2 | EVEREST THE CHALLENGE | SIR FRANCIS YOUNG HUSBAND |
| 3 | EPIC OF MOUNT EVEREST | SIR FRANCIS YOUNG HUSBAND |
| 4 | AFTER EVEREST | T. H. SOMERVELL |
| 5 | EVEREST 1933 | HUGH RUTTLEDGE |
| 6 | CAMP SIX | F. S. SMYTHE |
| 7 | THE PILOTS BOOK OF EVEREST | MARQUESS OF CLYDESDALE AND D. F. M'INTYRE |
| 8 | FIRST OVER EVEREST | P. F. M. FELLOWS AND OTHERS |
| 9 | NANDA DEVI | E. E. SHIPTON |
| 10 | THE ASCENT OF NANDA DEVI | H. W. TILMAN |
| 11 | HIMALAYAN QUEST | PAUL BAUER |
| 12 | MOUNTAINEERING | EDITOR LONSDALE LIBRARY |
| 13 | MOUNTAINEERING | PEACOCKE |
| 14 | ROCK CLIMBING AND MOUNTAINEERING | C. BRUNNING |
| 15 | EVEREST 1938 | H. W. TILMAN |

## शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १० | ५ | जुंगफ्राड | जुंगफ्राउ |
| १५ | ८ | महानदी | महानद |
| २४ | ५ | श्लागिनवेरो | श्लागिनवेट |
| २४ | ८ | मगरी | ममरी |
| २४ | १३ | डॉ. किलिपी | डॉ. फिलिपी |
| २९ | २ | नेहभाव | स्नेहभाव |
| १४९ | ५ | १८३३ | १८८३ |